# मराठी साहित्य

[ सन १९१४ ते सन १९४४ या कालखंडातील
मराठी साहित्याचे समालोचन ]

चित्रशाळा प्रकाशन, पुणें २.

# प्रकाशकाचें निवेदन

सन १९४५ चे अखेरीस धुळें येथें भरलेल्या साहित्य-संमेलनाचे प्रसगानें तेथील मंडळींनीं ह पुस्तक प्रकाशित करण्या-साठीं लेख जुळविले व ते आमचेमार्फत प्रकाशित झाले. त्यानंतर पाच वर्षांनीं आतां त्याच पुस्तकाची नवी आवृत्ति निघण्याचा प्रसंग येत आहे. प्रथमावृत्तीचे वेळीं सर्व जबाबदारी धुळें साहित्य-संमेलनाकडेच होती. म्हणून ही आवृत्ति काढण्याचे वेळीं आम्ही या पुस्तकांत ज्याचे लेख आलेले आहेत त्याचेकडून पुन्हां परवानगी घेऊन आम्ही हे पुस्तक प्रकाशित करीत आहोंत.

मराठीच्या अभ्यासकांना हें पुस्तक उपयुक्त होईल असा विश्वास वाटतो.

—प्रकाशक

# अनुक्रमणिका





: १ :

# मराठी काव्य :

प्रा. रा. श्री. जोग

आधुनिक प्राश्चात्य वाङ्मयचर्चेत 'युद्धोत्तर काल' हा एक आवडता आणि अर्थपूर्ण असा वाक्प्रचार होऊन बसला आहे. तें पाहून आपणहि त्याचा प्रयोग बराचसा करूं लागलो आहो. वस्तुतः आपल्या वाङ्मयाच्या दृष्टीने त्याला काही अन्वर्थकता आहे की नाही याची शंका आहे. तथापि काव्याच्या दृष्टीने मराठी वाङ्मयात १९२० नतरचा काल हा पूर्वीच्या कालापासून वेगळा पडतो. मात्र युद्धाचा परिणाम म्हणून हें झालें आहे असें नव्हे. १९२० किंवा त्याआधी एकदोन वर्षे या कालावधीत मराठी वाङ्मयामधील गडकरी, बालकवि, ना. वा. टिळक हे आधुनिक कविपचकामधील तीन प्रमुख कवि, त्याचप्रमाणे त्याबाहेरील रेंदाळकर हे नवीन आणि लोंढे, लेले, गो. वा. कानिटकर व ग. ज. आगाशे हे जुन्यामधील, कवि इहलोक सोडून गेले. यामुळे काही काळपर्यंत तरी काव्यदृष्ट्या थोडीशी स्तिमितता आणि अंधेरी आल्यासारखें झालें. ही अंधेरी रविकिरणमंडळाच्या प्रकाशाने बऱ्याच प्रमाणात दूर झाली. १९२० या कालमर्यादेला याप्रमाणे काव्यदृष्ट्या कांही अन्वर्थकता असली तरी १९१४ सालाला मात्र ती नाही. काव्यविषयक कोणतीहि महत्त्वाची घटना या सालीं झाली असें नाही. पहिलें महायुद्ध या वर्षी सुरू झालें ही गोष्ट जगाच्या राजकारणांत कितीहि महत्त्वाची असली, तरी मराठी काव्यकारणात ती तशी होऊं शकत नाही. तथापि प्रस्तुत विचाराकरिता गेल्या तीस वर्षांचा काल निश्चित केला गेला असल्याने १९१४ या वर्षापासून आपल्या या विचारास प्रारंभ करावयास हवा.

अर्वाचीन मराठी काव्याच्या इतिहासात इ. स. १८८५ किंवा १८९० च्या आधीचा काल क्रांतिपूर्व म्हणतां येईल. तेथून पुढे म्हणजे १९२० पर्यंतचा काल हा क्रांतिकाल होतो. कारण या कालात मराठीचें जुनें वळण जाऊन इंग्रजी कवितेचें वळण या काव्यास संपूर्णपणे लागलें असें दिसून येतें. १९२० पर्यंत, हें वळण लावण्यास कमीअधिक हातभार लावणारे सारे लोक म्हणजे केशवसुत, दत्त, विनायक, माधवानुज, गडकरी, बालकवि आणि टिळक हे एकामागून एक आपापले कार्य करून अस्त पावले. त्यांनी लाविलेलें हें वळण १९२० नंतर स्थिर होऊन, या नवीन वळणानेच निरनिराळे काव्य-प्रकार स्पष्ट व स्वतंत्र असे विस्तार पावले. १९१४ ते १९२० पर्यंतचा मधला काल हा क्रांतिकालातील शेवटचा भाग होय. वस्तुतः या मधल्या काळात नवीन असें फारसे कांही झालेंच नाही. केशवसुत, विनायक आणि माधवानुज ( १९१६ ) हे कवि दिवंगतच झाले होते. केशवसुताचे समकालीन कवि श्री. ना. वा. टिळक यांचे लक्ष धर्मप्रचार आणि त्याला अनुकूल असें ख्रिस्तायनलेखन या कार्याकडेच गुंतलें होतें. त्यांच्या कवितेचा पहिला भाग १९१४ तच प्रसिद्ध झाला होता. दुसरा भाग अद्यापीहि प्रकाशात आलेला नाही. गोविंदाग्रजांचे लक्ष नाटके आणि विनोदी लेखन यांनेच विशेष आकृष्ट झालें होते. बलकवींनी काव्याकडून आपलें लक्ष दुसरीकडे वळविलें नसलें तरी त्यानाहि चांगल्यापैकी काव्य सुचेनासे झाले होतें. केशवसुताचे चेले रेंदाळकर काव्यलेखन अव्याहतपणें करीत असले तरी त्यात नवेपणा उरला नव्हता. लेंभे, लोंढे, आगाशे ही मंडळी फारशी नवी भर घालूं शकत नव्हती. पंडिती वळणाची कवि मंडळी— लेलेशास्त्री, वि. वा. भिडे, बा. अ. भिडे, अनंततनय— काव्य करीत असली तरी त्याला नवकाव्याच्या दृष्टीने विशेष महत्त्व नव्हते. दोनच महत्त्वाच्या व्यक्ति आपलें काव्यलेखन करीत होत्या. एक ग्वाल्हेरचे तांबे आणि दुसरे बडोद्याचे चंद्रशेखर. त्यात तांब्याची पुरी माहितीहि मध्य महाराष्ट्रातील रसिकास, त्यांचा पहिला काव्यसंग्रह १९२० सालीं प्रसिद्ध होईपर्यंत नव्हती. दुसरे कवि चंद्रशेखर मोठ्या साक्षेपाने चांगली काव्यरचना करीत असले तरी नवीन भावगीत-संप्रदायाच्या दृष्टीने हें काव्य फारसें उपयुक्त नसल्याने त्यांचा काव्यलेखकांवर प्रभाव पडत नव्हता. १९१४ ते १९२० हा काळ याप्रकारें संधिप्रकाशवत् मंद काव्यनिर्मितीचाच म्हणा-

ययास हवा. पुढील कालातील अनेक प्रथितयश कवींच्या काव्यलेखनास आरंभ याच कालामध्ये झाला. गिरीश, यशवंत, माधव जूलियन्, मायदेव, अत्रे ही मडळी उदयोन्मुख होती; परंतु त्यांच्या प्रतिभेचा खराखुरा उन्मेष अद्यापि झालेला नव्हता. अनिल, काणेकर ही मंडळी अद्यापि काव्यलेखन करण्याच्या वयात आलेली नव्हती. नवीन पिढीमधील श्रीधर—मनोरमा ( रानडे पति-पत्नी ) याच्या काव्यमय विवाहाचे पडसाद अद्यापि वातावरणात ताजे होते; तथापि काव्यविषयक निष्पत्ति एकंदरींत लक्षांत घेण्याजोगी चाललेली नव्हती. १९२० नंतरच्या चार-पांच वर्षांत काव्यलेखनाच्या भरतीस प्रारंभ झाला. ती भरती १९३५ पर्यंत म्हणजे दहा बारा वर्षेपर्यंत चालून त्यापुढील पाच-सात वर्षे मराठी काव्याच्या ओहोटीच्या गेली. गेल्या तीन वर्षांत ही ओहोटी सपून भरतीस पुनः प्रारंभ होत आहे असे वाटते. स्थूलमानाने गेल्या तीस वर्षांतील मराठी काव्यामधील आरोहावरोह हे असे आहेत.

गेल्या तीस वर्षांतील काव्याचा विचार अगोपागासहित करावयाच्या आधी या कालखडातील काव्यासंबंधी सर्वसामान्यपणें लक्षात घ्यावयाच्या गोष्टीचा उल्लेख करणे इष्ट होईल. या कालात अर्वाचीन कवींचे काव्यसंग्रह प्रकाशित होऊ लागले हे लक्षात घेण्याजोगें आहे. बऱ्याचशा दिवगत कवींचे आणि काही विद्यमान कवींचे कवितासग्रह इतरानी प्रसिद्ध करावे ही प्रथा प्रथम पडून, नतर आपल्या काव्याचा संग्रह आपणच प्रसिद्ध करावा असें होऊं लागलें. प्रथमतः म्हणजे १९१४ या सालीं उजगरे यानी टिळकाच्या कवितेचा पहिला भाग प्रसिद्ध केला तो त्याच्या हयातींतच. अर्वाचीन दिवंगत कवींच्या काव्यसंग्रहप्रकाशनास प्रारंभ १९१७ साली केशवसुताच्या संग्रहाच्या ह. ना. आपटे यानी केलेल्या प्रकाशनाने झाला. त्यानंतर विनायक, दत्त, माधवानुज, गडकरी, रेंदाळकर, लेंभे, बालकवि इत्यादींचे सग्रह त्या त्या कवींच्या चाहत्यानी किंवा ऋणानुबंधीयानी प्रसिद्ध केले. विद्यमान असतानाच ताबे, चंद्रशेखर व बी या कवींना आपले काव्यसंग्रह इतरानी प्रसिद्ध केलेलें पाहण्याचे भाग्य लाभलें. क्रमानें, इतर कोणी आपलें काव्य प्रसिद्ध न केलें, तर आपणच तें प्रसिद्ध करावें ही रूढि पडून बहुतेक साऱ्या छोट्या मोठ्या कवींचें काव्य प्रकाशित झालें आहे. काव्यप्रकाश-नाच्या दृष्टीनें हा काल फारच गडबडीचा गेला. काव्याचे प्रकाशक द्रव्यलाभ

फारच क्वचित् करून देत असले तरी हौसेने त्याचे प्रकाशन होते, व तें व्हावें हे स्वाभाविक आहे, परंतु स्वाभाविक असून ही गोष्ट याआधी फारशी होत नव्हती व ती या कालात झाली हें लक्षात घेण्याजोगे आहे.

एकेका व्यक्तीच्या काव्यप्रकाशनाची ही गोष्ट झाली. अनेक कवींच्या काव्याचा एकत्र सग्रह प्रसिद्ध करावा किंवा त्या कवींनी स्वतःच एकत्र येऊन तो प्रसिद्ध करावा असेंहि होऊं लागले. हे कोणत्या तरी मंडळाच्या वतीने व्हावें अशी रूढि पडली. अभिनवकाव्यमालेचे चार भाग काव्य-कौमुदी, विदर्भवीणा, मालविका, गोदाकांठचा गुजारव इत्यादि अनेक-कविकृत सग्रह या कालखंडांत अनेक प्रसिद्ध झाले. काव्यलेखनाला सामु-दायिक पद्धतीचा उपयोग जरी होत नसला, तरी अशी सामुदायिक कार्य-पद्धति प्रकाशनाच्या दृष्टीने सोईची, विशेषतः अर्थदृष्ट्या, होते असे आढळून आल्याने व काव्यविषयक विचारविनिमयहि शक्य होतो म्हणून ठिकठिकाणीं कविमंडळेंहि स्थापन झालीं. पुण्यातील रविकिरणमंडळ व भ्रमरमंडळ, नाशिक येथील वाङ्मयविहारमंडळ, दादर येथील कविमित्रमंडळ, सातारा येथील अजिंक्यतारामंडळ, इंदूर येथील महाराष्ट्र वाङ्मयमंडळ हीं मंडळें अशीं होत. महाराष्ट्राच्या बहुतेक केंद्रामधून हीं निर्माण झालीं होती. पण कवि हा प्राणी एकंदरींत कळप करून राहणाऱ्या प्राण्यांपैकी नसल्याने काव्यनिर्मितीच्या दृष्टीने आणि प्रकाशनाच्या दृष्टीनेहि ही मंडळे आता विशेषशीं कार्यक्षम राहिलीं आहेत असें वाटत नाही.

पण यापेक्षा प्रस्तुत कालाचा महत्त्वाचा विशेष म्हणजे त्याआधीच्या क्रांतीच्या कालखंडात ज्या काव्यप्रकाराची बीजे पेरलीं गेलीं होतीं त्यांची वाढ होऊन त्यातील बहुतेकास स्वतंत्र काव्यप्रकाराचें स्वरूप व दर्जा प्राप्त झाला हा होय. कित्येक प्रकार तर नव्यानेच अस्तित्वांत येऊन स्वतंत्र दर्जाप्रत पोचले आहेत असे म्हणावयास प्रत्यवाय नाही. केशवसुतांनी आरंभिलेल्या व तांबे, गडकरी, माधवानुज, बालकवि आणि रेंदाळकर यानी कौतुक केलेल्या सुनीताला रविकिरणमंडळ व इतर बहुतेक कवि यांनी करभार देऊन समृद्ध केलें आहे. तांबे यांनी प्रामुख्याने पुरस्कारलेल्या नाट्यगीताची जोपासनाहि त्यांच्या अनुयायांनी आणि इतरांनीहि चालविली आहे. गिरीश—यशवंत या दोघांनी जानपदगीताला कुणबाऊ भाषेचें नवीन

वळण लावून तें लोकप्रिय करून इतरानाहि तशी रचना करावयास प्रवृत्त केलें व त्यास एक स्वतंत्र स्थान मिळवून दिलें आहे. या प्रकारचा एक स्वतंत्र प्रातिनिधिक संग्रहहि 'सुगी' या नावानें प्रसिद्ध झाला आहे. शिशु-गीतानाहि या कालांत भाषा आणि विचार या दृष्टींनी काही स्वतंत्र वैशिष्ट्य प्राप्त होऊन त्याचें एक स्वतंत्र असें दालनच काव्यमंदिरात मांडिलें गेलें आहे. विडंबनाचीं बीजें यापूर्वी क्वचित् दिसलीं असलीं तरी त्याला श्री. अत्रे यानी खरी नवलाई प्राप्त करून दिली व विनोद—उपहास याचीहि त्याला जोड देऊन काव्यवाचकावर काही कालपर्यंत जबरदस्त पगडा बसविला. अशा कवितांचा संग्रहहि 'उपहासिनी' या नांवानें प्रसिद्ध झाला आहे. 'कणिका' किंवा मप्रे याच्या त्रुटित सुभाषितासारखा काव्यप्रकारहि या काळात उदयास येऊन रूढ होऊन बसला आहे. गद्यकाव्याचीहि एक परंपरा आपला संसार स्वतंत्रपणें चालवीत असताना दिसते. यात आढळणारें गूढ-गुंजन पद्यातहि स्वीकारून विदर्भातील काही कवि आपला काव्यसंसार सजवीत आहेत. इतर भावगीतामधील प्रेम हा प्रमुख विषय उचलून आणि कोल्हटकरादिकाच्या नाटकातील गझलाच्या चाली स्वीकारून 'गज्जल' हा काव्यप्रकारहि आपली अमदानी गाजवून गेला. सामाजिक खंडकाव्याची प्रथाहि दृढमूल होऊन बसली आहे. याशिवाय मुक्तच्छदादि प्रकार झालेच आहेत. अशा प्रकारें खरोखरच काव्यप्रकारदृष्ट्या अपूर्व अशी प्रगति गेल्या पंचवीस-तीस वर्षांत झाली आहे, आणि अजूनहि नवनवीन मार्गाकड कवि वळत आहेत असें पाहून इतर दृष्टींनी असमाधान वाटणाऱ्या टीकाकारानाहि कौतुक आणि समाधान वाटावयास हवें.

काव्याचें बाह्यरूप म्हणजे जी पद्यरचना तिच्याबाबतहि बराच फरक होत आहे व झाला आहे. केशवसुतांनी प्रचारात आणलेल्या मात्रारचनाचा उपयोग कवि अद्यापिहि करीत असले तरी इतर पद्यप्रकारानीहि आपली बरीच छाप बसविली आहे. सुनीत हा प्रकार शार्दूलविक्रीडिताचाच भाग असल्यानें निराळा पद्यरचनाप्रकार म्हणण्याचें तादृश कारण नाहीं. तरी गझल् हा प्रकार स्वतंत्र पद्यप्रकार मानावयास हवा. छंदोरचनाकार श्री. माधवराव पटवर्धन यानी आपल्या फारशीच्या सखोल व्यासगाच्या साहाय्यानें पूर्वीच्या नाटकातील गझलामधील शैथिल्य काढून टाकून त्याचें

अनेक प्रकार, स्वतः रचना करून मराठी कवींस परिचित करून दिले याची साक्ष त्यांचें 'गज्जलांजलि' हे पुस्तक देत आहे. त्याच्या मागून इतर अनेकांनी त्यांच्याइतकी काटेकोरपणें नसली तरी बरीच विविध अशी गज्जल-रचना केली आहे. वि. वा. भिडे यांच्यासारख्या जुन्याच्या अभिमानी पंडितानेंहि त्या प्रकारची रचना करून पाहिली. इतका या रचनेचा प्रभाव काव्य करणाऱ्यावर होता. पटवर्धन आणि रविकिरणमंडळ याच्या परिश्रमानें जुने जातिप्रकार वा मात्रावृत्ते शुद्ध स्वरूपात कविजनास उपलब्ध झालीं. अभिमन्यु, मुद्रिका, कंचनी, सारगी, सुरेख—सगम इत्यादि मात्रावृत्तें या प्रकारचीं आहेत. चद्रकात, उद्धव, समुदितमदना इत्यादि जाति कवि विनायकाच्या वेळेपासून चालत आल्याच होत्या. परतु जाति ( किंवा पदें ) यांचा यापेक्षाहि प्रभावी असा उपयोग श्री. तांबे यानी केला व त्याचें काव्य वाचलेल्या अनेक तरुण कवींना याच प्रकारची रचना रुचून साधू लागली. 'प्रणयप्रभे'चे वेड अनेकाना लागले आहे. 'नववधू' आणि 'मधुघट' याची लोकप्रियताहि बरीच मोटी आहे. एक ध्रुवपद, नतर तीन तीन ओळींचा अंतरा आणि मेळाची एक ओळ असलेलीं चार पाच कडवीं आणि वर उल्लेखिलेल्या दोन तीन चाली इतकी सामग्री अनेक कवि पुरेशी मानीत आहेत. याबरोबर लघुगुरुभेदातीत असे ज्याना समजतात असे छदहि अलीकडच्या कालात बरेच रूढ झाले आहेत. आपले भक्तिभाव अभगातून किंवा त्याहीपेक्षा नाजुक भाव ओवीसारख्या छंदामधून प्रकट करण्याची एक प्रथाच पडून गेली आहे. यातच बगाली धर्तीवर म्हणतां येण्याजोग्या 'प्राची अक्षरसंख्याक'सारख्या छंदांचाहि थोडाबहुत प्रचार आहे. या साऱ्याच्या शेवटीं छंदात्मकच, परंतु अनेक बंधनांतून मुक्त असलेली मुक्तच्छदात्मक रचना अधिकाधिक होऊं लागली आहे हे काव्यवाच-कांच्या लक्षात आलें नसेल ही गोष्ट अशक्य आहे. रचनाविषयक बंधने कमी करून त्यात सहजता आणण्याचा केशवसुताचा प्रयत्न अखेर मुक्तच्छदापर्यंत येऊन पोचला आहे. आज मराठी कवींस जुनीं संस्कृत वृत्ते, साकी, दिंडी-फटका इत्यादि साधीं मात्रावृत्ते, पदाच्या चालींचीं नवीं मात्रावृत्तें, अभंग-ओवी हे जुने छद, बगाली धर्तीचे नवे छद, नंतर मुक्तच्छंद आणि याही-पुढे गद्य, इतके अक्षरशः असंख्य रचनाप्रकार उपलब्ध झालेले आहेत.

पद्यप्रकारांची इतकी समृद्धि इतर देशी भाषात किंबहुना परदेशीय भाषांतूनहि आहे की नाही याची शंका वाटते. याहि दृष्टीने प्रस्तुत काल मोठा यशाचा झाला असे म्हणावेसें वाटतें.

प्रादेशिकदृष्ट्या या कालांतील काव्याचा विचार केला तर केंद्रवर्ती स्थल पुणें या ठिकाणींच, निदान १९२० ते १९३५ या कालावधीत, गुणानी आणि संख्येने अधिक अशी काव्यनिष्पत्ति झाली असें दिसते. यात कित्येक मूळची येथील मंडळी असली तरी बहुसंख्य बाहेरून येथे आलेली अशी आहेत. रविकिरणमंडळातील पटवर्धन, गिरीश, यशवत, श्रीधर–मनोरमा हे तर सारेच बाहेरून आलेले आहेत. मडळाबाहेरील मायदेव, ह. स. गोखले, अज्ञातवासी, प्र. के. अत्रे, ग. ह. पाटील, वा. भा. पाठक, तळवलकर, अधिकारी, कुमार यशोध, हिंगणेकर, आपटे, च. ग. दीक्षित ही नवीन पद्धतीची रचना करणारी तरुण पिढी, व वि. वा. भिडे, लक्ष्मणशास्त्री लेले, श्री. नि. चापेकर व अनततनय यासारखी संस्कृत वृत्तात्मक रचना करणारी जुनी मंडळी या पुण्यपत्तनालाच आपली काव्यभूमि मानिती झाली. या खालोखाल वजनदार अशी कामगिरी विदर्भकवींची झाली. खापर्डे, बेहेरे, टकाडे, उपाध्ये हे थोडे जुन्या पिढीचे कवि, आणि आ. रा. देशपांडे, गु. ह. देशपाडे, वा. ना. देशपाडे, भ. श्री. पंडित, या. मु. पाठक, कोलते या साऱ्यानीं महाराष्ट्र काव्यसपदेंत टाकलेली भर खास उपेक्षणीय नाही. मध्य महाराष्ट्र आणि विदर्भ यामध्ये असणारा नाशिक–खानदेश हा भागहि लक्षात घ्यावयास हवा. बी–बालकवि–सोनाळकर–तिवारी–निफाडकर ही ज्येष्ठ पिढीची मडळी, व साने गुरुजी–सो. चौधरी–कुसुमाग्रज–बळवत–दाते अशोक व निकुम्ब हे नवीन लोक यानी केलेली अथवा यापैकी काही करीत असलेली शारदेची सेवा कोणासहि मान्य होण्याजोगीच आहे. नतर क्रम मुंबई व उपनगर येथील कवींचा. त्यात काणेकर–काटदरे, के. ना. काळे, शिशिरागमकर्ते मर्ढेकर, पु. शि. रेगे, वसत वैद्य, गुप्ते–कारखानीस, इत्यादि व्यक्तींचा समावेश होतो. खाली दक्षिणेकडे वळल्यास दक्षिण महाराष्ट्रातील काव्यविहारी, साधुदास, सुमत, विरागी, काव्यशेखर, श्रीखंडे, शशाक व मनोहर या कवींचा उल्लेख आवश्यक ठरतो. ‘ मालविके ’ने माळव्यातील अनेक कवींचा परिचय करून दिला असला, तरी तांबे या

एका मोठ्या कवीने इतरास अंधारांत टाकल्यासारखें वाटतें. त्यातूनहि काळेले, झोकरकर, माचवे, लोवलेकर, आपटे इत्यादि नावें डोळ्यापुढे आल्याखेरीज राहत नाहीत. ताब्याप्रमाणे बडोद्यास चंद्रशेखराचे झालें आहे. मराठवाड्यांत नवकाव्याला प्रारंभ उशीरा झाला असला तरीहि महाजन, पद्माकर, कोरेकल, कात, गाडगीळ इत्यादि काव्य-लेखकानी त्या प्रातात आपल्यास काही स्थान करून ठेवलें आहे. गोमतकांत बोरकरानी प्रादेशिक वातावरण काव्यातहि आणून सोडलें आहे. व कोंकणातील आनंद कवींनी आपल्या नाविक गीतानी कोकण प्रांतालाहि काव्याच्या नकाशामध्ये बसाविलें आहे. संख्येच्या दृष्टीने तरी वरील यादी कोणालाहि निराशाजनक वाटण्याचें कारण नाहीं. किंबहुना गेल्या शभर वर्षांत काव्यनिर्मितीच्या दृष्टीने गेलीं २५–३० वर्षेच अधिक फलदायी झाली असें या कालाचा आढावा घेणारास म्हणावें लागेल.

वर उल्लेखिलेल्या सर्व प्रकारच्या काव्याचा तपशीलवार परामर्ष घ्यावयाच्या आधी सर्वसामान्य कवींच्या कवितेचें स्वरूप कसें होतें हे सागणें सोईचें होईल. वैशिष्ट्यपूर्ण कविता सोडल्यास बहुतेकाच्या काव्यात प्रणयाचें प्राधान्य असे. हा प्रणय बहुधा बौद्धिक असून त्यात शारीरिक वर्णनास महत्त्व कमी असे व उत्तानता नसे. सयोगापेक्षा विप्रलंभच अधिक येई व साहजिकच थोडा निराशेचा आणि रडवा सूर असे. यामुळेच त्यावर स्त्रैण-त्वाचा आरोप आलेला आहे. या प्रणयकाव्याच्या जोडीला कांही शारदेच्या नमनपर, काही सृष्टिवर्णनपर, काही शिशुगीते, कांही गझल्, काही सुनीते, काही जानपदगीतें अशा प्रकारचें मिश्रण अनेकांच्या काव्यात आहे. यात बरीच छाप रविकिरणमंडळाची असे, किंवा ताबे याची आहे. बालकवि याचे अनुयायी फारच थोडे, गोविंदाग्रज किंवा टिळक याचें अनुकरण त्यापेक्षा अधिक, तथापि एकंदरीने कमीच झाले. केशवसुताप्रमाणे स्फुट मात्रावृत्तात्मक, परतु गझल् सुनीतें, जानपदगीतें इत्यादि प्रकारचें काव्य रविकिरण-मंडळाच्या धर्तीवर बरेंच झालें. नतर ताबे याच्या पद्धतीने गेय, पदाच्या चालीचें, नाट्यगीतात्मक, थोडें गूढगुंजनात्मक काव्य होऊं लागलें. सर्व-सामान्य कवीचा काव्यसंभार हा असा असे. ज्यानी कांही वैशिष्ट्य दाखविलें

त्यांचा उल्लेख किंवा निर्देश यथाकाल होईलच. आता विविध काव्यप्रकाराचा परामर्ष घेऊं.

खंडकाव्यः—स्फुट काव्यरचना हा नवीन युगाचा विशेष समजला जातो व योग्यहि आहे. तथापि वाटतें तितकी निर्भेळ स्फुट-रचना प्रस्तुत कालखडात झाली नाही. किंबहुना एका प्रकारच्या प्रदीर्घ काव्यरचनेकडे कविजन याच कालांत वळले, व तो म्हणजे सामाजिक खंडकाव्यांचा प्रकार होय. खंडकाव्य या शब्दाचा अर्थ बराच अनिश्चित आहे, तथापि कांही कथा असलेलें दीर्घ काव्य म्हणजे खडकाव्य असा त्याचा सामान्य अर्थ करिता येईल. सामाजिक खंडकाव्यें याचा अर्थ समकालीन समाजाचीं चित्रें काढणारीं खंडकाव्यें असा होईल. पौराणिक किंवा ऐतिहासिक खंडकाव्यें प्रस्तुत कालाच्या आधी जशीं लिहिलीं गेलीं तशीं याहि कालात लिहिलीं जात. दख्खनचा वीर व पावनखिड (हिंगणेकर), सतीचा शाप आणि तारागड (निफाडकर), तिवारी याची झाशीची राणी लक्ष्मीबाई, मनोहर-लीला, महाराणा प्रतापसिह इत्यादि खंडकाव्ये व सर्वांत महत्त्वाचें सावरकरांचें गोमान्तक हीं या कालातील ऐतिहासिक खडकाव्यात येतात. विरहिणी राधा (रेदाळकर), प्रसन्नराधा (तिवारी) गृहविहार (साधुदास) इत्यादि पौराणिक खडकाव्ये याच कालात झालीं. परतु आजकालच्या समाजावर लिहिलेलें अभागी कमल (गिरीश) हेंच खरें पहिलें लोकप्रिय खंडकाव्य होय. त्यात विधवेच्या अनुकंपनीय जीवनाचा विषय घेतला आहे आणि तो इतका परिणामकारक ठरला की त्या प्रयत्नाचे अनुकरण तात्काल होऊ लागलें. 'लीलेचा ससार' (घारपुरे), सरला बाला (आपटे), जानकी (मनाठकर) इत्यादि उदाहरणे याची म्हणता येतील. गिरीशाच्या दुसऱ्या खडकाव्यात (आंबराईमध्ये) खेडेगांवातील एका होतकरू पण अभागीला लागलेल्या शेतकऱ्याचें चित्र आलें आहे, तर यशवंताच्या बंदीशाळा या खंडकाव्यात 'Reformatory' मध्ये आलेल्या लहान मुलाच्या जीवनाचें करुणरम्य चित्र काढलें गेले आहे. पाठक (या. मु.) याचें 'शशि-मोहन' हें काव्य बंगालमधील एका सत्यकथेवर आधारलेलें व ओजस्वी असें काव्य आहे. यातील नायकाने एका सतीचें एका मुसलमान गुंडापासून संरक्षण केलें आहे. अनंततनयाच्या ओवीबद्ध तिलकविजयात एका सम-

कालीन व्यक्तींचें चरित्र जुन्या काव्यपद्धतीने सांगितलें आहे. टिळकांचें ख्रिस्तायन पौराणिकच म्हणावें लागेल. प्रेमप्रधान खंडकाव्यात विरहतरंग ( मा. जू. ) व जयमंगला ( यशवंत ) यांचें स्थान वरचें आहे. अ. ज. करंदीकरांच्या चंद्रप्रभेचे दोन भाग म्हणजे केकावलीच्या धर्तीवर लिहिलेले वैदग्धपूर्ण पण क्लिष्ट रसिकतेचे दोन उत्तम नमुने होत. प्रेमकाव्यांच्या प्रणालींतच प्रेमांजलि ( मुकुंद मराठवाडा ) हें काव्य घालावें लागेल. विरहतरंगाचे निकृष्ट अनुकरण म्हणून कॉलेजियन् ( नातू ) हे काव्य पाहावें. प्रदीर्घ काव्यात, परंतु उपहासात्मक लेखनात पटवर्धनांचीं सुधारक आणि नकुलालंकार हीं काव्यें येतात. उपहास नसला, तरी थट्टा ज्यांत भरली आहे असे ' कॉलेजचें विश्व ' हे रचनेबाबत सुधारकाचें अनुकरण करणारें दीक्षित यांचें काव्य उल्लेखनीय आहे. मायदेव यांची ' गरीबाची गोष्ट ' कित्येकांनी गरीब ठरविली असली तरी 'सुधा' मात्र तशी नाही. साठे यांच्या ' तो आणि ती ' मध्य आधुनिक शिक्षित व नोकरी करणारें जोडपे यांचा संसार चित्रित झाला असला तर त्यांच्याच ' शिलगण ' या काव्यांत खेडेगावचें चित्र आलें आहे. आधुनिक कवि हे कच्च्या दमाचे कवि आहेत किंवा असतात असा जो आरोप त्यांच्यावर करण्यात येतो त्याचें निराकरण अल्प प्रमाणात तरी वर उल्लेखिलेल्या काव्यग्रंथांच्या यादीवरून येईल. ( ही यादी संपूर्ण नाहीच. ) मोठमोठीं महाकाव्यें नसलीं, तरी प्रदीर्घ काव्यें आधुनिक कवीहि लिहू शकतात, एवढी गोष्ट यावरून सिद्ध व्हावयास प्रत्यवाय नाही. प्रश्न दमछाकीचा नसून सारखे लांबलचक लिहीत असता काव्यगुणापेक्षा पद्यरूपी गद्यच अपरिहार्यपणें पदरात पडण्याचा संभव असल्याने ते आधुनिक कवि फारसे करू इच्छित नाहीत एवढाच आहे.

या खंडकाव्यात रचनाप्रकाराची विविधता बरीच आहे. कित्येक सर्गात्मक अशा अनेक दीर्घखंडांचीं झालेलीं असतात. उदा० अभागी कमल, आंबराई, बंदीशाळा वगैरे. कित्येक यापेक्षा लहान अशा, परंतु निरनिराळ्या लांबीच्या खंडांचीं झालेलीं आहेत. उदा० विरहतरंग. काही ठराविक लांबीच्या, परंतु लहान लहान खंडांचीं बनलीं आहेत. ' तुटलेले दुवे ', ' कॉलेजियन् ' हीं सुनीतात्मक खंडकाव्ये अशीं आहेत. ' जयमंगला ' हें यशवंतांचें खंडकाव्य लहान लहान वीस-बावीस भावगीतांचें आहे व यामुळें तें रचनादृष्ट्या

वैशिष्ट्यपूर्ण म्हणावें लागेल. 'चंद्रप्रभेंत' कथा अशी नाहीच व प्रत्येक श्लोक जवळजवळ स्वतंत्र असा आहे. पण काव्याचा विषय प्रेम, आणि नायिका, एकच आहे. ' कला ' हे एकाच वृतात एकाच खंडात संपविलें असलें व बहुधा खंडकाव्यास एकच वृत्त मराठीने स्वीकारले असलें, तरी ' काव्यकिरीटा ' मध्ये ( यशवंत ) अनेक वृत्ते खेळविलीं आहेत. गोमातक या काव्यात दोनच मोठे, पण दोन भिन्न वृत्तातील खंड आले आहेत. या प्रत्येक खंडाची लांबी सामान्य सर्गापेक्षा पुष्कळच मोठी आहे. साराश, प्रदीर्घ काव्यलेखनात अत्यत विविध अशी रचना झाली आहे.

प्रदीर्घ लेखनात पोवाड्याचा उल्लेख व्हावयास हवा. नवीन काव्यात याचा विचार बहुधा होत नाही याचे कारण त्यांचें जुनें बाह्यस्वरूप होय. त्याची निर्मिति आज झाली असली तरी त्यानी वेष जुना घेतलेला असतो. अशा कवींत शाहीर खाडीलकर याचा उल्लेख प्रथम करावयास हवा. एम्. ए. ची पदवी मिळवूनहि त्यानी काव्यलेखनाचा हा जानपद मार्ग स्वेच्छेने स्वीकारला आहे. शाहीर मुळे, मुचाटे, जामखेडकर याची रचनाहि बरीच आहे. कुणबाऊ भाषा, अशुद्ध रचना व पोवाड्याची एकच एक चाल याचा अगीकार करून कृत्रिमरीत्या एक जुना काव्यसप्रदाय चालविण्याची आज आवश्यकता किती आहे याविषयीं दुमत होईल. तथापि या रचनेंत काव्यगुण सापडत नाही असे म्हणता येणार नाही. ' बहुजनसमाजा 'त प्रचार करण्याच्या दृष्टीने याची उपयुक्तता कितीहि असली तरी नवकाव्यात त्याने काही फारसे अनुयायी मिळविलेले नाहीत. शिक्षित व पाढरपेशा काव्यवाचकवर्गात पोवाड्याना विशेष मान मिळत नाही असेंच दृश्य दिसून येतें. हें योग्य कदाचित् नसलें तरी स्वाभाविक आहे हें मान्य करावें लागेल.

दीर्घ काव्याकडून स्फुट काव्याकडे वळल्यास अनेक काव्यप्रकार नजरे-समोर येतात. त्यात काही कालपर्यंत तरी जनमनाची ज्याने फार पकड घेतली होती तो प्रकार म्हणजे विडंबनाचा. यात शुद्ध विनोद किंवा उपहासहि येतो. उपहास—उपरोधाचा प्रकार गेल्या शतकातच श्री. मोगरे यानी यशस्वीपणे हस्तगत केला होता व केवळ विनोदहि गडकरी यानी काही प्रमाणात तरी काव्यात आणला होता. परतु ' संगीत हजामती ' सारखें अपवादात्मक असे स्फुटकाव्यविडंबन व बल्लवदूत हे मेघदूताचे विडबन ( ना. ग. लिमये )

सोडल्यास हा काव्यप्रकार रूढ व लोकप्रिय करण्याचें श्रेय श्री. प्र. के. अत्रे याना द्यावयास हवे. त्यांचीं ' झेंडूचीं फुलें ' मराठी वाङ्मयांत तरी चिरजीव राहतील. समकालीन कवि, विशेषतः रविकिरणमंडळातील कवि, यांच्या काव्यविषयक काही लकबींचें विडंबन करून त्या लकबी हास्यास्पद करणें या हेतूने प्रवृत्त झालेल्या या काव्यांतूनच सत्काव्याचें विडंबन शुद्ध विनोदार्थ करण्यात येऊं लागलें व क्वचित् अत्रे यांच्या कवितातूनहि वैयक्तिक हल्ले झाले. ' झेंडूचीं फुलें ' या संग्रहात विडंबनाबरोबर केवळ विनोदी कविताहि आल्या आहेत. अत्रे यानी योग्यप्रकारें मिळविलेल्या लोकप्रियतेमुळें या प्रकाराकडे अनेक उपकवींचें लक्ष वेधलें व काही वर्षें बहुतेक मासिकें-साप्ताहिकें यांतून विडंबनानी धुमाकूळ घातला. विडंबनकाव्य भावनादृष्ट्या विशेष लाभदायक नसतें. विडंबनाकडे प्रवृत्ति झाल्याने अत्रे यांची मूळ गंभीर काव्याकडे असणारी प्रवृत्ति नष्ट झाली. हा एक बिनभांडवली धंदा किंवा फारच झाल्यास उसन्या भांडवलावर चालविलेला धंदा म्हणता येईल. तथापि तो वाटतो तितका सोपा नाही हें कळत नाही. अशा अनेकानी या प्रांतात प्रवेश करून त्याचें स्वरूप गढूळ करून टाकलें आहे. त्यातल्या त्यात बरें यश मिळविलें असे कवि म्हणजे दीक्षित, बकुलराय, बाबुलनाथ हे होत. विडंबनाचा एक निराळाच नमुना म्हणून उपाध्ये यांच्या ' चालचलाऊ भगवद्गीता ' या कवितेचा उल्लेख करावा लागेल. सामान्यपणें विडंबनात गंभीर विषयास योजिलेली शब्दसामग्री क्षुद्रविषयवर्णनाकडे उपयोगात आणली जाते. तेथे उलट झालें आहे. विषय कृष्णार्जुनसंवादासारखा गंभीर, पण भाषा मात्र आजच्या खेळीमेळीने ग्राम्य शब्द योजणाऱ्या दोन मित्रांची. उपहासकाव्यात पटवर्धनाच्या दोन काव्यांचा वर उल्लेख आलाच आहे. बुद्धिनिष्ठा पद्धतीने व वरच्या पातळीवरून, पण बोचक शब्दामध्ये समाजव्यंगाचा मर्मभेद सुधारक काव्यात येतो, तर ' नकुलालंकारात ' क्लिष्ट व म्हणून थोड्यासच समजेल असा तीव्र उपरोध येतो. ' कॉलेजचे विश्व ' या दीक्षितांच्या काव्यात उपहास कमी, विनोदच अधिक आहे कॉलेजमधील एका विशिष्ट वर्गातील विद्यार्थ्यांच्या जीवनाचें चित्र त्यानी समरसतेने काढलें आहे. सध्या विनोदी काव्याचा भर ओसरला आहे. तथापि तो प्रकार रूढ झाला आहे व पुढेहि चालू राहील असे मानावयास अडचण नाही. देशी भाषांत इतरत्र कोठे या

प्रकाराला इतकें यश व महत्त्व प्राप्त झालें आहे की नाही याची शंका वाटते. ' उपहासिनी ' या नांवाचा एक प्रातिनिधिक संग्रहहि या प्रकारच्या कवितांचा प्रसिद्ध झाला आहे.

विडंबनाबरोबरच गझल आणि सुनीतें हींहि आपापली अमदानी गाजवून गेलीं व गझल आज कमी झाले असले तरी सुनीतांना अजूनहि बराच मान आहे. या दोनहि प्रकारच्या काव्यात पटवर्धनांना अग्रस्थान द्यावें लागतें. ' गज्जलांजलि ' या संग्रहांत त्यानी आपले शंभरावर गज्जल दिले आहेत, व सुनीताची तेवढीच संख्या ' तुटलेले दुवे ' या सुनीतसंग्रहांत आहे. रविकिरणमंडळातील आणि बाहेरील इतर कवींनी या दोनहि प्रकारची रचना केली आहे व एकंदरींत या प्रकारचें काव्य बरेंच समृद्ध झालें आहे. तथापि संख्येने आणि गुणानी पटवर्धनाचे हे दोन संग्रह श्रेष्ठ ठरतात याविषयीं दुमत होणार नाहीं. त्याचा रचनासाक्षेप, आणि भावनांची उत्कटता व सखोलता या गोष्टी क्वचितच एकत्र अशा दिसतात. केवळ गझलाचे किंवा सुनीताचे संग्रह थोडे, पण झालेले आहेत. सुनीतिका व सुनीतसंग्रह हे कुसुमाग्रजाधवाचे दोन संग्रह, सुनीतावलि ( अधिकारी ), सुनीतमाला ( मराल ) सुनीतगंगा ( नातू ) हे सुनीतापुरती साक्ष देणारे संग्रह होत. सुमंतांचा ' भावनिनाद ' हाहि एक प्रकारचा सुनीतसंग्रहच म्हणता येईल. गझलांचे संग्रह इतके न सागता आले तरी वि. वा. भिडे याच्यासारख्या पंडितानेंहि त्याचा आश्रय करावा ही गोष्ट त्याच्या कविप्रियतेची साक्ष देऊ शकेल. आज तरी त्याचें फारसें कौतुक होत नसलें तरी त्याचे काव्यप्रकार म्हणून स्थान निश्चित झालें आहे यात शंका नाही.

भावगीतांपासून वेगळा काढतां येणार नाहीं, तथापि ज्याचें स्वतंत्र वैशिष्ट्य मान्य करावयास हवे असा एक काव्यप्रकार म्हणजे नाट्यगीतें हा होय. यात कवीचें आत्मलेखन नसून परभावनेचेंच चित्र तो काढीत असतो. केशवसुतसंप्रदायांत आत्मलेखनाला जें प्राधान्य मिळालें, त्यामुळे त्यांच्यानंतर काव्यरचना करणाऱ्या बऱ्याच कवींनी स्फुट भावगीतांत तरी त्याचाच अंगीकार प्राधान्याने केला आहे. परभूमिकाप्रवेश करावयाचा झाल्यास तो दीर्घकथात्मक काव्यांत करावा अशी सामान्य समजूत होती; परंतु ब्राउनिंगच्या ' ड्रॅमॅटिक लिरिक् ' या प्रकारांत बसूं शकेल, अशी

रचना तांबे यानी मराठी भावगीतसंप्रदायात प्रामुख्याने केली. प्रेमिकांच्या अत्यंत विविध अशा भूमिका त्यांनी आपल्या भावगीतातून चित्रित केल्या आहेत. तांबे यांच्या या प्रकारच्या लेखनाने स्फूर्ति मिळून अनेकानी आपल्या भावनाबरोबर इतरांच्या मनोभावना रगवावयास प्रारंभ करून काव्याचे हेंहि अंग समृद्ध करावयास प्रारंभ केला आहे. या नाट्यगीतात सवादापेक्षा त्याचा अभावच असतो. क्वचित् एकमुखी संवाद असेल. या नाट्यगीताहून ' नाट्यकाव्य ' निराळें काढावें लागेल व अद्यापि तें व्हावें तितके प्रचलित झालें नसले तरी त्याला आरंभ झाला हे निश्चित. ' कपटवेष ' इत्यादि आपल्या नाट्यकाव्यानी वा. ना. देशपांडे यानी ही प्रथा मराठींत घालून दिली. कर्ण ( मर्ढेकर ) या नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या काव्याने त्या प्रथेकडे कवींचें लक्ष आहे असे दिसते. यात संवाद असतात, भावगीतापेक्षा अधिक कथानक आणि बरीच अधिक लांबी यात असते. नाट्याइतकेंच, किंबहुना अधिक असें कल्पना आणि भावना यानी पूर्ण असे काव्य यात असतें. म्हणून याला ' नाट्यकाव्य ' असे म्हणणें हें युक्त ठरतें.

जानपद, शिशु आणि स्त्रिया या वर्गांना अनुलक्षून झालेलें काव्य हा या प्रस्तुत कालखंडाचा आणखी एक विशेष आहे. शेतकऱ्याचें किंवा गुराख्याचे जीवन शहरी आकुंचित जीवनापेक्षा अधिक सुखाचें असते. या कल्पनेने याआधी काही कविता लिहिल्या गेल्या असल्या तरी जानपदगीताचें स्वरूप याहून भिन्न आहे. नागर लोकाना जानपदाच्या जीवनाविषयी वाटणारा हेवाच तेवढा त्यांत प्रतिबिंबित झालेला नसून त्याचें जीवन व त्याच्या भावना त्याच्याच भाषेंत सागण्याचा प्रयत्न यात होतो. 'भलरी', ' न्यारीचा वकूत ' इत्यादि कुणबाऊ भाषेंत लिहिलेलीं गीतें त्याच्या या नावीन्यानेच लोकप्रिय झालीं. याच दिशेने विशेष लेखन ग. ल. ठोकळ यानी केलें आणि तें यशस्वीहि झालें. जानपदाविषयीच व एकंदर खेडेगावच्या जीवनाविषयी, पण आपल्या नागर भाषेंत जिव्हाळ्याने लिहिणारे ग. ह. पाटील याचा व त्याच्या 'रान-जाई'चा उल्लेख येथे अवश्य करावयास हवा. जानपदगीताची मध्यतरी एक लाटच उसळली व तीमधून एक ' सुगी ' नावाचा संग्रहहि निर्माण झाला. 'किस्मतपूरचा जमीनदार' हें चंद्रशेखराचें काव्य, ' आबराई ' हें गिरीशाचें काव्य व 'शिलंगण' हें साठे याचें काव्य हीं जानपदांविषयीचीं काव्यें असलीं

तरी त्यास अर्थात् गीतें म्हणतां येत नाही. या जानपदात अलीकडे नाविकाचा समावेश होऊन कांही हृदयंगम नाविकगीतेंहि निर्माण झालीं आहेत. कोकणमधील आनंद ( बर्वे ) याचा इकडे विशेष ओढा आहे. शहरातील कामकरीवर्गाला मात्र यात विशेष स्थान मिळालेलें नाही. यापुढे कवींचे लक्ष तिकडे जाईल असे वाटतें. पण या सर्व काव्यात ग्रामीण जीवन सध्या जगणारे किंवा अगदी ग्रामीण जनामधले लेखक यानी लिहिलेलें काव्य फारच अल्प आहे. बहुतेक सारें नागर लोकानी आपल्या कल्पनेप्रमाणे लिहिलेलें. तेव्हा यात कृत्रिमता अपरिहार्यपणें येते. खरोखर जानपद किंवा कामकरीवर्गातील कवीच स्वतः रचना करू लागल्याखेरीज बाह्य रंगरूप कितीहि साधले तरी खरा जिव्हाळा कमीच येणार. इतरानी त्याच्या भावना दत्तक घेऊन कितीहि लिहिलें तरी ते फिकेंच ठरणार.

जानपदाप्रमाणे शिशु हाहि सध्या काव्यप्रातात मानाचें स्थान मिळवून राहिला आहे. शिशूकरिता कविता बालबोधमेवा-बालबोध, आनद, खेळगडी या मासिकातून येत होत्याच. पण त्यातील सारेंच खरें शिशुकाव्य नसे. शाळेंत अभिनयगीत म्हणूनहि ज्याचा उपयोग होतो त्यालाहि शिशुकाव्याचा उत्कृष्ट नमुना म्हणता येईलसें वाटत नाही. कारण त्यात काव्यापेक्षा अभिनयाचा भाग अधिक असतो. शिशूच्या भावना, त्याची मनोरचना लक्षात घेऊन, केव्हा त्याच्या भाषेत, केव्हा प्रौढ भाषेंत माडून प्रौढालाहि त्याविषयी विचार करायला लावील, किंवा त्याच्या खोल भावनाना जागृत करील असें काव्य उच्च ‘ शिशुकाव्य ’ म्हणता येईल. यात शिशूच्या ठिकाणीं क्वचित् आढळणारी प्रौढ बुद्धि मात्र त्याच्यावर लादण्यात येता कामा नये. या प्रकारात वैशिष्ट्य असे मायदेव यानी मिळविले आहे. म. श्री. पडित, ग. ह. पाटील व यशवंत ( मोतीबाग ) याच्या लेखनाचाहि निर्देश व्हावयाला पाहिजे. इतर बहुतेक कवींनी थोडीबहुत रचना या प्रकारची केली आहे व एकंदरींत काव्यदरबारात या प्रकारास मिळालेलें स्थान उपेक्षणीय नाही.

आधुनिक मराठी कवितेंत प्रणयाला प्राधान्य आहे या आक्षेपात तथ्य असलें तरी राष्ट्रीय कविता मुळीच झाली नाही असें म्हणतां येणार नाही. स्वदेशाच्या ऐतिहासिक वैभवाविषयी अभिमान आणि गतकालीन परिस्थिती-

विषयी दुःख हें त्याचे या कालातील स्फूर्तिकारण होय. त्याचा हेतु स्वातंत्र्य-साधनेला स्फूर्ति देणें हा आणि त्याचें स्वरूप वीररसानुकूल ओजस्वी रचना, असे आहे. पूर्वीच्या कालखंडात हे कार्य कवि विनायक, गोविंद व सावरकर यानी केलें. प्रस्तुत कालखंडांतहि गोविंदानी काही काव्य लिहिलें. त्यांत पूर्वीचा आवेश नसला तरी हें स्वरूप तेच राहिलें. त्याच्याच मंडळांतील, पण वाचन आणि बुद्धि या दोन्ही बाबतीत श्रेष्ठ असणारे सावरकर यांचें गोमान्तक महाकाव्य या कालखंडात पडते. हे महाकाव्यवजा खंडकाव्य आणि त्याचेच दुसरें कमला काव्य आणि त्याची इतर स्फुट रचना, ही प्रसिद्धच आहेत ऐतिहासिक व्यक्तींच्या पराक्रमाचें गीत खानदेशमधील तिवारी यानी 'मराठ्यांचीं संग्रामगीतें' व 'झाशीची राणी' यातून गाइले आहे. मराठवाड्यातील दीक्षित कवि हे याच वर्गात पडतात. हेंच कार्य यातील उपदेशाचे व अतिरिक्त आवेशाचे स्वरूप काढून टाकून अज्ञातवासी यानी आपल्या कवितेत केलें आहे. यांत नैराश्य अधिक असलें तरी काव्यहि अधिक आहे. याशिवाय कवि माधव याचाहि उल्लेख याबाबत येथे करावयास हवा. आजच्या कालांत या राष्ट्रीय काव्याचें स्वरूप अधिक व्यापक असे होऊं लागलें आहे. त्यातील धर्माभिमान व मराठेशाहीचा अभिमान यांनी व्यापक मानवता व भारताच्या स्वातंत्र्याची उत्कट इच्छा यांना जागा करून दिली आहे व दोन्हींचा समावेश क्रांति या शब्दात करून तिचेंच काव्य आजकालचे कवि गात आहेत. कुसुमाग्रज हे कवि यांत अग्रेसर म्हणतां येतील. त्याच्याबरोबर बरेच उदयोन्मुख कवि त्याच विषयाचा व प्रकाराचा अवलंब करीत आहेत. यात एक प्रकारचा ठराविकपणा येऊं पाहात आहे तो टाळल्यास काव्यदृष्ट्या तें अधिक योग्यतेचें होईल. आजच्या काव्यांत केवळ प्रेमाकडून ही दुसऱ्या दिशेने होणारी प्रगति विशेषत्वाने दिसते. मात्र लोकप्रिय होण्याचा हा एक जवळचा मार्ग आहे असे दिसून इतर कांही काव्यप्रकारांबाबत झालें तशी बाजारबुणग्याची भरती यात होता कामा नये. नाही तर क्रांतीची थट्टा व्हावयाला वेळ लागणार नाही.

केशवसुतांनी आरंभिलेल्या आणि गोविंदाग्रजानी सवार्धिलेल्या गूढगुंजनाच्या प्रथेस कांही नवीन अनुयायी या कालांत मिळाले व ही प्रथा चालू आहे असें म्हणावयास हरकत नाही. केशवसुत आणि गोविंदाग्रज याचें गूढ-

गुंजन जुन्या तत्त्वज्ञानाच्या आश्रयाने झालें, तसे मात्र तें या नव्या कालात झालें नाही. यांतला बराच भाग गौडीय कवि रवीन्द्रनाथ ठाकूर याच्याकडून आला व कांही इंग्रजी कवि ईलियट्–सिटवेल् याच्यामार्फत आला असें दिसतें. रवीन्द्रनाथ-संप्रदाय विदर्भात विशेष प्रचलित असून वा. ना. आणि आ. रा. देशपाडे हे त्याचे प्रमुख प्रतिनिधि दिसतात. 'फुलवात' या आपल्या काव्यसंग्रहास प्रस्तावना लिहून आपल्या काव्यातील गूढगुंजनाची मीमासाहि आ. रा. देशपाडे यानी केली आहे. विदर्भामधील इतर देशपाडे मंडळींहि (गु. ह. देशपाडे, पु. य. आणि विमलाबाई देशपाडे) त्या संप्रदायात आहेत. दक्षिणेकडे विरागी (मधुसंभार) आणि सुमंत (भावनिनाद) यानीहि अशा प्रकारचें लेखन केलें आहे. इंग्रजी वाङ्मयातून हा गूढगुंजनसंप्रदाय मराठींत उतरण्यास कारण झालेल्या कवींत फुलोराकर्ते पु. शि. रेगे व शिशिरागमकर्ते मर्ढेकर हे आहेत. परंतु एकंदर महाराष्ट्रीय जनता व्यवहारी असल्याने व आपल्या भावनाचे कोडें करणें हें तिला रुचत नसल्याने बहुधा या प्रकाराचे फारसे कौतुक होत नाही. कविजनात या लेखनाचा उपहास पटवर्धनानी केलेला आहे हेंहि याचें द्योतक आहे. स्वतः अनिलाच्या लेखनातलें गूढगुंजनहि कमी झालें आहे. हें गूढगुंजन त्याचें क्षेत्र एकीकडून गद्यकाव्याने आणि दुसरीकडून मुक्तच्छंदाने आत्मसात् करावयास प्रारभ केल्यानेहि, पद्यात आता कमीच होत आहे.

मराठीमधील गद्यकाव्याची प्रथा याच कालात सुरू झाली. मात्र त्याला कारण परभाषेतील एक कृति झाली. बगाली कवि रवीन्द्रनाथ याची 'गीतांजलि' मूळ पद्यात असूनहि तिचें इंग्रजी भाषातर गद्यात प्रसिद्ध झाले व मराठी कवींनी तें गद्यातच वाचलें. त्यानंतर त्याचीं दोन गद्य भाषातरें (आपटे व कानिटकर) झालीं. या गद्यामध्येहि जें काव्य मराठी वाचकास वाचावयास मिळालें त्याचा (किंवा मूळ इंग्रजी गद्याचाहि) जो परिणाम झाला त्यातून या गद्यकाव्यप्रथेस बहुतांशीं जन्म मिळाला. मराठी कवींनीहि गद्यकाव्यलेखनास प्रारंभ केला. काहीं गूढ हळुवार ओढणी हे या काव्यातील विषयाचें वैशिष्ट्य होय, व त्या विषयाला साजेल अशा नेमक्या, ललित, हळुवार शब्दांची रचना, लहान लहान दोन दोन, तीन तीन

वाक्यांच्या परिच्छेदात करणे हे त्यांचे बाह्य स्वरूप होय. या काव्यास कथा किंवा प्रसंग फारच अल्प पुरतो. भावनाविवशता ही मुख्य आवश्यकता आहे. गूढगुंजन अर्थात् आलेच. सरळ भावव्यक्ति पद्यात झाली तरी गद्यासारखी वाटते, मग गद्यलेखनात तर खासच वाटेल. ती तशी न वाटावी एतदर्थ गद्यकाव्यास रूपकाची जोड देण्यात येते. या साऱ्या प्रकारात बराच ठराविकपणा येतो व अनेकदा त्यामुळे त्यात बरेंच काव्य असूनहि त्याला फारसा मान मिळत नाही. या प्रथेस साधारण प्रारंभ बळवंत गणेश खापर्डे यांनी आपल्या 'काव्यकातारातील फुलां'नी केला हेंहि विदर्भातीलच. विदर्भातील या लेखनाचा प्रतिध्वनि म्हणून नसला तरी बहुधा गीतांजलीच्या वाचनाने मध्य महाराष्ट्रातील काही कवींनी तशी रचना केली आहे. यात शशांक अथवा दाभाडे ( पूर्वी औंधचे ) यांच्या मरीचिकेचा उल्लेख केला पाहिजे. कोल्हापुरास कादळगावकर यांनी 'लहर' व 'हृदयभाव' या आपल्या पुस्तकातून याचा अवलंब केला आहे. असेच पडसाद कराचीला शंकर साठे ( 'पदवी' ) आणि इंदूरचे चिं. ब. लेले ( भावनातरंग ) यांनीहि काढले आहेत. या गद्यकाव्याचें रूपांतर नवीन रूपककथेमध्ये झालें आहेसें वाटतें. फरक इतकाच की गद्यकाव्यात आत्मनिष्ठता अधिक, आणि रूपककथेमध्ये ती कमी असते. संस्कृतप्रचुरता, गूढगुंजन, गायनप्रतिकूलता यामुळे या गद्यातील काव्याचे ग्रहणहि सर्वजनसुलभ होत नसल्याने हा काव्यप्रकार विशेष लोकप्रिय होण्याचे चिन्ह नाही. मुक्तच्छंदाने पद्यरचनेचा खटाटोप कमी केला आहेच, व रूपककथेनेहि गद्यकाव्याच्या क्षेत्रावर आक्रमण केले आहे. अशा स्थितींत या प्रकारास फारसे अनुयायी मिळतील असे वाटत नाही. नावीन्याची मौजहि आता त्यात उरली नाही.

मुक्तच्छंदाची लोकप्रियता, म्हणजे कविप्रियता, वाढत आहे असें दिसतें. मुक्त असूनहि तो छंद आहे हे सामान्य वाचकाच्या लक्षात येत नाही व तें गद्यच आहे, असे त्याला वाटू लागते. गद्यहि बरें, कारण त्यात सलग संबंध वाक्ये तरी सरळ वाचावयास मिळतात. मुक्तच्छंदाला चरणाच्या लांबीचें वा संख्येचे, गणमात्रासंख्येचे किंवा यमकाचेंहि बंधन नसल्याने जे एक अल्प बंधन आहे ते वाचकाच्या लक्षात येत नाही. ५ वा ६ अक्षराचे गण, मात्राविचार लक्षांत न घेतां, सोईचे वाटतील तसे एकापासून तीनचारपर्यंत

एका चरणात म्हणजे ओळींत लिहून, अर्थदृष्ट्या कोणत्याहि ओळीशीं थाबलें पाहिजे असा बध न पाळता, अर्थ संपला की वाक्य वा परिच्छेद सपविता येतो अशी ही रचना गद्यापेक्षा वेगळी न वाटून तिचे सगीत कळत नाही. त्यातूनहि यमक असतें तर काही साहाय्य झालें असतें. याचा प्रथम पुरस्कार विदर्भातील कवि वा. ना. देशपाडे आणि आ. रा. देशपाडे यानी केला. अनिल कवींनी तर त्याचा पुरस्कार प्रचारापर्यंत नेला. ‘ पेरीना ’ व ‘ भग्नमूर्ति ’ ही दोन काव्ये लिहून त्यानी विरोधकाचीहि या छदाच्या काव्य-क्षमतेबद्दल खात्री पटवून दिली. त्यानतर खुद्द विदर्भात जरी याचे अनुकरण विशेष होत नसले तरी महाराष्ट्रात इतरत्र त्याला अनुयायी मिळू लागले आहेत. त्यात ‘ हिमसेक ’ कर्ते पु. शि. रेगे याचा यशस्वी लेखक म्हणून उल्लेख करता येतो. यशवत आणि काळेले ( इदूर ) यानीहि क्वचित् त्याचा आश्रय केला आहे. ना. ग. जोशी ( अहमदाबाद ) याच्या आगामी विश्व-मानवातहि त्याचा उपयोग केलेला दिसतो. पण रेगे याच्या काही कविता सोडल्या तर या मुक्तच्छदाचा उपयोग गभीर विवेचनात्मक प्रतिपादनाकडेच होत आहे. विचारप्रधान, पण भावनेने रगविलेले असे काव्य किंवा प्रतिपादन लिहावयाचें असल्यासच मुक्तच्छद लिहावा अशी समजूत होऊन बसते की काय अशी भीति वाटते. मुक्तच्छदाने मराठी काव्याला लागलेली ओहोटी सपून ते विपुल व समृद्ध व्हावे असे वाटत असेल तर अशी समजूत होऊ देता कामा नये. मुक्तच्छंद कोणत्याहि भावनेस पोषक होतो असे दाखवावयास हवे.

जिला त्रुटित कविता असें नाव देता येईल अशी रचनाहि प्रस्तुत कालात एक प्रकारचे वैशिष्ट्य मिळवून बसली आहे. भावगीत हेच आधी स्फुट काव्य आहे, पण त्यापेक्षाहि अल्प अवकाशात एखादी भावना किंवा विचार मनोवेधक पद्धतीने माडणे हे या काव्याचें मुख्य कार्य आहे. यातील एक प्रकार श्री. नी. चापेकर याच्या ‘ एकावली ’त दिसतो. दुसरा अधिक लोकप्रिय प्रकार म्हणजे ‘ कणिका ’ चा. चार किंवा पाच ओळी भूपति जातीच्या योजून एक एक भावकल्पना थोडक्यात यात माडून दाखविलेली असते. गोपिनाथ तळवळकर यानी रवीन्द्राच्या कणिका-वरून या मराठींत आणल्या, त्याचा उपयोग निकुम्भ आदि नवीन कवि यशस्वीपणें करीत आहेत. उमरखय्यामच्या रुबायाचीं भाषान्तरें करून जवळ

जवळ हाच प्रकार पटवर्धनानी मराठींत आणला. ‘ जीवनलहरी ’ या नांवाने कवि कुसुमाग्रज यांनीहि प्रेमविषयक अशाच सुट्या सुट्या भावना प्रथम मांडिल्या व आज त्या वृत्ताच्या आश्रयाने सदृश अशी प्रेमभावनाविष्कृति होत आहे. पंडित सप्रे यांनी खोचदार अशा पाचसात ओळींत त्रुटित कवितांचा संप्रदाय सुरू केला होता. आधुनिक लघुकथाचें पर्यवसान जसें लघुतम कथेंत झालें आहे तसेंच काहीसें विनोदी उपरोधात्मक भावगीतांचे पर्यवसान या सप्रे यांच्या त्रुटित कवितांत आढळते. लघुतम कथेप्रमाणे यांतहि कलाटणी असते. स्वतः पंडित सप्रे यांनी याला रेखीव आणि निर्दोष स्वरूप देण्याचा फारसा प्रयत्न केला नाही, व असे लेखन करावयाचे सोडूनहि दिलेलें दिसतें. म्हणून आज त्या इंग्रजी ‘ एपिग्राम ’सारख्या काव्याचा व्हावा तसा परिपोष झालेला दिसत नाही.

नवीन काव्याच्या उदयाबरोबर भाषान्तरित काव्य बहुधा अस्त पावलें. कसेंहि असले तरी आपलें स्वतंत्र असें पाहिजे ही भावना याच्या मुळाशीं असेल. प्रस्तुत कालखंडांत भाषान्तरित रचना थोडी झाली आहे. पण भाषांतरांत कोणत्याहि प्रकारचा कमीपणा नाही, उलट ते काम अवघड आहे हे सांगण्याकरितांच जणू काही पटवर्धनांनी उमरखय्यामच्या रुबायांचें दोन वेळा भाषांतर केलें; एकदा मूळ फारशीवरून व एकदा फिट्झ्जेरल्ड्च्या इंग्रजीवरून. रुबायामुळे भाषान्तरकौशल्याची कसोटी लागते असें वाटून ज. के. उपाध्ये आणि अ. ज. करंदीकर यांनीहि त्यांचीं भाषांतरे केलीं आहेत. संस्कृतमधील भाषान्तरकसोटीचा ग्रंथ मेघदूत होऊन बसला आहे. पूर्वी चारपांच भाषांतरें झाली असूनहि सॉ. सबनीस यांनी पुनः एकदा त्याचा अनुवाद केला व आणखीहि एक अनुवाद अद्यापि अप्रकाशित आहे. कालिदासाच्या कुमारसंभवाचे आणि जयदेवाच्या गीतगोविंदाचें अशीं दोन भाषांतरें करून डॉ. श्रीखंडे यांनीं या काव्यवाङ्मयांत महत्त्वाची भर घातली आहे. इंग्रजीमधून श्री. ग. रा. हवलदार यांनी गोल्डस्मिथच्या ‘ डेझर्टेड् व्हिलेज् ’ या काव्याचें भाषांतर केलें आहे. भाषांतरें नव्हेत, पण रूपांतरें म्हणून चंद्रशेखराच्या ‘ काय हो चमत्कार ’, ‘ रंगराव हर्षे व चिंतोपंत उदास ’ इत्यादि कवितांचा अवश्य निर्देश व्हावयास हवा. गीतांजलीच्या दोन गद्य भाषांतरांबरोबरच मूळ बंगालीवरून मराठी भाषांतर

करण्याचा प्रयत्न श्री. ऋग्वेदी यानी अभगछंदामध्ये केला आहे. तथापि सर्वसामान्यपणें असे म्हणता येईल की, मराठी काव्यानें भाषातराचा उपयोग पागुळगाड्याप्रमाणें करावयाचें केव्हाच सोडून दिलें होतें. आता जीं भाषातरे झालीं तीं केवळ हौसेखातरच झालीं.

काव्यलेखन करण्यापेक्षा काव्याचा विषय होऊन राहणें हेच अधिक सोपें आणि सोईचें आहे असें अद्यापीहि स्त्रियाना वाटत असावें असें दिसतें. कारण पुरुषाच्या मानाने काव्यात आत्माविष्कार करणाऱ्या किंवा करू शकणाऱ्या स्त्रिया संख्येने फारच थोड्या झाल्या आहेत. प्रस्तुत कालातील पहिल्या दशकात मनोरमाबाई रानडे आणि कमळाबाई देशपांडे, आणि पुढील कालात संजीवनी मराठे आणि इंदिरा सत अशीं हाताच्या बोटांवर मोजण्याइतकींच नावें या स्थळीं उल्लेखयोग्य दिसतात. काव्यामुळे कवीबरोबर विवाह झाल्याचीं जीं काही दोन-तीन उदाहरणें या कालात महाराष्ट्रात झालीं त्यात रानडे आणि सत या पतिपत्नींचा अतर्भाव होतो. तथापि सर्वसामान्य कविजनात अव्वल रागेमध्ये बसण्याजोगी कामगिरी सौ. रानडे याची झाली नाही व सौ संत याची अजून व्हावयाची आहे. ‘ श्री-मनोरमें ’ त सौ. रानडे याच्या ज्या कविता आल्या आहेत, त्याचा मुख्य विशेष म्हणजे त्यामध्ये व्यक्त होणारें उत्कट पतिप्रेम हा होय. ही प्रेमभावना त्या साध्या सरळ शब्दात आणि रचनेचा साक्षेप बरा साभाळून व्यक्त करू शकत. पण या सामान्य परिणामापलीकडे मराठी काव्यलोलुपास डोलवील व लक्षात ठेवावयास लावील असे लेखन त्याच्या हातून झालें नाही. श्री. क. देशपाडे याचीं ‘ जीवितकोडें ’ ही कविता एकेकाळीं बरीच परिचित अशी होती, पण तिच्याखेरीज इतर लक्षणीय असे काव्य त्यानीहि लिहिलें नाही. सजीवनीबाईंनी आपल्या ‘ काव्यसंजीवनी ’ च्या द्वारें काव्यप्रान्तात मानाचा प्रवेश करून घेतला आणि अलीकडे ‘ राका ’ या संग्रहाने आधी मिळविलेल्या यशात भर टाकली. काव्यगायक या नात्याने त्यांची पदवी उच्च असल्याने त्याचें काव्यहि गायनानुकूलतेच्या दृष्टीनेच अधिक लिहिलें गेलें आहे. बहुतेक सारी रचना ताबे-पद्धतीची झाली आहे, व शब्दाचा मोह व कल्पनाचा ठराविकपणा यातून यानी आपली मुक्तता करून घेतल्याशिवाय त्याच्या काव्यास वैशिष्ट्य प्राप्त होईल असे वाटत नाही. तथापि

विषयाची निवड, आवश्यक तो भावनास्पर्श आणि रचनेचा संक्षेप या तीनहि दृष्टींनी कवयित्रीमध्ये त्यानी आपलें स्थान वरचे करून घेतले आहे. सौ. संत यांच्या काव्यात वैशिष्ट्य आहे. साध्या ओवी-अभंगादि वृत्तामधून लहान, मधुर, पण बऱ्याच खोल आणि चिरंजीवी भावनाना समुचित शब्दात ग्रथित करून ठेवण्याचें कसब त्याना चांगलें साधले आहे. ‘ सहवास ’ या पतिपत्नींच्या द्विदल ग्रंथात आपल्या विवाहपूर्व आणि विवाहोत्तर सहवासामधील रम्य अशा भावनिक अनुभवाचीं त्यानी काढलेलीं चित्रे सुंदर आहेत. त्यात ठराविकपणा नाही, कोणाचे अनुकरण नाही. त्यामुळे तीं वैशिष्ट्यपूर्ण झालीं आहेत. नवीन पद्धतीचे काव्य लिहिणाऱ्यात विमलाबाई देशपांडे, मनोरमाबाई नावलेकर, शान्ता परदेशी, पद्मा, इंदुमती इत्यादि नावे आहेत. पण त्यांच्या लेखनात वैशिष्ट्य नाही. जुन्या पद्धतीची रचना अनेक म्हणजे निदान २५-३० स्त्रियांनी केली आहे. स्त्रीगीतमाला, मानसगीतसरोवर, भक्तिपर गाणीं यासारखी रचना यात येते. पण एकंदरींत या कालात कादंबरी व लघुकथा या वाङ्मयप्रकारात जितक्या यशस्वीपणे आणि जेवढ्या प्रमाणात स्त्रियानी आपला भाग उचलला त्या मानाने काव्यात माव उचलिला नाही असे म्हणण्यात चूक होणार नाही.

भक्तिपर काव्यास मात्र आधुनिक कालात फारच ओहोटी लागलेली आहे. दासगणूसारखे जुने कवि याहि कालात रचना करीत असले तरी ते या कालाचे प्रतिनिधि म्हणून नसून जुन्या जमान्याचा अवशेष म्हणूनच होय. नवीन कवींत भक्तीचा भाव कमीच वाटतो, तो केव्हा केव्हा अभंगाच्या स्वरूपात व्यक्त होत असतो. गडकरी, पटवर्धन, गिरिश इत्यादि आधुनिक कवींनी अभंगाचा उपयोग केला आहे. आणि चांगल्या प्रकाराने केला आहे. तथापि हे अपवाद होत. नाही म्हणावयास ना. वा. टिळक यानी आपल्या अभंगांजलींत व त्यानंतर वा. भा. पाठक यानी आपल्या ओंढणींत केलेला अभंगाचा उपयोग बऱ्याच मोठ्या प्रमाणात आणि उत्कट भावनादर्शक आहे. भक्तिभावनेपेक्षा जीवनाविषयीची चिंतनशील वृत्ति कित्येकात प्रबळ आहे. पाठक यांचीच ‘ प्रवासी ’ व ‘ मानवता ’ हीं काव्यें या प्रकारचीं आहेत. ना. ग. जोशी ( अहमदाबाद ) यांच्या ‘ जीवनयोगा ’त हीच वृत्ति दिसून येते. ‘ भग्नमूर्ति ’ या काव्याचा अंतर्भावहि

चिंतनपर काव्यांत व्हावयास हवा. पण या प्रकारचे काव्य सामान्य जनाच्या आवडीच्या कक्षेबाहेर पडते व म्हणून त्याचें वाचन व स्वागत त्याच्याकडून व्हावें तसें होत नाही. तथापि काव्याला असे अवघड विचार पेलतात ही गोष्ट या काव्यातून दिसून येते हा लाभ कांही कमी नाही.

आधुनिक काव्याचा विचार करीत असता मध्य महाराष्ट्रीयाकडून मराठवाड्याकडे दुर्लक्ष होते. दूरच्या इंदूर—ग्वाल्हेरकडील कवींचा परामर्श होतो, पण जवळचा मराठवाडा आपणास दूरचा वाटतो. याला राजकीय कारणें आहेत हे खरे, पण भाषेचे बंधन अधिक प्रभावी वाटावयास हवे. या प्रदेशात नवकाव्यास आरंभच मुळी १९२० नंतर झाला. त्याच्या दृष्टीने संक्रमणकाल हाच आहे. हे संक्रमण होण्यास इतका काल लागला तरी या लोकानी सुरुवात केली ती एकदम पुढूनच केली. केशवसुताच्या-पेक्षा त्याच्या पाठीमागून आलेले किंबहुना १९२० नंतरचे कवीच त्याच्यापैकी अनेकांना स्फूर्तिदायक ठरले. नवकाव्यातील बहुतेक सारे प्रकार त्यानी चटकन् उचलले. मोगलाईत असूनहि फारशीचा फारसा परिणाम जसा त्याच्यावर झालेला नाही, तसेंच मराठवाड्याचे प्रादेशिक असे स्वरूपहि त्यात उतरले नाही नांदेड हे त्याच्या नवीन काव्याचे केंद्र होय. त्याखाली हैद्राबाद. गज्जलाचा प्रचार कमीच आहे. याच्यातील सध्याचे ज्येष्ठ कवि यशवंतराव कोरेकल हे मात्र जुन्या वळणाचे कवि आहेत. हे मूळचे उर्दू लेखक असून त्यानी पुढे मराठीत काव्यरचना केली हे लक्षात घेण्याजोगे आहे. आपल्या ' काव्यकुसुममाले 'च्या तीन उद्भवात अनेक वृत्तामध्ये तत्त्वज्ञानपर आणि उपदेशपर अशी कविताच त्यानी प्रसिद्ध केली आहे. हे ' उद्भव ' वृत्तचर्चेकरिता, निदान त्याची उदाहरणें द्यावीं म्हणूनच, लिहिले गेले की काय असेहि वाटते. नवकवींत व्यक्तित्वाच्या दृष्टीने नांदेडचे महाजन हेच श्रेष्ठ आहेत. हे व पद्माकर हे कीर्तनाच्या व्यवसायातले कवि. दोघे मनोरचनेने जुने, पण काव्यरचनेमध्ये नवे असे आहेत. गाडगीळ ( हैद्राबाद ) याची कविता इकडील कोणत्याहि आधुनिक काव्यसंग्रहात बसू शकेल अशा वळणाची आहे. श्री. दीक्षित हे खानदेशा-तील तिवारींप्रमाणें राष्ट्रीय काव्य-रचना करणारे कवि आहेत, तर श्री. पोहनेरकर मराठवाड्यातील आधुनिक शाहीर होत. नांदापूरकर हे तिकडचे

निसर्गकवि होत म्हणजे यांचा सप्रदाय बालकवींचा. मनाठकर ( जानकी ) आणि बिदरकर ( प्रेमाजलि ) हे प्रेमविषयक खंडकाव्याचे लेखक होत; पण सामाजिक बंडखोरी आणि क्राति यावर लिहिणारे कात ( फटत्कार ) हे एकच कवि होत. उशीरा आरंभ करूनहि मराठवाड्यांतील आजचे हे कवि आजच्या इकडील मराठी काव्याच्या पाठीमागे नाहीत. त्याच्या काव्यास योग्य ती प्रसिद्धि मिळाली असती तर आजच्या एकंदर काव्यात त्याचें स्थान अधिक निश्चित करता आलें असतें.

आतापर्यंत ज्या कालातील काव्याचे समालोचन आपण केलें त्या काला-मध्ये काव्यप्रान्तात रविकिरणमडळाने जेवढें कार्य केलें तेवढें व्यक्तिशः आणि सामुदायिक रीत्या इतर कोणी केलें आहे असें वाटत नाही. यशवंत, गिरीश आणि माधव जूलियन् या त्या मडळाच्या सभासदाचें प्रत्येकाचें लेखन, त्याची सख्या व लाबी पाहिली, तरी इतर कवींच्यापेक्षा अधिकच झालें आहे हें सहज लक्षात येईल. गझल्, सुनीतें, खंडकाव्ये, जानपदगीतें व इतर स्फुट रचना अशी त्याची काव्यरचना विविध प्रकारचीहि झाली असल्याचें दिसून येईल. रविकिरणमडळातील कवींनी रचनेचा साक्षेपहि उच्च दर्जाचा दाखविला आहे व काव्यगुणाच्या दृष्टीनेहि आपली पदवी उंच राखली आहे. त्यातील पटवर्धन आज गेलेच आहेत. तेव्हा त्याच्या-कडून आता नवीन काही मिळणेंच अशक्य झालें आहे. त्याच्या मागे त्याच्या वर उल्लेखिलेल्या सहकाऱ्यानी काव्याचे निशाण अद्यापि फडकत ठेवलेच आहे. पण तें नवीन क्षेत्राच्या आक्रमणाचे द्योतक नसून मिळालेलें चाल-विण्याचेंच द्योतक आहे असे अनेक रसिकाना आज वाटतें. नवीन कल्पनाचें ग्रहण करून त्याचें ग्रथन काव्यात करण्याच्या वयोमर्यादेकडे ते गेले आहेत असेंहि वाटते. अशा स्थितींत त्यानी पूर्वी करून ठेवलेल्या कामगिरीमुळे स्वतःच्याच वर जाणे त्याचें त्यानाच कठिण होऊन बसले आहे. पूर्वीच्या कामगिरीने रसिकाच्या मनात त्यानी निर्माण करून ठेवलेली भूकच आज त्याना जाचक होत आहे. विसाव्या शतकाच्या पूर्वार्धातील मराठी काव्याच्या इतिहासात रविकिरणमंडळाने आपलें स्थान अढळ करून ठेवलें आहे यात शंका नाही.

काव्यविषयक आणखी एक विचार म्हणजे काव्यगायनाचा. जाहीर काव्यगायनाची प्रथा प्रस्तुत कालातच सुरू झाली, तिचा अत्युत्कर्ष झाला व आज ती थट्टेलाहि पात्र झाली आहे. नागपूरचे टेकाडे आणि पुण्याचे यशवंत यानी तिला प्रथम चालना दिली. गिरीश–मायदेव यांनी तिला प्रतिष्ठा मिळवून दिली. सोपानदेव चौधरी यांनी तिला अधिकच लोकप्रिय केलें. तांबे आणि पटवर्धन यांनी तिला खाजगी मान्यता दिली. कविता गायिली गेली की ती अधिक परिणामकारक, आणि प्रसिद्धि व लोकप्रियता मिळवून देणारी, होत असल्याने अनेक कवि अनुकूलता नसतानाहि त्या प्रथेचा अवलंब करू लागले. कवींनाच नव्हे, तर काव्यगायकांनाहि प्रथम प्रसिद्धि आणि नंतर द्रव्य मिळण्याचे आज ते साधन होऊन बसलें आहे, आणि यामुळे काव्यगायनाचें शुद्ध स्वरूप उरले नाही. आज अनेक वेळा त्यात काव्यहि नसते आणि गायनहि नसतें. याचा काव्यरचनादृष्टीनेहि अनिष्ट परिणाम झाला तो असा. कवींना काव्यरचनेपासून प्रसिद्धीखेरीज इतर लाभ क्वचितच होतो. ती प्रसिद्धि काव्यगायनाने मिळते असें दिसून आल्याने गायनानुकूल ठरेल अशी रचना करण्याकडेच प्रवृत्ति व्हावी हें साहजिकच आहे. या मोहातून बाहेर पडणारे काही कवि असले तरी पुष्कळाना तो मोह सोडवत नाही आणि त्याच्याकडून ठराविक अशी रचना होऊ लागते. काव्यगायनाने आधुनिक मराठी काव्य लोकप्रिय केले हें खरे, पण आज त्यापासून मराठी काव्याला अपकारच अधिक होतो की काय असे वाटतें. कारण काही काव्यगायनामुळेच त्याचे विडंबन होऊ लागले आहे.

मराठी काव्याची चर्चा मात्र व्हावी तितकी झाली नाही. काव्यशास्त्राची पुष्कळच झाली व होत आहे. काव्यविचार, काव्यचर्चा, काव्यालोचन, काव्यकला, अ. काव्यप्रकाश आणि शेवटीं रसविमर्श अशा ग्रंथानी तिची मंत्रविषयक बाजू, आणि छंदोरचनेसारख्या ग्रंथानी तिची तंत्रविषयक बाजू सांभाळली गेली आहे, तथापि मराठी कवींनी लिहिलेल्या काव्याची चर्चा त्याच्या संग्रहाच्या प्रस्तावनातून किंवा अभिप्राय–परीक्षणातून पडून आहे. गोविंदाग्रजाच्या काव्याची चर्चा जशी एका स्वतंत्र ग्रंथामध्ये झाली आहे तशी चर्चा होण्याचें भाग्य आधुनिक कवींपैकी कोणाच्याहि वाट्यास आलें नाही. माधवराव पटवर्धन गेल्यावर त्याच्या काव्यावर बरेच लेख आले पण

तें माधवराव गेल्यामुळे झालें, हयात असते तर झालें नसतें असें वाटतें. नियतकालिकातून काव्याच्या भाव फारच उतरला आहे. त्याचा उपयोग जाहिरातींप्रमाणे एरवी मोकळी पडली असती अशी जागा भरण्यास होतो व तिच्या लाथीरुदीप्रमाणे कवीला मोबदलाहि अल्पच मिळतो (असे म्हणतात). कवितेला वाहिलेले जुने रत्नावली मासिक बऱ्याच वर्षांच्या झगडयानंतर बंद पडले. नवीन 'रसवती' या मासिकाचे अंक वर्षभरहि निघाले नाहीत. मनोरंजनाने नवकाव्यास मिळवून दिलेली प्रतिष्ठा आज उरली नाही. पहिलें पान अलंकरणरूपच समजले जातें. काव्यविषयक चर्चा न होण्याचें कारण म्हणजे समकालीनाविषयी व विशेषतः कवींविषयी लिहिणे सुरक्षित वाटत नसावे. एकंदर कवींची आणि काव्याची थट्टा करण्याची प्रथा बळावत चालली. स्वतः कवीच याला कारण नसतील असे नाही. अगदी अलीकडे अभिरुचि, समीक्षक यासारखी मासिके काव्याला महत्त्व देऊन त्याचे कौतुक करीत आहेत. तथापि तेवढे पुरल असे वाटत नाही. साहित्यसंमेलनें होतात (कविसंमेलनें होत नाहीत वा क्वचित होतात.) तेव्हा त्या संमेलनाचें अध्यक्षपद कवीस मिळणे कठीण झालें आहे असे दिसते व त्या संमेलनातून करमणुकीची बाजू तेवढी काव्यगायनाने सांभाळली (?) आहे. त्यापलीकडे काव्यास तेथे महत्त्व नाही. मराठी काव्यास ओहोटी लागली असेल तर ती या प्रकारची आहे. कविता लिहिल्या आणि छापल्या जातील, काव्यसंग्रहहि प्रसिद्ध होतील, पण त्याची कमी झालेली प्रतिष्ठा मात्र परत कशी मिळेल ते सांगणं कठिण आहे.

आधुनिक काव्याचे स्वरूप हें असे आहे (असे मला वाटते). पद्यप्रकार आणि काव्यप्रकार यांची समृद्धि व आत्माविष्काराचे मार्ग या दृष्टींनी हा काल मराठी काव्यास चांगला गेला असे म्हणता येते. वैयक्तिक भावना आणि सामाजिक रूढीविरुद्ध बंड या दोन गोष्टींमध्ये ते आरंभी गुरफटले होते. तेथून व्यापक क्रांतिविचार आणि खोल मानवजीवनविषयक विचार याच्याकडे त्याची प्रगति होऊ लागली असल्याची चिह्ने आज दिसू लागली आहेत. मध्यंतरीच्या कालात त्याला ओहोटी लागल्यासारखें वाटत होतें, तरी नवीन विषयाकडे वळण्याच्या अगोदरची ती अवस्था होती एवढेच. इतर वाङ्मयलेखकाप्रमाणे कवींची दृष्टीहि फाकून ती अधिकाधिक मोलाचें काव्य

निर्माण करू शकेल अशा आशेच्या उंबरठ्यात तिचा आजचा समीक्षक उभा आहे. त्याची ही आशा पूर्ण होणार की फोल ठरणार हे कालाच्या आणि त्यापेक्षाहि उदयोन्मुख कवींच्या हातात आहे.*



* लेखन म. सा. परिषदेच्या नियमाप्रमाणे.

: २ :

# कादंबरी-वाङ्मय

प्रा. गं. भा. निरंतर

सर्व लोकांच्या आकांक्षा मोठ्या होतील आणि जगातील अत्यंत प्रगमनशील, श्रीमान् व कर्तृत्ववान् लोकांच्या बरोबरीचा आपला आयुष्यक्रम पाहिजे अशी जेव्हा आपली मनोवृत्ति होईल तेव्हाच वाङ्मयहि वैभवास चढेल.

—डॉ. श्री. व्यं. केतकर,

शारदाविहार, पृ. ५२

गेल्या तीस वर्षांचा काळ म्हणजे साधारणतः १९१५ पासूनचा काळ. हरिभाऊ आपटे यांची 'वज्राघात' कादंबरी ( १९१३ ते १५ ) या काळांत लिहिलेली आहे. आणि 'कर्मयोग' ही कादंबरी ( १९१३–१७ ) या काळात लिहिलेली आहे. म्हणजे या प्रस्तुत कालखंडात हरिभाऊ आपटे यांचासुद्धा थोडासा समावेश होतो. आणि हरिभाऊंपासून तों आजतागायत हा कालखंड कालदृष्ट्या केवळ तीस वर्षांचा असला तरी विषयदृष्ट्या तो किती अथांग आहे याची कल्पना डोळ्यासमोर उभी राहते. या काळातील वाङ्मयाच्या आरंभीं वाङ्मयसमालोचन करणाऱ्यानीं काय लिहिलें आहे तें पाहिले म्हणजे तीस वर्षांतील कार्याची प्रगति मोजणें सोपे जाईल. १९१५ च्या सुमारास मराठी कादंबऱ्याबद्दल लोकांना काय वाटत होतें हें त्या समालोचनात स्पष्ट दिसते. उदाहरण म्हणून मी 'विविधज्ञानविस्तारा'तील समालोचनात्मक लेखातले काहीं उतारे देतों :

" आजच्या कादंबऱ्यांचा दुसरा एक विशेष हा कीं, त्यांत बहुतेक अंशीं फक्त शृंगाररसच आढळून येतो. असे कां व्हावें ? याचें एक कारण असें

दिसतें कीं, मनुष्य स्वभावतःच प्रेमलुब्ध असतो...मनुष्यानें लोखंडी साखळदंडापेक्षां प्रेमाचे पुष्पहार प्रिय मानावे यात कांहीं आश्चर्य नाहीं. परतु व्यवहारांत प्रत्यक्ष अनुभवास काय येते हे पहावयास नको काय? प्रेमविषयक गोष्टींत अत्युच्च भराऱ्या मारणें काहीं काळ गोड वाटतें हें खरें. परतु त्यांत कांहीं टिकाऊपणा नाहीं हे प्रत्येक अनुभवी आणि पोक्त माणूस कबूल करील. म्हणून वाचकांना प्रेमविषयक भ्रामक विषयाच्या वातावरणांत उड्डाण करावयास लावणें फारसे हितार्चे नाहीं. उलट काल्पनिक प्रेमाला लुब्ध झालेल्या वाचकाची संसारात निराशा होते व त्याच्यावर केव्हा केव्हा अनिष्ट परिणाम झालेलेहि दिसून येतात." —ग. रा. भानू, बी. ए.

त्रिविधज्ञानविस्तार–जुलै १९१५

"थोडक्यात सांगावयाचें म्हणजे मनोरजक वाङ्मयाखेरीज आमच्या महाराष्ट्र साहित्याचें उपवन इतर बाजूंनीं ओसाड आहे. बरें, मनोरंजक वाङ्मय तरी समाजाला तुष्टिपुष्टिकारक आहे काय? काहीं ग्रंथ व अगदीं थोडे लेखक वगळता जिकडे तिकडे बाष्कळ प्रेमविषयक कादबऱ्याना– नुसता ऊत आला आहे. कादबरीकार नाजूक शृगाराचें मनोहर ध्येय समाजापुढें ठेवीत आहेत. कोण ही शोचनीय स्थिति! ही वाङ्मयाची सेवा म्हणावयाची कीं विटंबना म्हणावयाची? आम्हाला तर ही खास विटंबना वाटते!"

ना. ह. आपटे,

विविधज्ञानविस्तार–ऑगस्ट १९१५

ही वस्तुस्थिति दूर करून मराठी वाङ्मयांतील ही उथळ मनोवृत्ति दूर करण्यासाठीं या काळाच्या सीमारेषेवर वावरणारे हरिभाऊ आपटे यांनीं लेखनास सुरुवात करण्यापूर्वी आपलें ध्येय मनाशीं ठरवलें, तें ध्येय असे: अपरोक्षपणें त्यांच्याच शब्दांत हें ध्येय स्पष्ट झालें आहे.

"आनंदोत्पादन, मनोरंजन, करमणूक हा एवढाच हेतु धरून कोणत्याहि महाकवीनें किंवा नीतिबोधकारानें आपलीं काव्यें किंवा गोष्टी रचल्या नाहींत."

या कालाच्या आरंभींच कादंबरीवाङ्मय हें नाजूक शृंगारानें करमणूक करण्याच्या कामीं वाहिलें असल्याची तक्रार दिसते. ही तक्रार दूर करण्यासाठीं

हरिभाऊनीं आपला वाङ्मयकार्याचा संकल्प केला आणि करमणूक करीत करीत समाजाला उद्बोधक असे वाङ्मय लिहिले. त्याचे कार्य यशस्वी झाल्याचा निर्वाळा आजचे टीकालेखक देत आहेत.

"हरिभाऊनीं महाराष्ट्रातल्या पांढरपेशा वर्गाशीं तन्मय होऊन त्याच्या जीवनाचीं शब्दचित्रे अत्यंत सहृयतेने रेखाटलीं आहेत. पण त्याच्या कादबऱ्यात नुसती तन्मयताच नाहीं तर तळमळहि आहे. कारण हरिभाऊ प्रथम समाजसुधारक होते व नंतर कादंबरीकार होते. हरिभाऊंच्या कादंबऱ्यात वास्तववाद आणि ध्येयदृष्टि याचा मिलाफ झालेला असल्यामुळेच त्या जशा समाजस्थितीच्या निदर्शक तशाच समाजाला मार्गदर्शकहि झाल्या आहेत."

माडखोलकर,

'माझे आवडते लेखक', पृ. १२६

यावरून या कालखंडाच्या आरंभीं कादंबरीवाङ्मय हे जीवनास उद्बोधक व्हावें अशा स्पष्ट निश्चयाने लेखनास सुरुवात झालेली दिसते आणि या कामीं हरिभाऊंसारख्या श्रेष्ठ साहित्यिकानें स्वतः फार सामर्थ्यवान् असा मार्ग प्रस्थापित केला. हरिभाऊंच्या लेखणीचा आशीर्वाद घेऊन १९१५ च्या सुमारास सुरू झालेले कादंबरी-वाङ्मय ३० वर्षांत कोठपर्यंत पोहोंचलें ? आजच्या कादंबरीवाङ्मयाच्या समालोचनकाराचा अभिप्राय काय आहे ?

"मात्र लावण्याचा संप्रदाय अजून चालूच आहे असे वाटतें. विशेषतः कथा–कादंबरीवाङ्मयात अलीकडे हा संप्रदाय उजळमाथ्यानें पुनः वावरूं लागल्यासारखा दिसतो... कादंबऱ्यातून जीं शृंगारिक वर्णने येतात तीं एकदा पहा... या वर्णनाचा आणि कथानकाच्या प्रगतीचा काहींहि संबंध नसतो...पुस्तक खपते म्हणून तीं लिहिलीं जातात हें उघडच आहे... वाङ्मयाच्या प्रयोजनात करमणूक, मनोरंजन व आनंद यावर जो भर दिला आहे तो आपण जितक्या लवकर कमी करू तितके समाजाच्या दृष्टीनें हिताचें होईल..."

प्रा. वि. पा. दांडेकर,

'नवयुग', दिवाळी अंक १९४४

म्हणजे याचा अर्थ असा होईल का कीं १९१५ सालापासून मराठी वाङ्मय–आणि कादंबरी–वाङ्मय प्रामुख्यानें–बाष्कळ मनोरंजनाच्या व उत्तान

प्रणयाच्या जे नादीं लागले आहे ते तसेंच आहे. हा नाद १९४४ सालापर्यंत टिकला आहे!

त्याबरोबरच हा नाद सोडून वाङ्मय जास्त ध्येयवादी व वास्तववादी व्हावयास पाहिजे हेंहि सागणें तसेच चालू राहिले आहे. अगदीं परवा परवा मागलीला माडखोलकर हेच म्हणाले. त्याच ठिकाणीं १९४३ सालीं प्रा. माटे हेच म्हणाले. प्रा. फडके रत्नागिरीस— श्री. खाडेकर सोलापुरास—ठिकठिकाणीं वेळोवेळीं मोटमोठे टीकाकार मराठी कथवाङ्मयाचा हा नाद सुटण्यासाठीं टाहो फोडीत आहेत. अन् मग गडकऱ्याच्या शब्दात असें वाटतें, " आता हा नाद असाच वाढणार ! हा नाद सुटण्याची वेळ तो नाद लागण्यापूर्वींची होती ! "

परंतु हें तितकें खरें नाहीं. या प्रकाराचे पातक वाचकाच्या अभिरुचीच्या माथीं फोडतात. ते वाचक सुबुद्ध होऊ लागले आहेत. त्या वाचकाना वामनराव जोशी आवडू लागले आहेत. त्या वाचकाना डॉ. केतकराची महति कळावयास सुरुवात झाली आहे. आणि त्याचे आवडते लेखकहि त्याच्याशीं प्रामाणिकपणें बोलू लागले आहेत. श्री. माडखोलकरांनी आपलें कादबरीलेखन हा एक जोडधंदा आहे असें 'जीवनसाहित्या'त सागून टाकले. ( पृ. ५६ ) आणि पृ. ११२ वर तेहि याहीपेक्षा आवेशानें लिहितात—

" वाङ्मय भ्रष्ट होतें ते सामान्याच्या संसर्गामुळे नव्हे तर असामान्याच्या मानसिक अनीतीचें प्रतिबिंब त्यात उमटतें म्हणून. प्रतिष्ठित लेखक हे जेव्हा आपली जबाबदारी विसरून पैशाच्या किंवा लोकप्रियतेच्या लालसेनें लोकाच्या उत्तान मनोविकाराना उत्तेजित करील असें वाङ्मय बुद्धिपुरस्सर निर्माण करतात तेव्हा वाङ्मयाचा प्रवाह कलुषित होतो. त्याचें खापर बहुजनसमाजाच्या माथीं फोडणे म्हणजे आत्मवचना करून घेणे किंबहुना आपलें पाप दुसऱ्याच्या माथीं बसविणें आहे."—' जीवनसाहित्य ' ( पृ. ११२ ).

गेल्या पचवीस-तीस वर्षातील कादबरीवाङ्मय प्रणयाच्या धुंदीनें जास्त जास्त घेरलेलें असले तरी ती धुंदी दूर होण्याची आशा वाटू लागते ती वरील उद्गारासारख्या उद्गारांनीं.

मराठी कथावाङ्मयात हा छंद माजत होता. त्याच वेळीं हरिभाऊ आपटे यांची ध्येयनिष्ठ वाङ्मयाची परपराहि चालू होती. ती परपरा ज्यांनीं चालू ठेविली त्यांची तपश्चर्या आज ना उद्यां फलद्रूप होईल यात शंका नाहीं. प्रा. दांडेकरानीं वर वर्णिलेला आधुनिक वाङ्मयांतील लावणी-संप्रदाय लवकरच हतबल ठरेल आणि आजपर्यंत प्रसुप्त राहिलेला हरिभाऊंचा सप्रदाय पुन्हा बळ धरू लागेल अशी भावी भारतभाग्यसूचक महाचिन्हें दिसूं लागलीं आहेत.

हरिभाऊंच्या ध्येयनिष्ठ वाङ्मयाची परपरा ज्यांनीं प्रतिकूल परिस्थितीतहि चालू ठेविली त्यांत कै. वामनराव जोशी यांचें नाव अग्रभागीं आहे. या कालखंडाच्या आरभींच त्यानीं लिहावयास सुरुवात केली. आपला पंथ स्पष्ट व्हावा म्हणून त्यांनीं 'रागिणी'ला 'काव्यशास्त्रविनोद' हें खुलासेवजा नाव दिलें आणि काव्यशास्त्रविनोदानें काल घालविणाऱ्या धीमतासाठीं आपण लिहिणार आहोंत हे आधींच सागून टाकले. तंत्रदृष्ट्या 'रागिणी'त बरेच दोष असल्यानें फडके–युगात ती मागें पडावी यात काहींच नवल नव्हतें. वामनरावांची 'रागिणी' मासिक 'मनोरंजनां'तून सुरू झाली तो १९१४–१५ चा काळ होता. हरिभाऊ आपट्यांचें कादंबरीलेखन चालूं होतें. 'हिंदुधर्म आणि सुधारणा' हें पुस्तक वाचून 'रागिणी'ची स्फूर्ति झाल्याचें वामनराव सांगतात. त्याच्या स्फूर्तिस्थानावरूनहि त्याची परपरा दिसते. त्यानतर दोनच वर्षांनीं फडके याची 'अल्ला हो अकबर' ही कादंबरी प्रसिद्ध झाली. आणि फडके व हरिभाऊ–वामनराव या दोन वाङ्मयाभिरुचीच्या प्रवाहात फडके-प्रवाहाचा विजय होत गेला. त्यामुळें वामनरावाच्या रागिणीपंथाला बराच काळपर्यंत कुचंबणा सहन करावी लागली. परंतु वामनरावानीं आपल्या हयातींतच आपल्या सदभिरुचीनें आणि विचारशीलतेनें लोकप्रियतेला शेवटीं जिंकलें. 'सुशीलेचा देव' पाहिल्यावर व 'इदु काळे आणि सरला भोळे' याचा परिचय झाल्यावर, वामनरावानीं लालित्यहि संपादिल्याची वाचकाची खात्री पटली. रागिणीनंतर जवळजवळ १० वर्षें त्याची प्रतिभा ललितवाङ्मयात मूकव्रत धारण करून जणूं काय तपश्चर्या करीत होती आणि त्या तपश्चर्येचें परिपक्व फळ १९२९–३० मध्यें 'सुशीलेच्या देवां'त दिसूं लागलें. पुढे

तीन-चार वर्षांनीं त्यांनीं ‘ इंदु काळे व सरला भोळे ’ ही कादंबरी लिहिली. मुख्यतः तीनच कादंबऱ्यांनीं वामनरावांनीं कादंबरीवाङ्मयांत हरिभाऊंच्या शेजारीं स्थान मिळविलें. वामनरावांना कादंबरी-वाङ्मयांत जें मानाचें स्थान मिळालें तें त्यांच्या वैशिष्ट्यामुळें. त्या वैशिष्ट्याचें अनुकरणहि होऊं शकलें नाहीं हें एक त्याच्या मौलिकतेचें चिह्न आहे. कादंबरीकार या नात्यानें वामनरावांचें हें वैशिष्ट्य म्हणजे स्वतःच्या अनुभवाशीं व विचाराशीं प्रामाणिकपणा हें होय. उच्च शिक्षण घेतलेल्या आणि भोंवतालच्या राजकीय, सामाजिक आणि धार्मिक चळवळींचे संस्कार झालेल्या तरुणतरुणींच्या जीवनांत—अंतःकरणांत—जीं वैचारिक आंदोलनें उत्पन्न होत होतीं त्याचें इतकें मूलग्राही आणि स्पष्ट चित्र कोणालाहि काढता आलें नाहीं. ज्या वर्गांतून इतर कादंबरीकाराना प्रणयपिपासु नायिका हातीं लागल्या त्याच वर्गांत वामनरावांची उत्तरा, सुशीला, इंदु, सरला याचा समावेश होतो. परंतु वामनरावाच्या नायिका जिवंत वाटतात तितक्या इतर कादंबऱ्यातील त्याच्या प्रतिकृति ( विकृति ? ) वाटत नाहींत. जुने आचार, जुनी नीति, रूढि आणि नव्या जगातील आकांक्षा, त्या आकांक्षांना आवश्यक असे आचार व नीति याचा संघर्ष अत्यंत सूक्ष्मपणें वामनरावानी रंगविला आहे. वास्तव जगांतूनच ध्येयवादाची ओळख देणारीं अशीं वामनरावाचीं पात्रें आहेत. एकाच समाजाचीं काढलेलीं शब्दचित्रें इतकीं विविध असावींत हा मराठी कथावाङ्मयांतला एक चमत्कार आहे खरा ! परंतु हा चमत्कार होण्याचें कारण लेखकाची अंतःकरणप्रवृत्ति हें आहे. प्रवृत्तीप्रमाणें अनुभवाची प्रक्रिया होते. वैवाहिक जीवनातील अन्यायाविरुद्ध झगडा करणाऱ्या नायिका सर्वत्र दिसतात. परंतु वामनरावाची सुशीला आपल्या वैयक्तिक जीवनाच्या इभ्रतीच्या रक्षणासाठीं पतिगृह-त्याग करते, पण माणुसकी सोडीत नाहीं. सामाजिक जीवन आणि वैयक्तिक जीवन याचा समन्वय घालणें हें वामनरावांचें ध्येय आहे. आणि संसारासारखें, वैवाहिक संबंधासारखें सामाजिक जीवन एकदा स्वीकारल्यावर हक्कापेक्षा तडजोड हीच दृष्टि ठेविली पाहिजे असा त्यानीं आधुनिक सुशिक्षित तरुणींना आपल्या नायिकाच्याकडून कळकळीनें निरोप पाठविला आहे. समाजसत्तावादाचे वारे भोंवतालीं वहात

असता त्यांनीं आपला विश्वकुटुंबवाद लोकांना ऐकवला. वैयक्तिक स्वातंत्र्यासाठीं रूढ कल्पनेप्रमाणें अनाचार—व्यभिचारहि करावा लागला तरी त्याचा सर्व दोष समाजव्यवस्थेकडे असें आवेशपूर्ण प्रतिपादन आणि कांहींसें आचरण निदान वाङ्मयांत जोमानें सुरू असतां त्यानीं इंदु काळे इला कलाप्रेम तहकूब करून बिंदुमाधव म्हसकराचा सहवास पतिइच्छेसाठीं सोडावयास लावलें. पतिपत्नींनीं आपलें वेगळें व्यक्तिमत्त्व राखण्याचा प्रयत्न करण्यापेक्षां परस्परांशीं एकजीव होणें अथवा सामरस्य पावणे यांतच मानवी संसाराचें स्वारस्य आहे हे वामनरावांचें विवेचन वाङ्मयांत चालू होतें; त्याच वेळीं वैवाहिक बंधनाविरुद्ध मराठी वाङ्मयांत फार मोठी मोहीम चालू होती. आधुनिक स्त्री-पुरुषाना वैवाहिक जीवनात एकजीव होण्यास सांगताना वामनरावानीं वस्तुस्थितीकडे डोळेझांक केली नाहीं. मोहाच्या विविध स्वरूपानें व्यापलेल्या आजच्या समाजांतले कसोटीचे प्रसंग त्याना माहीत आहेत. समाजांतील सुशीलेच्या आसपास कॉफ्सारखीं माणसें हिंडत आहेत. पुन्हा तीं प्रामाणिक आहेत. आणि तरी त्यानाहि दोन हात दूर ठेवणे सामाजिक स्वास्थ्यासाठीं आवश्यक आहे हें वामनराव सागावयास कचरले नाहींत. स्वतःच्या अनुभवाशीं व विचारांशीं प्रामाणिकपणा तो हाच. या अनुभवाला व अवलोकनाला चिकित्सेचीहि जोड मिळाल्यानें वामनरावाचें वाङ्मय वास्तववादी ठरूनहि व्यापक ठरलें आहे. नाहीं तर अनुभवाशीं व अवलोकनाशीं प्रामाणिकपणा असणारे इतरहि लेखक वास्तववादी आहेत. ते जीं प्रणयाचीं चित्रें रंगवतात तीं अवास्तव नसूनहि दुबळीं वाटतात. कारण त्यात जीवनाचें फक्त एकागीं दर्शन आहे. त्या प्रसंगांचा व भावनेचा एकंदर जीवनाशीं संबंध वा तुलनात्मक महत्त्व याची चिकित्सा तेथें नाहीं. या चिकित्सक वृत्तीमुळें, प्रामाणिकपणामुळें, व्यापक दृष्टिकोनामुळें वामनराव हे लेखनतन्त्रात फारसें यश न मिळवितांहि या कालखंडात आणि एकंदर मराठी वाङ्मयाच्या आजपर्यंतच्या कार्यक्षेत्रात वंदनीय ठरले आहेत.

"कादंबरीलेखनाकडे केवळ एक प्रचारमाध्यम म्हणून पाहणारे डॉ. केतकर ही कालखंडातील दुसरी महनीय व्यक्ति होय. 'गावसासू' ही केतकरांची पहिली कादबरी १९२६ सालीं प्रसिद्ध झाली आणि बारा वर्षांत त्यांनीं केवळ सात कादंबऱ्या लिहिल्या. वामनरावांच्या मानानें

केतकरांचें कादबरीक्षेत्रातील स्थान केवळ व्यक्तिमत्त्वानें सिद्ध झालेलें आहे. वामनरावांनीं लालित्याची थोडी तरी बूज राखली. कांहींशी उपासनाहि केली. परंतु डॉ. केतकरांनीं लालित्याची मुळींच पर्वा केली नाहीं. कादंबरी-तंत्राची खुषमस्करी करणें म्हणजे कालाचा अपव्यय आहे अशी त्यांची प्रामाणिक समजूत होती. छापखान्याच्या तगाद्यामुळें लेखन झालें असें डॉ. केतकराच्याप्रमाणें हरिभाऊ आपटे यांचेहि उद्गार प्रसिद्ध आहेत. परंतु छापखाना, संपादक, प्रकाशक याचे तगादे हें एक व्यावहारिक निमित्त आहे एवढेंच. या निमित्ताचा प्रभाव खांडेकर, माडखोलकर इत्यादि लेखकाच्याहि बाबतींत दिसून येतो. तेव्हां डॉ. केतकर यांच्या कादंबऱ्याचें विशिष्ट स्वरूप समजण्यास हीं कारणें मुळींच उपयोगीं पडणार नाहींत. त्यांनीं तत्रादि बंधनाची क्षिति बाळगली नाहीं याचें कारण त्याना तंत्रोपासनेस वेळ नव्हता असें नाहीं, तर त्याचें त्याना महत्त्वच वाटत नव्हतें. वामन-रावांनीं त्याची या बाबतींतील दृष्टि बरोबर सागितली आहे. समाजाचें पुष्कळ अवलोकन व मनन केल्यामुळें त्यांच्या मनात हजारों विचार येत असत. या विचाराना व्यक्त स्वरूप दिल्याशिवाय त्यांना स्वस्थ बसणें शक्य नव्हतें, असें वामनराव सागतात. ( विचारसौंदर्य पृ. ४८ ).

आपल्या समाजात ज्ञानाचें दारिद्र्य सर्व क्षेत्रात पसरलें आहे आणि तें साथीसारखें प्रसरत आहे हें पाहिल्यावर समाजजीवनास उपकारक अशा ज्ञानाचा पुरवठा करणे हें आपलें कर्तव्य आहे अशी त्याची श्रद्धा होती. या कर्तव्याच्या कल्पनेच्या भव्यतेमुळें त्यांनीं स्वतः ज्ञानाची—विविध साधनांची उपासना केली आणि समाजास 'ज्ञानकोश' दिला. आपल्या मताकडे, विचाराकडे समाजाचें लक्ष वेधण्यासाठीं त्यांनीं अनेक मार्गांचा अवलंब केला. त्या मार्गोपैकींच कादंबरीलेखन हा एक मार्ग होता. कादंबरी-लेखनाविषयीं लोकांना वाटणारी आस्था पाहिल्यावर त्या आस्थेचा उपयोग करून घेण्याचें त्यांनीं ठरविलें. आणि अस्सल ललितलेखक त्या क्षेत्रांत प्रस्थापित झाले आहेत हें माहीत असूनहि ते त्या प्रातात शिरले. याचें कारण त्या ललितलेखकांपेक्षां आपल्याजवळ काहीं निराळें, विशेष महत्त्वाचें असें सांगण्यासारखें आहे असा त्याना आत्मविश्वास होता आणि तो आत्म-विश्वास अगदीं बरोबर होता हें सिद्ध झालें. नाहीं तर लालित्याची वाट

बाबूस टाकून कथावाङ्मयांत त्यांना जें यश मिळालें त्याचें दुसरें काय कारण असूं शकेल ? ‘ ज्ञानकोश ’ हें ज्याप्रमाणें समाजाच्या ज्ञानलालसेस दिलेलें आव्हान होतें तसेंच त्यांचें कादंबरीलेखन समाजाच्या वाङ्मयीन अभिरुचीस आव्हान होतें. तें आव्हान मराठी वाचकांनीं स्वीकारलें आणि आपली अभिरुचि सिद्ध केली. केतकरांनीं आपल्या कादंबऱ्यांतून मराठी वाचकांस अगदीं अपरिचित असे जग दाखवलें. सदाशिवपेठी कादंबऱ्यांचें क्षेत्र त्यांनीं विस्तृत केलें. परिस्थिति आणि सामाजिक रचना यांचा मनुष्याचा स्वभाव व वर्तन यांशीं असलेला संबंध त्यांनीं व्यक्त केला आणि सदाचार वा दुराचार हे अभिप्राय परिस्थितिसापेक्ष आहेत ही दृष्टि त्यांनीं मराठी वाचकांस दिली. त्यांनीं विचारप्रवर्तक कादंबऱ्या वाचण्यास वाचकांस शिकविलें. त्यांना आलेल्या अनुभवाची व्यापकता आणि त्यांच्या ठिकाणीं असलेली अवलोकनाची सूक्ष्म दृष्टि यांच्या प्रभावानें लालित्याची उणीव हजारोंपटीनें भरून काढली. शिवाय ललितवाङ्मयाबाहेर ज्ञानोपासनेच्या क्षेत्रांत त्यानीं मिळविलेला लौकिक इतका भव्य होता कीं, त्याना ललित-वाङ्मयांत लालित्याची उमेदवारी न करतांच कादंबरीकार म्हणून मानाची जागा मिळाली. आपलीं मतें व्यक्त करण्याच्या लोकविलक्षण पद्धतीमुळें त्यांना ‘ विचित्र ’ समजणारे लोक पुष्कळ आहेत. परंतु व्यावहारिक जीवनांतील प्रासंगिक विचित्रपणा करून त्यांच्या वाङ्मयावरहि विचित्रपणाचा वा विक्षिप्तपणाचा छाप मारणारे जे कांहीं टीकाकार आहेत त्यांनीं आपल्या टीकेमध्यें स्वतःच्या कनिष्ठ अभिरुचीचेंच अजाणतां प्रदर्शन केलें आहे असें दिसतें. परदेशांतील समाजजीवन व त्या समाजात वावरणाऱ्या हिंदी माणसा-वर होणारी पाश्चिमात्य सामाजिक जीवनाची प्रतिक्रिया ही मराठी वाचकांस सांगण्यासाठीं केतकराइतका अधिकारी लेखक अद्यापहि नाहीं. आपल्या जवळच्या या सामुग्रीचें महत्त्व त्याना स्वतःलाहि माहीत होतें. ते म्हणतात—

“ समाज अत्यंत विविध अंगीं आहे. चालू समाजाचें चित्र सर्व बाजूंनीं रंगवावयाचें झाल्यास मला आणखी १०–२० कादंबऱ्या लिहाव्या लागतील इतकें तें विविध आहे. असें असतां गिरगावी अगर सदाशिवपेठी लेखक लोकापुढें महाराष्ट्रीय समाजाचें अत्यंत अल्प स्वरूप ठेवतात तर आपण जितकें व्यापक स्वरूप दाखवितां येईल तितकें दाखवावें. जितक्या विविध

प्रकृति लोकांपुढें आणतां येतील तितक्या आणाव्यात ही मनीषा चित्तांत जागत असल्यामुळें कादंबऱ्यांत विविध प्रकार वर्णिले. ज्या लोकाना मी करीत आहे ती क्रिया शक्यच नव्हती असाच वर्ग बहुतेक लेखकात असणार आणि समाजातील अनेक अंगाचें ज्ञानहि ज्यात नसेल त्यास माझ्या कादंबरीचा प्रकारच गैर आहे, कलेचा अपकर्षच आहे, असा बोभाटा करावा लागणार व तो त्याप्रमाणें करीत आहेत तो स्वाभाविकच आहे. त्यात तें जगावेगळें कांहीं एक करीत नाहींत.

'मी व माझे टीकाकार'.

'ज्योत्स्ना', ऑगस्ट १९३६.

मंत्रापेक्षां तंत्रावरच सर्व भर देणाऱ्याना केतकरानीं वाङ्मयक्षेत्रांतील शूद्र म्हटलें आहे. केतकरांना आपल्या प्रांतातून हद्दपार करण्यासाठीं झगडणाऱ्या तथाकथित टीकाकारांचें यापेक्षा समर्पक वर्णन कसें करणार ?

एक प्रकारें केतकराच्या वाङ्मयाचें विकृत अनुकरण मराठी कादंबऱ्यातून होत आहे. केतकराच्या विचित्रपणाचीं उदाहरणें म्हणून ज्या गोष्टींचा उल्लेख करण्यांत येतो त्यांत अर्धवट सुधारक अशा आचारधर्मावर त्यांनीं केलेली टीका याचा प्रामुख्यानें उल्लेख येतो. समाजाच्या विविध क्षेत्रांतील बुवाबाजीवर त्यानीं हल्ला चढविला. संभाविताचे अनाचार चव्हाट्यावर आणले. परतु तेच आचार वैयक्तिक स्वातंत्र्य व व्यक्तिविकास या नावाखालीं पुढें काहीं कादंबरीकारानीं रंगविले आणि समाजास धक्के देण्याचेंहि श्रेय त्यानीं मिळविलें. त्यात मुख्य फरक नीट लक्षात आणला पाहिजे. अनाचाराचें वर्णन वा विवेचन करताना त्याविषयीं जुगुप्सा उत्पन्न होईल अशी केतकरानीं दक्षता बाळगली आहे. त्या दुराचारी व्यक्तींचे त्यानीं वाभाडे काढले आहेत. परतु इतर कादंबरीकाराच्या बाबतींत त्या अनाचाराविषयीं त्याची स्वतःचीच एक विकृत अभिलाषा दिसून येते. त्या आचारभ्रष्ट व्यक्तींची कैफियत माडण्याचा त्यांनीं आव आणलेला दिसतो. अनाचाराबद्दल जी सुप्त अभिलाषा सामान्य माणसात असते तिचें समाधान होणें हा त्यांच्या आचारस्वातंत्र्याच्या पुरस्काराचा परिणाम झाला आहे. वामनराव जोशी याची नायिका एके ठिकाणीं म्हणते, " वधूवरें एकमेकाना अनुरूप

नसतील तर त्यांचा प्रथम विवाह देखील व्यभिचारच आहे. " परंतु या उद्गारावरून वामनराव विवाहबाह्य व्यभिचाराचे प्रवर्तक ठरत नाहींत; हें लक्षांत ठेवून प्रथम विवाहातील कोणच्याहि स्वरूपाच्या असमाधानाला व्यभिचार हा एकच तोडगा सागणारे कादंबरीकार वामनरावाच्या पथापासून अगदीं दूर ठेविले पाहिजेत. तसेंच आशावादींतील नंदिनीहि म्हणते : 'प्रेम नसेल तर विवाहसंबंध कायम ठेवणें म्हणजे दोघांचेंहि आयुष्य खराब करणें होय.'...परंतु केतकरांचें हे मत आधारासाठीं घेऊन रुचिवैचित्र्य म्हणून व्यभिचारप्राय वर्तन करणाऱ्या नायक-नायिकांचें समर्थन करता येणार नाहीं. केतकरांचीं मते प्रचलित मताच्या विरोधी असलीं तरी त्या मताच्या प्रचारासाठींच ते लिहीत होते हे लक्षात ठेविलें पाहिजे. आणि त्या मतभेदावर अभिप्राय देण्यापूर्वीं वामनराव यांचे याविषयींचें विवेचन आधीं वाचले पाहिजे. वामनराव म्हणतात : " प्रचलित नीतीपेक्षा भिन्न आणि उच्चतर नीति कादंबरीकाराला जी अभिमत असेल तिचा पुरस्कार करण्यास त्यास प्रतिबंध नसावा. या तत्त्वाची कसोटी केतकरांच्या कादंबऱ्याना लावली असता त्या कितीहि लोकविलक्षण मतांचा पुरस्कार करणाऱ्या असल्या तरी निर्दोषच नव्हे तर अभिनंदनीयहि वाटतात. किंबहुना याच्या पुढेहि जाऊन मी असे म्हणेन कीं, केतकरांनीं सुशिक्षित समाजाला आपल्या नीतिअनीति-विषयक कल्पनांचा आणि भावनांचा फेरविचार करावयास लाविलें ही त्यांची एक मोठीच कामगिरी आहे. रूढ कल्पना व भावना म्हणजेच सत्कल्पना व सद्भावना असें नव्हे हें त्यांच्या लोकविलक्षण परंतु प्रेमार्ह व आदरार्ह नायक-नायिकांशीं परिचय झाल्यानंतर कोणत्याहि रसिकाला पटल्याशिवाय राहाणार नाहीं. "

—'विचारसौंदर्य' पृ. ५७.

कादंबरीच्या द्वारें लोकविलक्षण पद्धतीनें का होईना पण वाचकांस आपल्या वैयक्तिक व सामाजिक जीवनाचा फेरविचार करावयास लावणारा विचारप्रवर्तक कादंबरीकार केतकरांच्या नंतर गेल्या तीस वर्षांत तरी झाला नाहीं. या विधानांत इतरांचा अधिक्षेप करण्याचा हेतु मुळींच नाहीं. कारण केतकरांच्या ललितवाङ्मयाच्या पाठीशीं त्यांचें ललितेतर क्षेत्रातील भव्य व्यक्तिमत्त्व होतें. त्या व्यक्तिमत्त्वासह ते ललितवाङ्मयांत वावरत होते. असे

विशाल आणि उदात्त व्यक्तिमत्त्व लाभणारे लेखक समाजात नाहींत असें नाहीं. ते ललितवाङ्मयात उतरले नाहींत एवढेंच.

त्यामुळें वामनराव जोशी किंवा डॉ. केतकर याच्यानंतर कालानुक्रमानें आपण पुढे जाऊं लागलों कीं, कांहीं क्षण वाट चुकल्यासारखें वाटतें. कादंबरी-क्षेत्रापुरता विचार केला तरी श्री. न. चिं. केळकर याचा डॉ. केतकरांच्या नतर उल्लेख करावासा वाटतो. परंतु श्री. तात्यासाहेबांनीं या वाङ्मय-प्रकाराबद्दल स्वतःच फारसा जिव्हाळा बाळगलेला दिसत नाहीं. सारग्राही, विवेचनात्मक, सकलनात्मक लेखन लिहिणें ही त्याची वृत्ति असल्यानें ते कथानकाच्या माध्यमाविषयीं फारशी आपुलकी दाखवीत नाहींत. परंतु कोणतेंहि कार्य करावयाचें ठरविल्यावर आवश्यक ते श्रम निरलसपणें करावयाचे हा त्याचा स्वभाव आहे आणि प्रसन्न भाषाशैलीचें अलौकिक देणें त्याना लाभलें आहे. यामुळें त्यानीं कादंबरीक्षेत्रात फेरफटका करण्याचें ठरविल्यावर बरेचसे यशहि मिळविलें. राजकीय कादंबरी असा कादंबरीचा काहीं स्वयंसिद्ध विभाग मानता आला तर त्या क्षेत्रात श्री. न. चिं. केळकर हे आपल्याला प्रामुख्यानें दिसतील. त्यांच्या कादंबऱ्यातील पात्रे हीं राजकीय मताचे पुतळे आहेत. कादंबरीवाङ्मयाच्या प्रारंभकाळीं वेदान्ताचें विवेचन कथेचा द्वारें करताना क्रोध, लोभ इत्यादि विकार माणसासारखे रंगविलेले दिसतात; तसा कांहींसा प्रकार श्री. तात्यासाहेबाच्या राजकीय कादंबऱ्याच्या बाबतींत झालेला दिसतो. माणसाचें मत हा त्याच्या जीवनाचा एक भाग आहे. त्या मतालाच सगळा माणूस मानून श्री. केळकर यानीं आपल्या कादंबऱ्यातून त्या मताचा ऊहापोह केला आहे. कोणत्याहि विवेचनाच्या वेळीं ते अत्यत समर्पक दृष्टान्तानें एकदर विषय सुबोध करतात. तीच कला या मानवदेहधारी राजकीय पक्षाच्या किंवा मताच्या बाबतींत झाली आहे. परतु अशा लेखनात कथालेखनाचें समाधान लेखकासहि मिळत नाहीं आणि वाचकासहि कथावाचनाचें समाधान मिळत नाहीं. मानवी स्वभावाच्या मूलभूत सर्वव्यापी स्वरूपाचें आविष्करण करण्यात कथालेखकाच्या प्रतिभेस खरा हुरूप येतो. श्री. केळकराच्या प्रतिभेस असा हुरूप आहे. मानवी स्वभावाचे धागेदोरे उलगडण्याचें सूक्ष्मत्व तिच्या ठिकाणीं आहे हें त्यांच्या ‘ कोकणचा पोर ’ या कादंबरीवरून स्पष्ट दिसतें. कोंकणच्या

ग्रामीण जीवनाशीं ते या कादंबरींत तन्मय झाले आहेत आणि त्या सामाजिक जीवनास ऐतिहासिक वातावरणाची पार्श्वभूमि निर्माण करून त्यांनीं कथानकांची भव्यता आणि रमणीयता परिणामकारक रीत्या उत्पन्न केली आहे. कादंबरीकारास लागणारे गुणहि आपल्या ठिकाणीं आहेत हा आत्माविष्काराचा आनंद अनुभवणें एवढाच त्यांच्या कादंबरी-लेखनाचा हेतु दिसतो. या माध्यमाविषयीं यापेक्षां त्यांनीं जास्त आपुलकी दाखविली नाहीं. कादंबरीविभागाची यामुळें अतिशय हानि झाली आहे. श्री. केळकर यांच्या ठिकाणच्या सदभिरुचि, व्यासंग, व्यापक अनुभव, विवेचकता इत्यादि गुणाचा लाभ कादंबरीवाङ्मयास मिळाल्यास त्या वाङ्मयाच्या इभ्रतींत फार मोलाची भर पडेल यांत शंका नाहीं.

कादंबरी या वाङ्मयविभागांत कांहीं काळ विहार करून गेलेले या काळांतील आणखी एक ज्येष्ठ लेखक म्हणजे कै. शि. म. पराजपे. ‘विंध्या-चल’, ‘गोविंदाची गोष्ट’ या त्याच्या कादंबऱ्या कादंबरीवाङ्मयाच्या वैशिष्ट्या-पेक्षा शिवरामपंतांचा वाग्विलास, कल्पनाविलास या दृष्टीनेंच वाचकांच्या स्मरणांत राहिल्या आहेत. कथालेखनातहि त्यांचें देशाभिमानाचें तेज, पारतंत्र्याची तीव्र चीड, अभिजात शौर्याविषयींची आसक्ति हीं दिसून येतात. आणि या जोडीलाच त्यांचा अद्‌भुत कल्पनाविलास दाखविणारीं वर्णनें या गोष्टीमुळें काळातील निबंधांइतकेंच त्याचे कादंबरीवाङ्मय चित्तवेधक झालें आहे.

कांहीं मताचा, तत्त्वाचा अट्टाहास बाळगून त्याचा प्रचार करण्यासाठीं कादंबरी लिहिणारे या काळातील ज्येष्ठ कादंबरीकार म्हणजे नाथमाधव, ना. ह. आपटे, ना. वि. कुलकर्णी, वि. सि. गुर्जर इत्यादि होत. एकाच मार्गानें अव्याहत कार्य करीत राहिल्यानें त्यांनीं आपला एक वाचकवर्ग तयार केला आहे. समोर असलेल्या समाजातील आपला पूर्वग्रहास उपकारक एवढाच भाग ते निवडतात आणि जीवनाचें त्या भागाचें आपल्या ध्येयास अनुकूल असें रूपातर करीत करीत त्याच्या कथानकाची रचना होत असते. काय आहे, काय होणें शक्य आहे यापेक्षां त्याच्या दृष्टीनें जें इष्ट आहे, तें कसें दिसेल तें चित्र रंगाविण्याकडे त्यांचा कल असतो. आपल्या लिखाणा-विषयीं आजच्या वाचकवर्गास आपुलकी वाटावी म्हणून ते भोंवतालच्या

जीवनाची पार्श्वभूमि घेतात व वस्तुस्थितीचा आभास उत्पन्न करतात. परंतु कथानकाचें पर्यवसान आपल्या मताप्रमाणें घडवून आणताना त्याना पुष्कळ वेळां अद्‌भुताचा आश्रय करावा लागतो. आणि त्या ठिकाणीं भोंवतालच्या वास्तव जीवनाशीं त्यांची फारकत झालेली दिसून येते. आपलीं आदर्श चित्रें आकर्षक करण्यासाठीं त्यांनीं केलेले प्रयत्न हे त्याची स्वतःची अभिरुचि व्यक्त करणारे वाटतात. दिवसेंदिवस ललितवाङ्मयांत कलेचा प्रभाव जास्त दिसूं लागल्यानें नुसती तळमळ, कळकळ, जगाच्या कल्याणाविषयींची भाबडी, इच्छा यावर भिस्त ठेवून लिहिणारे वरील लेखक उपेक्षित ठरल्यासारखे झाले आहेत. आणि काहीं वेळा भोंवतालच्या जीवनातील संघर्षाचें विवेचन करण्याऐवजीं त्याचा एकजिनसी तिरस्कार करण्याचा त्यानींहि हेतुपुरस्सर प्रयत्न केल्यामुळें आजच्या हौशी वाचकाचा त्याच्याशीं काहींसा बेबनाव झाल्यासारखा वाटतो. वास्तव आणि अद्‌भुत याचें काहींसें विचित्र मिश्रण त्याच्या कादंबऱ्यातून आढळतें. त्या अद्‌भुतालाच ध्येय आणि ध्येयवाद अशा शब्दानीं कांहीं वेळां गौरविण्यातहि येतें, परंतु त्यांच्या दृष्टीनें तो ध्येयवाद असला तरी बराच दुबळा आहे. त्यांत आधुनिक जीवनाच्या संघर्षात टिकाव धरण्याचें सामर्थ्य नाहीं. आजच्या समाजाचा विश्वास संपादक करण्याइतकी आपुलकी त्यानीं भोंवतालच्या समाजाविषयीं दाखविली नाहीं. लोकप्रिय कादंबरीकाराच्या कादंबऱ्यात टीकास्पद झालेल्या भागापासून त्यांनीं आपलें लेखन अलिप्त राखलें आहे. हीन अभिरुचीची सावलीहि त्यानीं आपल्या ग्रंथांवर पडूं दिली नाहीं हें त्याचें व्रत त्यानीं आजतागायत पाळलें आहे, याबद्दल ते अभिनदनास पात्र आहेत यांत शंका नाहीं. परंतु विलासी वृत्तीचे स्वैर विलास रगविण्याच्या पंथाचें हें दुसरें टोंक आहे असें काहीं वेळां वाटतें. विकाराच्या भीतीनें विचारानेंहि पलायन करावें असा प्रकार त्यांच्या कथानकातून आढळतो. प्रवचनापेक्षा विवेचन हें जास्त परिणामकारक असतें हे त्यानीं लक्षात घेतलें—किंवा घेतलें असतें—तर त्याच्या ठिकाणच्या अभिजात गुणांचा प्रभाव यापेक्षा जास्त परिणामकारक ठरला असता.

तत्त्वनिष्ठ कादंबरीकारांची ही वाट— आज बरीच पुसट होत चालली आहे. त्या वाटेवर आजसुद्धां आपटे, केतकर, वा. म. जोशी यांच्या

वाङ्मयवृक्षाचा विस्तार आणि त्याची दूरवर पसरलेली सावली दिसते. त्या छायेंत वावरणारे नंतरचे तत्त्वप्रचारक कादबरीकार हे तेथे व्रतस्थासारखे वावरताना दिसतात !

नंतर या कालखंडातील दुसऱ्या गटाकडे वळूं या. तेथें आपल्याला सारखी रीघ लागलेली दिसेल. त्या गर्दींत फडके, खाडेकर, माडखोलकर या तीन व्यक्तींचा जयघोष ऐकूं येईल. कादबरीवाङ्मयातील या त्रिमूर्तीनें आजच्या वाङ्मयक्षेत्रात फार मोठें महत्त्व मिळविले आहे. त्यानीं आपल्या ठिकाणच्या वैशिष्ट्यामुळें महाराष्ट्रामध्यें अफाट वाचकवर्गास अक्षरशः नादीं लाविलें आहे. असंख्य तरुण लेखकांना त्यानीं स्फूर्ति दिली आहे. त्याच्यावर टीका करणारे टीकाकार हे टीकेतील मतापेक्षा टीकाविषयामुळेच लोकप्रियता मिळवूं शकतात हें त्याच्या लोकप्रियतेचें आणखी एक गमक आहे. इतक्या प्रभावी लेखकाचा परामर्ष इतक्या संकुचित जागीं आटोपणे हें अगदीं अशक्य आहे. त्यांच्यावरती अनेकांनीं लिहिलें आहे. त्यानींहि अनेकावरती लिहिताना आपलीं मतें व्यक्त केलीं आहेत. वाङ्मयात केलेल्या कार्यामुळे आपला लौकिक प्रस्थापित झाल्यावरहि त्याच्या वाङ्मयात स्थित्यंतरें होत आहेत. त्याची विकासाची क्रिया अद्याप चालू आहे असें वाटतें. हे सगळें लक्षात ठेवून त्याच्या कादंबऱ्याविषयीं येथे काहीं समालोचनात्मक विचार व्यक्त करावयाचें योजिलें आहे.

हरिभाऊ आपल्याच्या हयातींतच कादंबरीलेखनाला सुरुवात करून त्यानंतरच्या सर्व कादंबरीकारातून वाट काढीत काढीत प्रा. फडके यानीं आघाडी गाठली आहे हें त्याच्या प्रतिभेच्या सामार्थ्याचे गमक आहे. विविध विचारांचें, विविध मताचें प्रवचन, विवेचन भोंवतालीं चालूं असता प्रा. फडके यांनीं आपल्याकडे इतक्या प्रचंड वाचकवर्गाचें लक्ष वेधून घेतलें यातलें रहस्य काय आहे ? त्यानीं भोंवतालच्या समाजाची तूर्त पण तावडतोब अशी गरज ओळखली. वाङ्मयाकडे येणारा वाचकवर्ग हा पुष्कळ वेळा आपल्या प्रत्यक्ष जीवनातील दगदगीने कटाळून येतो. त्याला त्याच्या स्वतांच्या आणि भोंवतालच्या जीवनाचा विसर पाडील असें कांहीं पाहिजे असतें. विस्मृतीसाठीं तो आपापल्या मगदुराप्रमाणें काहीं साधनाचा अवलंब करतो. ती त्याची गरज ललितवाङ्मयानें भागविण्याचें पत्करलें तर त्या

वाङ्मयाचाहि तो अधीरपणें स्वीकार करील हें ओळखून प्रा. फडके यानीं कादंबरीलेखनास सुरुवात केली. आणि जीवनाची विस्मृति उत्पन्न करण्याचें कार्य आपल्या कादंबऱ्यांच्या द्वारें ते आजतागायत अत्यत यशस्वीपणें करीत आहेत. ( खाडेकर. 'गोकर्णीची फुलें' पृ. ४७ ). आपल्या भोंवतालच्या समाजातील आंग्लविद्यापरिचित तरुण वाचकवर्गाची नस त्यानी बरोबर ओळखली. पाश्चात्य वाङ्मयातून आणि समाजातून जे सुखविलास आढळ-तात ते तरुण मनास साहजिकच आकर्षक वाटतात. त्या जीवनाचे थोडें फार अनुकरण करण्याची ते धडपड करतात. त्या जीवनाचीं चित्रें त्यांच्या मनांत तरंगत असतात. तीं चित्रें अत्यंत कौशल्याने रगविणारा शब्दचित्रकार प्रा. फडके याच्या ठिकाणीं वाचकास लाभला. त्यात त्याना व्यवसायाच्या निमित्तानें आधुनिक तरुण-तरुणींच्या जीवनाचा जास्त जवळून परिचय झाला आणि मूळच्या कलोपजीवि प्रवृत्तीची त्याला जोड मिळाली. पाश्चात्य वाङ्मयांतील तत्सम भागाचा त्यांनीं रसिकपणें अभ्यास केला. आणि मानस-शास्त्रांत तर आधींच प्रावीण्य मिळविलेलें. या सर्व गुणसमुच्चयानें तरुण पिढीच्या मनाच्या स्वभावधर्माचे त्यांचे अंदाज अगदीं अचूक ठरले. स्त्रीच्या तारुण्यसंपन्न देहाचीं वर्णनें करण्यांत त्याच्याइतकी सूक्ष्म दृष्टि कोणी दाखविली नाहीं आणि तो वर्ण्यविषय हा मनुष्याच्या मनावर कोणच्याहि स्थितींत हमखास पकड घेणारा. हें आकर्षण आपल्या प्रत्येक ललितकृतींत त्यानीं कायम राखले आहे. आणि त्या आकर्षणाचें समाधान मिळण्याची एक हमखास जागा असा विश्वास त्यानीं वाचकाच्या ठिकाणीं उत्पन्न केला आहे. तारुण्यसुलभ वृत्तींची शुश्रूषा करण्याच्या कौशल्यानें त्याना भराभर लोकप्रियता मिळाली आणि ती लोकप्रियता आज त्याच्यावर अधिकार गाजवूं पहात आहे. परंतु वाचकानीं दिलेल्या मानमान्यतेनें फडके याच्या प्रतिभेला अद्याप निष्क्रियता आली नाहीं. काहीं झालें तरी ते लोकप्रियतेचे गुलाम होणार नाहींत अशीं चिन्हें मधूनमधून दिसतात. काहीं वेळा आपल्या वाचकवर्गाच्या अभिरुचीस, तारुण्योन्मादाच्या वातावरणापासून ते जीवनाच्या इतर भव्य प्रदेशातहि घेऊन जातात आणि तेथेंहि त्याचें सूक्ष्म अवलोकन आणि ओघवती भाषा हीं दिसून येतात. त्याच्या सौंदर्योपासनेबद्दल बराच गवगवा झाला, याचें कारण त्यांच्यासारख्या सव्यसाची प्रतिभासंपन्न

लेखकानें लोकाभिरुचीचें इतक्या सामान्य पातळीवर आराधन करूं नये, असें त्यांच्या विचारी वाचकांस वाटतें. निदान वाचकवर्गावर एकदां अधिकार प्रस्थापित केल्यावर तरी 'काश्मीरी गुलाबा' पेक्षां 'वादळ' दाखवावें अशीच या तक्रारींत अपेक्षा आहे. 'अखेरचें बंड' या त्यांच्या नव्या कादंबरींत विशेषतः पूर्वार्धांत त्यांनीं आपलें अगदीं निराळेंच सामर्थ्य दाखविलें आहे. यावरून ही अपेक्षा अस्थानीं नाहीं हे खास. भोंवतालच्या राजकीय परिस्थितीचा आपल्या कथानकाची पार्श्वभूमि म्हणून उपयोग करण्याचाहि त्यानीं अभ्यासपूर्वक प्रयत्न केला. परंतु अद्याप सुखासीनतेची त्यांच्यावरची पकड कमी होत नाहीं. त्यामुळें भोंवतालच्या प्रत्यक्ष जीवनाशीं ते समरस होऊं शकत नाहींत. राजकीय चळवळींत वावरणारे त्याचे नायक हे प्रणयोन्मादाचा झटका येईपर्यंत अगदीं लाठीमारसुद्धा सहन करतील. परंतु त्यांचें तेथें येणें केवळ थारेपालट करण्यासाठीं झालेलें असतें आणि राजकारणात वावरणाऱ्या ध्येयनिष्ठ तरुणांचें ते विडंबन आहे असेंच शेवटीं वाटू लागतें. त्याच्या नायिका ह्या सनातन पतिभक्तीचा एक आधुनिक अवतार आहे. त्यांचें शिक्षण, अवातर वाचन, कलात्मकता, सौंदर्याभिरुचि ही सर्व लेखकानें दाखवून दिलेल्या नायकाभोंवतीं घोटाळत असतात. आणि नायकाचेंच कर्तृत्व बेताबाताचें असल्यानें त्या त्याच्याहून जास्त निष्क्रिय वाटतात. आधुनिक सुशिक्षित तरुणींना तीं चित्रें प्रातिनिधिक वाटत असतील असें वाटत नाहीं. आणि एखाद्या वेळीं प्रातिनिधिक वाटलीं तरी त्याच्या जीवनाचे ते तसले प्रतिनिधि म्हणून त्याच्या जीवनाचा तो जाहीर उपहासच नाहीं का? कारण वास्तव खरोखरच इतकें सुखासीनतेमुळें पागुळलेलें, दुबळें झालेलें असेल तर त्याचें इतकें आळवून आळवून कौतुक करीत बसण्यांत काय स्वारस्य आहे!

हें कांहींहि असलें तरी एका बाबतींत प्रा. फडके यांचें कादंबरीक्षेत्रातील कार्य चिरस्मरणीय आहे तें म्हणजे लेखनाचें तंत्र. लेखनाच्या तंत्राचा त्यांच्याइतका सूक्ष्म अभ्यास इतरानींहि केला असेल. परतु त्या तंत्राचा प्रत्यक्ष आविष्कार करण्याच्या बाबतींत त्याचें कौशल्य केवळ अतुलनीय आहे. कलावादाचा पुरस्कार करण्याचें एकदां व्रत घेतल्यावर त्यांनीं त्यांत एखाद्या तपस्व्यासारखी निष्ठा दाखविली. मराठी भाषेला अभूतपूर्व सौंदर्य त्यांनीं मिळवून दिलें. आपलें कौशल्य हें गुरुमंत्रासारखें गुप्त न ठेवता त्यानीं तें अत्यंत विस्तारानें

वारंवार विशद केलें आणि त्यामुळें त्यांनीं असंख्य तरुण लेखकांना तंत्राच्या बाबतींत मार्गदर्शन केलें. मराठी लेखनपद्धतीवर—विशेषतः कथालेखनपद्धतीवर प्रा. फडके यांच्या तंत्रसामर्थ्याचा प्रभाव दीर्घकाल टिकणारा आहे. स्वतंत्र लेखनापेक्षांहि त्यांच्या अनुवादात्मक व रसग्रहणात्मक कृति या जास्तच परिणामकारक आहेत. आपल्या आकाशवाणींतून त्यांनीं पाश्चात्य वाङ्मयांतील थोर ललितकृतींचा परिचय करून देऊन मराठी वाङ्मयांत एक नवें दालन उघडलें. त्यावरून ललितवाङ्मयाविषयींची त्यांची दृष्टि किती मर्मग्राही आहे हें दिसतें. अस्सल रसिकाच्या अंतःकरणाची ओळख त्या ग्रंथांत होते. मूळचे अभिजात ग्रंथ आणि त्यांचें आविष्करण करणारा प्रा. फडके यांच्या-सारखा मर्मज्ञ रसिक अभ्यासक आणि प्रसन्न शैलीकार निवेदक हा एक सुवर्णयोग आहे. तें वाचताना असें वाटतें कीं, आपल्या वाचकांच्या उथळ अभिरुचीच्या आहारीं जाऊन त्यांनीं स्वतंत्र म्हणून जें लिहिलें त्यात त्यांनीं आपल्या कलेचा काहींसा अपव्ययच केला आहे. त्यांच्या ठिकाणच्या सामर्थ्याचें एका प्रथितयश टीकाकाराचें अगदीं ताजें प्रशस्तिपत्र पहा :

" त्यांचा बहुश्रुतपणा, त्यांचें नाट्य, चित्रपट, गायन, वाङ्मय इत्यादि विषयांचें सम्यग्ज्ञान, चटकदार वर्णनाची हातोटी, मनोविश्लेषणावरील प्रभुत्व चित्तवेधक कथानक, स्वभावलेखन, संवाद यात दिसून येणारें चातुर्य हे सर्व यशस्वी कादंबरीकारांचे गुण...त्यांची भाषाशैली म्हणजे त्याच्या व्यक्ति-मत्त्वाचें प्रतीक होय. तिच्यात ऐट आहे, जबर आत्मविश्वास आहे. 'अखेरच्या बंडात'ली रेवा जशी स्वच्छंदी, आनंदी आणि अचपळ तशीच ही ! "

प्रा. रामचंद्र कृष्ण लागू,

'सह्याद्रि'—नोव्हें. १९४४.

'अखेरच्या बंडाचा'च दृष्टान्त चालवून पुढें असें म्हणता येईल कीं, रोहिणीनें आपल्या नादान भावंडांची खुषमस्करी करण्याचें एकदम बंद करून आपल्या जीविताचा कोंडमारा करणाऱ्या परिस्थितीविरुद्ध निश्चयानें बंड उभारलें, त्याचप्रमाणें प्रा. फडके यांनीं सवंग लोकप्रियतेच्या आराधने-विरुद्ध बंड पुकारून 'वादळ' सारख्या कृति स्वतंत्रपणें तयार करण्याचें आपलें सामर्थ्य प्रकट करावें !

प्रा. फडके ' दौलती 'चें सुख उपळीत होते आणि ' अटकेपार ' जाण्याची पूर्वतयारी करीत होते ( १९३१ ). त्याच सुमारास श्री. खांडेकरांनीं कादंबरीच्या दालनांत ' हृदयाच्या हांके 'पासून प्रवेश केला. प्रा. फडके यांच्यापेक्षां अगदीं निराळ्या साधनसामुग्रीनें प्रवेश करून श्री. खांडेकर यांनीं आपलें स्वतंत्र स्थान कादंबरीवाङ्मयात लवकरच संपादन केलें. लौकिक जीवनात पुढें येण्यास प्रा. फडके यांच्या मानानें कांहींहि अनुकूलता नसतांना खाडेकरानीं संपादिलेलें हें यश हें केवळ त्याच्या वाङ्मयांतील प्रभावी गुणांचें फल आहे. पहिल्याच कादंबरींत त्यांनीं मानवी जीवनावर सत्ता गाजविणाऱ्या ईश्वरी अंशाचा जोरानें उच्चार केला. समाजातील अन्याय, अरेरावी याचा पार्श्वभूमीसारखा उपयोग करून त्या अरेरावीविरुद्ध झगडणारे नायक त्याच्या कादबऱ्यातून दिसूं लागले. प्रा. फडेक यान्च्या वाङ्मयानें जें एक मोहजाल तयार केलें होतें त्या मोहजालाच्या धाग्याना हिसके बसूं लागले आणि दिवाणखान्यांत घोटाळणाऱ्या वाचकाना बाहेरचें जग दाखविणारा हा कादंबरीकार आपल्या वैशिष्टयाचा प्रभाव दाखवूं लागला. तारुण्य, रूप आणि पैसा हींच आराध्य दैवते आहेत असें मानणाऱ्या प्रा. फडके याच्या नायकांना तें ' कांचनमृगा'सारखें आहे असें खाडेकराचे नायक सागूं लागले. एकमेकाची वेषभूषा सजविणें म्हणजेच संसाराची इतिकर्तव्यता असे वाटणाऱ्या वाचकवर्गास शरीरात हृदय-मन म्हणून काहीं एक असतें याची आठवण खांडेकरानीं करून दिली. अपेक्षित प्रियकराचा सहवास हेंच सुख, त्याचा विरह हेंच दुःख, त्याच्या प्राप्तीचा पाठलाग हेंच कर्तृत्व असा जीविताचा त्रिकोण रचून बसलेल्याना खाडेकरानें याहीपेक्षा जास्त व्यापक सुख-दुःखाची ओळख करून दिली. मध्यमवर्ग आणि बहुजनसमाज यांचा संघर्ष खांडेकरांनीं आपल्या कादंबऱ्यातून दाखविला. त्याच्या कादंबऱ्यातील तरुणतरुणींना तारुण्यसुलभ सुखाची अभिलाषा नाहीं असें नाहीं; परंतु आजच्या परिस्थितींत वैयक्तिक सुखदुःखें सुद्धां सामाजिक परिस्थितीपासून अलिप्त राहूं शकत नाहींत हें सत्य खांडेकरानीं आपल्या कथानकातून प्रकट केलें. माडखोलकरानीं आपलें आवडते लेखक म्हणून फडके आणि खांडेकर यांचा एकत्र उल्लेख केला आहे. आणि मराठी कादंबरी वाङ्मयातील ' दोन ध्रुव ' असें त्याचें वर्णन केलें आहे. मध्यमवर्ग या एकाच समाजविभागावर लेखन करणाऱ्या या

दोन लेखकांत दोन ध्रुवाइतकें अंतर पडावें हे एक आश्चर्यच नाहीं का ! परंतु याचें कारण मध्यमवर्गात इतके तीव्र भेद आहेत असे नाहीं. प्रत्येकानें त्या जीवनातील राईचा पर्वत केल्यामुळें त्या वाङ्मयकृतींत हा फरक दिसूं लागला आहे इतकेंच. त्यातल्या त्यात प्रा. फडके यांनीं निवडलेला सामाजिक जीवनाचा भाग इतका आकुंचित, मर्यादित आहे कीं, त्याच्या थोडेसे बाहेर गेलेल्या लेखकाचें जग एकदम निराळें आणि व्यापक वाटूं लागतें. वस्तुतः फडके व खाडेकर या दोघांचींहि जगें एकत्र केलीं तरी मध्यमवर्गाच्या जीवनाचा सुद्धां फारच थोडा भाग त्यांत समाविष्ट होतो आणि बराचसा भाग या दोघां कलमबहादुरांच्या लेखणीच्या पल्ल्यापासून दूर आणि अलिप्त राहिल्याचें आडळून येतें; परंतु एखाद्या वाङ्मयाचें मूल्यमापन ' भौगोलिक ' पद्धतीनें करण्याची ही पद्धति फारशी उपकारक ठरत नाहीं. त्यापेक्षां त्यानीं निवडलेल्या जगाची मर्यादा मान्य करून तें तरी कितपत वास्तव आहे हे पहावे. त्यातील प्रसंगातील कार्यकारणसंबंध कितपत तर्कशुद्ध आहे, कितपत न्याय्य आहे हे पाहावें. आपल्या कथानकाचें पर्यवसान घडवून आणतांना तें कितपत समर्थनीय आणि सुसगत आहे हें पाहणें जास्त उपकारक आहे. त्या दृष्टीनें पाहिलें तर प्रा. फडके यानीं तर्कशुद्धता जितकी पाळली आहे तितकी खाडेकरानीं पाळलेली दिसत नाहीं. आपल्या कथानकातील सुखवादास पेलतील असेच पेंचप्रसंग फडके यानीं उत्पन्न केले आहेत. त्यामुळें त्यातून त्यांचे नायक पाहता पाहता निसटतात. नायक राजकीय आंदोलनात कार्य करताना नेमका अ वर्गात पोहोचवला कीं, त्याची सुटका करून प्रणयिनीच्या हातीं पोहोंचविणें फारसें अवघड ठरत नाहीं. परतु तेंच त्याच्या भोंवतीं सामाजिक जीवनातील मोठमोठे पेचप्रसग उत्पन्न झाले, सत्ताधीशाशीं, अरेरावाशीं कांहीं ध्येयासाठीं त्याचा झगडा सुरू झाला, काहीं तत्त्वाचें त्यानें कंकण बाधलें कीं, मग तो पेचप्रसंग जास्त तीव्र होतो. अशा ध्येयनिष्ठ तत्त्ववाद्याला ज्या कर्तव्यनिष्ठुरतेनें सर्वस्वाचा होम करण्याची तयारी ठेवावी लागते ती कर्तव्यनिष्ठुरता नायकाच्या अंगीं नसल्यानें शेवटीं देवाची किंवा दैवाची त्याला मदत पोहोंचवावी लागते. त्याच्या विरोधकांत एकदम अंतःकरणाचा पालट घडवून आणवावा लागतो आणि विजयाची अपेक्षा समेटानें पूर्ण करावी लागते. सामाजिक जीवनाची

पुनर्रचना करण्याचें नवें शास्त्र रशियामध्यें यशस्वी ठरलें आहे. आपले प्रश्न सोडविण्याच्या बाबतींत हतबुद्ध झाल्यावर एकदां त्या विलायती औषधाचा तरी प्रयोग एकदां करून पाहावा, अशा भावनेनें बऱ्याच कादंबरीकारांनीं आपल्या सामाजिक जीवनावर समाजवादाचें कलम बांधलें आहे. परंतु त्या प्रयत्नांत अद्याप त्यांना यश आलें नाहीं आणि समाजवादाला अत्यंत विसंगत अशा दैवी उपायांचा त्यांना अवलंब करावा लागला. रशियाइतका आपल्याकडील वर्गविग्रह तीव्रतेला पोहोंचला नाहीं. त्यामुळें त्या अवस्थेंतील उपाययोजना इथें अस्थानीं ठरते असें या दोषाचें विवरण कांहीं समाजशास्त्रज्ञांनीं केलें आहे. खांडेकरांनीं आपल्या कथानकांत घुसडलेला समाजवाद बाजूस ठेवला तर त्यांच्या कादंबऱ्यांतील जीवन, वास्तवाची बरीच ओळख पटविणारें आहे हें दिसून येतें. मध्यमवर्गीतील बुद्धिजीवि लोकांच्या जीवनाचीं विविध चित्रें त्यानीं अतिशय सहृदयपणें काढिलीं आहेत. त्याहि कठिण परिस्थितींतून ध्येयवादाची उपासना करणारे लोक त्यांनीं रंगविले आहेत. मध्यमवर्गाच्या जीवनाच्या नैराश्यमय वातावरणात त्या ध्येयनिष्ठ व्यक्ति दीपस्तभासारख्या वाटतात. सामाजिक जीवनाप्रमाणें वैयक्तिक जीवनातील पेचप्रसंगहि त्यानीं उद्बोधकपणें रंगविले आहेत. प्रेमाच्या व्यवहारात ‘ हा कीं तो ’ किंवा ‘ ही कीं ती ’ एवढाच विग्रह नसतो; तर प्रेम आणि कर्तव्य, प्रेम आणि वैयक्तिक अभिरुचीची प्रवृत्ति, वैयक्तिक जीवनातील प्रेम आणि सामाजिक कर्तव्याची ओढ असें या झगड्याचें बहुविध स्वरूप आहे. प्रेमाच्या काव्यात्म कल्पना आणि व्यवहार याचा झगडाहि अतिशय तीव्र असतो. वैयक्तिक जीवनांतील प्रेमव्यवहाराचें सुद्धां असे बहुविध पेंचप्रसंग खाडेकरांनीं रंगविले आहेत. एकंदरींत पेंचप्रसंग सोडविण्याचें त्याचे मार्ग कधीं दैववादी, कधीं ध्येयवादी, कधीं अद्भुत असे वाटले तरी ते पेंचप्रसंग रंगवितांना वास्तव जगाचें व्यापक दर्शन त्यानीं वाचकास दिलें आहे. शैलीच्या बाबतींत त्याना बऱ्याच अडचणी आहेत. गडकरीवळणाची त्यांच्यावरची पकड ही त्याच्या यशाच्या मार्गातील मोठी धोंड आहे. तरी ती कृत्रिमता, तो केवळ बुद्धिनिष्ठ आनंदाचा विलास त्याच्या व्यापक विचारसरणीनें व वास्तववादी दृष्टिकोनानें सह्य होतो. दिवसेंदिवस क्षणभर गुंगविणाऱ्या फडके यांच्या मोहजालापेक्षां भोंवतालच्या जीवनाविषयीं विचार करावयास लावणारें

खांडेकरांचें उद्बोधक वाङ्मय मराठी वाचकास जास्त आपुलकीचें वाटूं लागलें आहे.

फडके आणि खांडेकर यांना दोन ध्रुव म्हणताना माडखोलकरांनीं त्या भूगोलावर आपलें स्थान कोणचें योजिलें असेल कोणास ठाऊक ? खाडेकराची ' हृदयाची हांक ' प्रकट झाल्यावर तीन वर्षांनीं माडखोलकराचा ' मुक्तात्मा ' अवतीर्ण झाला. त्याच्या या पहिल्याच कादंबरींत त्यांचा राजकारण हा जिव्हाळ्याचा विषय आहे हें दिसून येतें. टिळकाच्या नंतर राजकीय पंथाविषयीं जो संभ्रम उत्पन्न झाला त्या संभ्रमांतून मुक्त होण्यासाठीं कम्युनिझमचा पुरस्कार माडखोलकरांनीं आपल्या पाहिल्याच कादंबरींत केला आणि कोणच्या तरी राजकीय मताचें वा पथाचें समर्थन करण्याचा हा प्रघात त्यानीं आजतागायत चालूं ठेवला आहे. वृत्तपत्र-व्यवसाय हा त्यांचा आवडीचा व्यवसाय पोटासहि उपयोगी पडूं लागल्यानें राजकारणाचा त्याचा व्यासंग आणि आवड चागलीच वाढली आणि तिचे पडसाद त्याच्या कादंबऱ्यांतून उठूं लागले. राजकारण ही आवड आणि कादंबरीलेखन ही कामधेनु असे त्याच्या बाबतींत असल्याचे त्यानींच कबूल केले आहे. त्यामुळें आपले राजकीय विचार मनसोक्तपणें रगविण्याची सोय कादबरीलेखनानें त्याना लाभली. देशातील राजकीय आदोलनाचीं परिणामकारक शब्दचित्रें त्याच्या वाङ्मयात दिसतात. त्याचें वैशिष्ट्य साग-ताना ' टीकात्मक कादबरीकार ' असे खाडेकर त्याच्याविषयीं म्हणतात. ( गोकर्णीचीं फुलें पृ. ६५. ) आजचे प्रमुख राजकीय कादंबरीकार असा माडखोलकराचा गौरव झाला तो योग्यच होता. परंतु माडखोलकरानी पुढे पुढें समाजजीवनाकडेहि आपले लक्ष वळविलें. राजकारण आणि सामाजिक जीवन या प्रवाहांत सापडलेली त्याची लेखणी मधून मधून बौद्धिक नव्हे, नैतिक अराजक माजवूं लागली.

या तीन प्रमुख कादबरीकारानीं एकमेकाविषयीं केलेलीं विवेचनें वाचलीं म्हणजे मोठी मौज वाटते. टीकाकारानीं याच्या गळीं उतरविलेल्या दोषाचा प्रमादाचा त्यानीं परस्पराना आहेर चालविला आहे. एक दुसऱ्याबद्दल जें

बोलतो तें नेमकें त्याला स्वतःलाच लागू पडतें. उदाहरणार्थ, माडखोलकर, प्रा. फडके यांच्याविषयीं लिहितातः "मध्यवर्ति प्रणयकथेला राजकीय चळवळीचे कालखंड चिकटवून त्यांनीं राजकीय कादंबऱ्या तयार करण्याचाहि एक साचा उत्पन्न केला आहे." खांडेकरांचा माडखोलकराविषयीं अभिप्राय पहा : " माडखोलकराचे विचार दर सहा महिन्यानीं बदलतात. व जेव्हा तसा बदल होतो तेव्हा तो बदल योग्य आहे, असें दाखविण्यासाठीं एक सिद्धान्त शोधून काढण्याचा ते प्रयत्न करतात."

'समीक्षक' १५-६-१९४१

आणि प्रा. फडके याचा या दोघाविषयींचा अभिप्रायहि असाच आहे. राजकीय जीवनाचें माडखोलकराचें व फडके याचेंहि विवेचन अतिशय सूक्ष्म दृष्टीनें केलेलें असलें तरी त्या विवेचनाच्या वाशिल्यानें आलेला उत्तान शृंगार हाच त्यांच्या कादंबरींतील भाग जास्त उठून दिसूं लागतो. प्रा. फडके व खांडेकर याच्याविषयीं लिहिताना माडखोलकरांनीं समर्थनार्थ वापरलेलें सुभाषितच मीहि उद्धृत करतोंः—

" Is life like this ? Must novels be like this ? Look within and life it seems, is very far from like this. "

'व्हर्जिनिया वुल्फ.'

कादंबरीवाङ्मयाची आणि एकंदर वाङ्मयाची अतिशय मूलगामी मीमांसा या तिघानीं केलेली आहे. ती त्यानाच आज जास्त उपयोगीं आहे. 'वैद्यराज आधीं आपली प्रकृति सुधारा' असें सांगण्याचा प्रसंग आपल्यावर यावा हें आपल्या वाङ्मयाचें दुर्दैव आहे. त्यांचेच उतारे त्यांना आणि इतराना वारंवार उतरून दाखविण्यांत काय स्वारस्य आहे ?

प्रा. फडके, खांडेकर, माडखोलकर या त्रिकोणांतून बाहेर पडल्यावर त्याच्याजवळच यंदाच्या संमेलनाचे अध्यक्ष श्री. भा. वि. वरेरकर दिसतात. 'कुलाब्याची दांडी' आणि वरेरकराची पहिली कादंबरी 'चिमणी' या समकालीन आहेत. परंतु फडके व वरेरकर यांच्या वाङ्मयाचे प्रवाह हे समकालीन असले तरी कोठेंहि एकरूप झाले नाहींत. प्रचाराचें एक साधन म्हणूनच वाङ्मयाचा त्यांनीं आश्रय केला. अर्थात् कलावादी पंथाशीं

त्यांचें कोणच्येंहि साम्य असण्याचा संभव नाहीं. तसें पाहिलें तर कलावादी म्हणविणाऱ्यानींहि कांहीं विशिष्ट मातांचा, विचारांचा आणि आचारांचा पाठपुरावा केला आहे. फडके व खांडेकर या दोघां कादंबरीकाराच्या मनोधर्मात कोठें तरी विलक्षण साधर्म्य आहे, असा निर्वाळा माडखोलकरानीं दिला आहे. तेव्हा कलावादी व प्रचारवादी इत्यादि भेदांच्या तपशीलांत न शिरतां असें म्हणतां येईल कीं, वरेरकर हे जास्त प्रकटपणें, प्रसिद्धपणें प्रचारवादी आहेत. प्रचारासाठीं स्वीकारलेल्या मतात त्याचा स्त्रीदास्यविमोचनावर जास्त भर आहे. आधुनिक स्त्रीच्या कर्तृत्वाचें एक रम्य स्वप्न त्याच्या मनात तरंगत आहे आणि तें स्वप्न ते आपल्या लेखनांतून रंगवितात. त्याच्या ठिकाणच्या नाट्यगुणामुळे त्याच्या कादंबरीलेखनातहि सत्याभासावर उभारलेली आकर्षकता उत्पन्न होऊं शकते. हेंहि होऊ शकेल असें क्षणभर वाटते. परतु शेवटीं मात्र ही एक लेखकाची हौस आहे यापलीकडे फारसें पटत नाहीं. वरेरकरांचा एक विशेष म्हणजे कोणच्याहि नव्या प्रश्नाचा धागा ते पटकन् धरूं शकतात. तो प्रश्न सोडविण्याचा मार्ग आपणास माहीत आहे अशा आत्मविश्वासानें लिहू लागतात. त्यासाठीं रचलेल्या कथानकात तो प्रश्न सुटतोहि ! परंतु प्रत्यक्ष जगात इतकी हुकमी अनुकूलता मिळत नाहीं याची जाणीव वाचकास जास्त तीव्रतेनें होते. प्रश्नाच्या उत्तराच्या बाबतींत वाचकास असें असमाधान वाटलें तरी त्या निमित्तानें प्रचलित प्रश्नाचें बरेंच स्पष्ट स्वरूप वरेरकराच्या लेखनामुळें होतें यांत शंका नाहीं. त्याच्या लिहिण्याची तत्परता व बहुप्रसवा प्रतिभा यामुळें वेळोवेळीं उत्पन्न होणाऱ्या नव्या नव्या विचारप्रवाहाबरोबर ते आपली गति टिकवूं शकले आहेत. प्रचाराच्या बाबतींत त्याची आवडनिवड फारशी चोखंदळ नाहीं. सगळेच प्रश्न त्याना सारखेच जिव्हाळ्याचे वाटतात. याचाच अर्थ त्याचें स्वतःचें असें सामाजिक पुनर्रचनेचें निश्चित तत्त्वज्ञान नाहीं. लोकांच्या मनाला कौल घेऊन ते लिहावयास सुरुवात करतात. आणि लेखनाच्या व्यावहारिक बाबतींत थोडें फार यशहि मिळवितात. अनंत विचार-प्रवाहांचें व मताचें विस्कळित टाचण असें त्याचें वाङ्मय झालें आहे. त्यांत विधवांच्या प्रश्नापासून तों मद्यपानबंदीपर्यंत आणि गिरणीकामगारांपासून तो अस्पृश्योद्धारकापर्यंत सर्व लोकाची ये-जा होत असते. त्यांनीं जरा स्वस्थपणें वाङ्मयाकडे लक्ष पुरवलें तर त्याच्या वेगवान् लेखनशक्तीचा उद्बोधनाच्या

कामीं जास्त उपयोग होईल. ही स्वास्थ्याची विनति केवळ वाङ्मयीन अपेक्षेनें केली आहे. त्यांत लेखकाच्या अत्यंत बिकट परिस्थितीची अवहेलना करण्याची ओझरतीहि इच्छा नाहीं. त्यांच्यासारख्या वयोवृद्ध लेखकास विकृत लोकाभिरुचीच्या काळात वाङ्मयावर उपजीविका करण्याचा प्रसग यावा ही गोष्ट मराठी वाचकवर्गास लाजिरवाणी आहे. त्याच्यासारखे अनेक अज्ञात लेखक असतील. त्याची चौकशी करण्याइतकीहि आपुलकी कोणी दाखविली नाहीं. असो. वाङ्मयव्यवहारातील ही परिस्थिति हा एका दृष्टीनें वाङ्मयचर्चेपेक्षांहि जास्त जिव्हाळ्याचा विषय असला तरी या लेखात तो अप्रस्तुत आहे म्हणून सोडून देतों.

वैयक्तिक जीवनातले प्रश्न सोडविताना रूढ नीतिनियमांच्या उत्क्रांतीची व पुनर्रचनेची वाट न पाहता एकदम बडच उभारावे अशी वृत्ति यानंतर कांहीं लेखक दाखवूं लागले. त्यात पु. य. देशपाडे याची ‘बधनाच्या पलीकडे’ ही कादबरी कालानुक्रमाने प्रमुख ठरते. ती त्यानीं १९२६ सालीं लिहिली. लोकमताला धक्का देणारी पहिली सामाजिक कादबरी म्हणून ग्रथ आणि ग्रथकार याकडे लोकाचे लक्ष वेधले. काही भयंकर तत्त्वज्ञान समाजात येत आहे म्हणून लोक दचकून पाहूं लागले. परतु वादळ शान्त झाल्यावर असे दिसून आलें कीं, ही केवळ चीड आहे. त्यांत शास्त्रीय विचार कोठलाहि नाहीं. श्री. देशपाडे यानीं त्यानंतर कादंबऱ्यांत धक्का देण्याचें वेड सोडून देऊन मनोविश्लेषणास सुरुवात केली. परित्यक्ता, असंतुष्ट, उपेक्षित व्यक्तींच्या जीवनातील—अतर्मनातील—कोलाहल व्यक्त करण्याचा उपक्रम सुरू झाला. आणि विशेषतः वैवाहिक जीवनात सामाजिक रूढीमुळें ज्याचा कोंडमारा होतो अशा नायिकाच्या मूक दुःखाला वाचा फुटली. श्री. देशपांडे यानी स्त्रीप्रमाणें पुरुषाच्याहि जीवनातील सुप्त यातनाचा आविष्कार केला. परतु पुरुषाच्या जीवनाविषयीं इतका जिव्हाळा कादबरीवाङ्मयात पुढे कोणी फारसा दाखविला नाहीं. सुशिक्षित स्त्रीच्या जीवनाच्या बाह्य स्वरूपाकडून अतःप्रवाहाकडे लोकाचे लक्ष वेधण्याचा प्रघात सुरू झाला. त्या अंतःप्रवाहाचा अत्यंत परिणामकारक आविष्कार विभावरी शिरूरकर यांनीं केला. विवाहित स्त्रियांप्रमाणें प्रौढ कुमारिकाचींहि कांहीं दुःखें आहेत हें विभावरी-वाङ्मयानें जगापुढें येऊं लागलें. अर्थात् तीं दुःखें पाहिल्यानंतर, प्रौढवयापर्यंत राहिलेलें कौमार्य

ही सामाजिक सुधारणा नसून ती एक अगतिकपणें स्वीकारलेली कुचंबणा आहे, हें स्त्रीलेखिकाच सागू लागल्यामुळें समाजात मोठी खळबळ उडाली. स्त्री-पुरुषाच्या वैयक्तिक आशा-आकांक्षांची पर्वा न करता आपली प्रतिष्ठा मिरविणाऱ्या रूढ विवाहपद्धतीला सगळीकडून धक्के बसू लागले. कथा-वाङ्मयातून तरी असें दिसू लागलें कीं, विवाहसंस्थेतील अडमुठेपणा, अरेरावी दूर होत नसेल तर त्या संस्थेची इभ्रत वगैरे गोष्टींची यापुढें फारशी पर्वा केली जाणार नाही. शक्य असल्यास आचारस्वातंत्र्य नाहीं तर विचारस्वातंत्र्य तरी विवाहित परंतु असंतुष्ट पतिपत्नी—विशेषतः पत्नी पुकारणार! विवाहबाह्य स्त्री-पुरुषसंबंधानें कादंबरीवाङ्मयाचा बराच भाग व्यापला जाऊं लागला. विवाहपूर्व जीवनात कुमार—कुमारींचा अनिर्बंध सहवास हा कादंबरी—वाङ्मयात आज रूढ झाला आहे. विवाहपूर्व स्त्री-पुरुष सहवासाचे प्रसंग हे आक्षेपार्ह आहेत असें सांगणारे 'सुशीलेच्या देवा'तील वामनराव पाहता पाहता प्रतिगामी ठरत आहेत. अशा सहवासप्रसंगांना दचकणें हे मागासलेपणाचें लक्षण गणले जाऊं लागले. प्रौढ कुमारींच्या आचारस्वातंत्र्याचा अनुवाद कथेंतील विवाहित स्त्रियाहि करूं लागल्या. पति आणि प्रियकर या दोन व्यक्ति झाल्यामुळें विवाहितांच्या जीवनात संघर्ष उत्पन्न झाला आणि विवाहबंधनाच्या लौकिक मर्यादा सांभाळून विवाहित प्रिया व विवाहबाह्य प्रियकर यांच्या अनिर्बंध भेटीगाठी होऊन दुःखाला एक नवी वाट मिळाली. विवाहाचा कोणचाहि प्रकार बंधनकारक वाटावा आणि प्रियकर हा पतिव्यतिरिक्त पुरुष असावा असा जणं काय संकेतच ठरून गेला. स्त्रीदास्यविमोचनाचा हा प्रकार सामान्य वाचकांच्या प्रसुप्त भावना चेतवून एक प्रकारचें विकृत समाधान देतो. त्यामुळे अशा प्रकारच्या कादंबऱ्या भराभर लोकप्रिय होऊं लागल्या. आज प्रा. फडके प्रतिगामी आणि सनातनी ठरावेत इतकी आघाडी स्वैराचारप्रवर्तकानीं गाठली आहे. याची अस्फुट सुरुवात 'बंधनाच्या पलीकडे' या कादंबरीच्या आसपास झालेली दिसते. श्री. पु. य. देशपांडे हे आता प्रथित समाज-सत्तावादी आहेत. त्यांच्या अलीकडल्या कादंबऱ्यात समाजातील आर्थिक संबंधांचें विवेचन थोडेंफार येणें अपरिहार्य आहे. परंतु त्या कादंबऱ्यांचा मुख्य भर सामाजिक पुनर्रचनेपेक्षा व्यक्तिस्वातंत्र्यावरच आहे. आणि तें

व्यक्तिस्वातंत्र्यहि लौकिक आचारस्वातंत्र्यापुरतेंच मर्यादित दिसतें. आधुनिक कादबरीच्या इतिहासाच्या दृष्टीनें पाहिलें तर बहकलेल्या तारुण्याचीं स्वैरपणें रंगविलेलीं चित्रे काढणाऱ्यात श्री हडप याच्याकडे अग्रेसरत्व जातें. त्याची ‘बहकलेली तरुणी’ १९२४ साली प्रसिद्ध झाली त्यानंतर त्यानीं भरा-भर ‘इष्काचे पेले’ वाचकास भरभरून देण्याचा सपाटा सुरू केला त्या कादबऱ्यातून शेवटीं बहकलेल्याचा शपथेपुरता कोठें तरी निषेध केलेला असेल. परतु शेवट गाठावयाच्या आतच वाचकास धुदी यावी अशी त्याची विलक्षण लेखनपद्धति होती. ऐन तारुण्यात पत्करलेली ही इष्कबाजी श्री. हडप यानीं सोडून ते एकदम नाथमाधवाच्या ‘स्वराज्य’ पंथात सामील झाले आणि त्यानीं १९२६ सालीच ‘पेशवाईचे पुण्याहवाचन’ केले. त्यानीं ऐतिहासिक कादबरीक्षेत्रातहि उदड लेखन केले आणि एक प्रकारें आपल्या तारुण्यप्रमादाचें परिमार्जन केले. आज ते साम्यवादाचे पुरस्कर्ते झाले आहेत आणि राजकीय कादबरीक्षेत्रातहि त्यानीं पूर्वींच्याच वेगाने लेखनास सुरुवात केली आहे. श्री हडप याची हीं स्थित्यतरें विस्मयकारक आहेत. लेखकाच्या वैचारिक जीवनात किती क्राति होऊ शकते हे पाहून आश्चर्य वाटते आणि कौतुकहि वाटतें. परंतु श्री. हडप यानीं सोडून दिलेला प्रणय-पथ मराठी कादबऱ्यात पुन्हा प्रस्थापित होऊ पहात आहे. अर्थात् काल-मानाप्रमाणे तो आधुनिक झाला आहे. प्रा. दाडेकराना वाटलेला लावणीपंथ हा श्री. हडपानीं हाताळलेल्या पथाचें आधुनिकीकरण आहे इतकेंच. या पथाच्या आधुनिक स्वरूपात नवे जगहि नटूं लागलेलें दिसतें. कांहीं नाम-वंताचा आश्रय मिळाल्यानें त्या पथास आता सामाजिक प्रश्नाचा सभावित-पणा लाभला आहे.

वैवाहिक जीवनाचा विचार करण्याच्या निमित्तानें मराठी कादंबरी-क्षेत्रात उत्तान शृगारप्रक्षोभक अशीं नग्नप्राय स्त्रीदेहाचीं वर्णने रंगूं लागलीं आहेत. आणि विजातीय नायिकांचा या कामीं उपयोग होऊं लागला आहे. हे सगळें कांहीं व्यक्तींच्या जीवनातील दुःखाचा परिहार करण्यासाठीं चालू असतें! तात्त्विकदृष्ट्या ज्या हक्कासाठीं, ज्या स्वातंत्र्यासाठीं लेखक त्याचा कैवार घेतात त्यापेक्षाहि जास्त स्वातंत्र्य दुःखितावस्थेमध्येंच त्या व्यक्ति उपभोगताना कथेंतून दिसतात! तरी कुचबणेबद्दलची त्याची तक्रार कायमच

असते ! याचा अर्थ एवढाच कीं, कादंबरीकाराच्या आशीर्वादानें त्याना लाभलेलें स्वैराचारस्वातंत्र्य हें कयेंतहि उजळमाथ्यानें उपभोगता येत नाहीं. समाजानें त्यास जाहीरपणें मान्यता द्यावी हा एकच अन्यायपरिमार्जनाचा मार्ग आहे असें लेखकास सांगावयाचें असतें कीं काय कोणास ठाऊक ! या स्वैराचाराचें विवेचन, प्रवचन, वर्णन, समर्थन हें पांढरपेशा समाजापुरतचे केंद्रित झालें आहे ही त्या समाजाची फार मोठी बेअब्रूच नाहीं का ?

वैवाहिक अन्यायातून स्त्रीची मुक्तता करतानाहि पुरुषी लेखकानीं स्वार्थी-पणा दाखविला आहे असें वाटून गीता ज. साने या कादंबरीक्षेत्रांत उतरल्या आणि त्यांनीं पुरुषवर्गावर स्वैरपणे शिव्याशापाची लाखोली वाहण्यास सुरुवात केली. आपल्या जातीचीं दुःखें जास्त भडक दिसावींत यासाठीं त्यानीं पुरुष तेवढे एकजात नादान, व्यसनी, टाकाऊ असे रंगविले. त्याच्या कादंबऱ्यादून या प्रश्नाविषयींचें त्याचें अज्ञान जागोजाग व्यक्त झाले आहे; तरी त्याची त्या लेखनातील पोटतिडीक, आवेश हीं वाचकाचीं मनें आकर्षित करूं शकलीं. आज त्याहि समाजसत्तावादी झाल्याचें दिसतें आणि समाजशास्त्राच्या अभ्यासानें त्याची भावनाविवशता ओसरून तेथें शास्त्रीय विचारसरणी दिसू लागेल अशी आशा आहे. स्त्रीदास्यविमोचनाची कायद्याच्या दृष्टीनें शक्याशक्यता दाखविण्याचें महत्त्वाचें कार्य श्री. वा. वि. जोशी दाखवीत आहेत.

आधुनिक स्त्रीच्या जीवनावरच सर्व सामाजिक विचार केंद्रीभूत झाल्या-सारखे दिसतात आणि वैवाहिक जीवन हा एकच प्रश्न आणि त्याहि प्रश्नाची शारीरसुख एवढी एकच बाजू सर्वत्र रंगून राहिलेली दिसते.

या आकुञ्चित दृष्टिकोनांचे दुष्परिणाम आजच्या पिढींतच, याच काल-खंडात दिसूं लागले. जीवनात असल्या वाङ्मयाला कांहींहि किंमत मिळत नाहीं हें दिसून आलें आणि नव्या लेखकानीं जीवनाच्या आजपर्यंत उपेक्षित राहिलेल्या बाजूकडे लक्ष पुरविण्यास आरंभ केला. आधुनिक स्त्रीवर लादलेल्या खोट्या आचारस्वातंत्र्याचा स्त्रीलेखिकाहि धिक्कार करूं लागल्या आहेत. नव्या व जुन्या पिढीच्या सीमारेषेवर असणारे श्री. य. गो. जोशी यानीं केवळ दोन-तीनच कादंबऱ्या आजपर्यंत लिहिल्या असल्या तरी त्या-

वरून तेहि उन्मादपथाचा उथळपणा, फोलपणा ओळखून काहीं तरी सस्मरणीय चारित्र्यास उपकारक असें लिहिण्याच्या निश्चयानें कादबरीक्षेत्रात उतरलेले दिसतात. प्रणयपथाचें भयकर विडंबन करण्यासाठींच त्यानीं लेखणी उचलली आहे. आजचे तरुण लेखक हे मागच्या पिढीच्या वाङ्मयाच्या मूल्य-मापनापासून पुष्कळ शिकले आहेत. तरुण पिढीस नवीं कार्यक्षेत्रे मिळतात, त्यातील अनुभवाची नोंद श्री. मर्ढेकर याच्या ‘ ताबडी माती ’ यासारख्या कादबऱ्यात होऊ लागल्यानें वाचकाच्याहि अनुभवाचें क्षेत्र व्यापक होत आहे. आपल्या व्यवसायाच्या निमित्तानें पाहिलेल्या जगाचें चित्रण लेखक करू लागले आहेत. उदा. प्रा. मा. का. देशपाडे याची ‘ मुक्तता ’ व प्रा. वनमाळी याची ‘ आदिमाया ’, श्रीधर देशपाडे याची ‘ सायतारा ’ ही नौका व्यवसायातील जीवनावर लिहिलेली कादंबरी ही एका नव्या दालनात भर आहे. राजकीय कोलाहलात सापडलेल्या व्यक्तींच्या जीवनावर त्याच्या राजकीय क्षेत्रातील अरेरावीशीं सबध नसूनहि त्या अरेरावीचा जुलूम होतो. अशा स्थितींत शान्तताप्रिय जीवनहि होरपळून निघतें आणि सदाचार, कर्तव्य याच्यावरचा विश्वास नाहींसा होऊन अगदीं प्राथमिक गरजा पुरविण्या-साठींसुद्धा व्यक्ति कशी बेदरकार होते ते ‘ रणागणात ’ दिसेल. युद्धाची ही सर्वव्यापकता हा जगातील नवा अनुभव आहे. आज प्रत्यक्ष रणागणात वावरणारे लोक परत येतील त्या वेळीं अशा अद्भुत अनुभवाचे रणागणा-वर रगलेले एक नवेंच दालन वाङ्मयात खुलें होईल अशीं चिन्हे आजच दिसू लागलीं आहेत. पहिल्या युद्धापासून दुसऱ्या महायुद्धापर्यंतच्या काल-खंडातील वाङ्मयाचें आपण आज समालोचन करतो. दुसऱ्या युद्धानतर पुन्हा २०–२५ वर्षांनीं असेच समालोचन होईल त्या वेळीं आज कादबरी-क्षेत्रात पदार्पण करणाऱ्या लेखकापैकीं काहीचा प्रामुख्यानें उल्लेख करावा लागेल. त्या भावी समालोचन-विषयाचा आरंभ करून ठेवावा म्हणून मी आजच्या पिढींतील काहीं लेखकाचा ओझरता उल्लेख करीत आहे.

मध्यमवर्गीयातील सुशिक्षित स्त्रियाप्रमाणें त्या मानानें खालच्या पातळी-वर असलेल्या स्त्रियाच्याहि जीवनाचे ‘ अपुरे डाव ’ श्री. कवठेकरानीं रंगविले आहेत. तर विवाहबाह्य प्रेमाकर्षणातून बचाव करण्याचा निकराचा प्रयत्न श्री. बोकील यांच्या ‘ झंझावात ’ या कादंबरींतून दिसतो. सहवासो-

त्तर प्रेमविवाहातहि अगदीं आधुनिक अशीं काहीं दुःखें आहेत त्याचें स्वरूप श्री. निरंतर यांच्या ' जीवननृत्या ' त दिसतें. सहवासोत्तर प्रेम व प्रेमोत्तर विवाह हे विवाहसुखास अनुकूल असे एक कारण आहे. एकमेव कारण नव्हे. आजच्या स्त्रीशिक्षणास समाजात विवाहानतर फारसा वाव नाहीं. बौद्धिक जीवन घालविण्याची स्त्रीला सधि मिळत नाहीं. त्यामुळें बुद्धिजीवि प्रियकराशीं सहवासोत्तर प्रेमविवाह झाल्यावरहि तिला एक विचित्र बेकारी अनुभवावी लागते. सुशिक्षित स्त्रियांच्या कर्तृत्वास कार्यक्षेत्र मिळल्याखेरीज केवळ प्रेमविवाहाने आधुनिक वैवाहिक जीवन सुखी होणार नाहीं असें ' जीवननृत्य ' या कादंबरींत दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. वैवाहिक जीवनात सुशिक्षित स्त्रीची होणारी त्या प्रकारची कुचंबणा मला इतरत्र रंगविलेली दिसली नाहीं असें नम्रपणे नमूद करावेसे वाटते. सत्प्रवृत्त अशाहि पुरुषाच्या वैवाहिक जीवनात मनाची चलबिचल घडवून आणणारे प्रसंग आपाततः येतात. आपल्या सामाजिक जीवनात आलेल्या अर्धवट आधुनिकतेचा तो परिणाम आहे. अशा परिस्थितींत स्वतःचे ' आकाश-मंदिर ' टिकवणें किती कठिण आहे हे श्री. तळवलकर यानीं ' आकाश-मंदिरात ' दाखविलें आहे. आजच्या पिढींतल्या कार्यकर्त्या तरुणाच्या ध्येय-निष्ठ जीवनात केवळ प्रणयप्रवीण, सेवाशील, पत्नीला फारसें महत्त्व राहिलें नाहीं. आधुनिक स्त्रीने आपलें कर्तृत्व सपादन करून सत्यार्थानें प्रत्यक्षपणें सहधर्मिणी सहचारिणी होण्याची तयारी केली पाहिजे, हे प्रा. आबेकर यानीं ' काळे ढग ' या कादंबरींत दाखविलें आहे. प्रेमविवाह प्रसिद्ध अशा आधुनिक काळातहि आधुनिक पुरुषाच्या वासनाचें अगदीं प्राथमिक (Primitive) स्वरूप पाहून एखाद्या सुशिक्षित यमूस राक्षसविवाहाच्या यातनाना तोंड देण्याचा प्रसग येतो. हे श्री. क्षीरसागर यानीं 'राक्षसविवाह' या कादंबरींत दाखविले आहे.

आधुनिक जीवनावर भर देणाऱ्या प्रथितयश कादंबरीकाराच्या नजरेंतून सुटलेलीं त्यानीं उपेक्षिलेलीं अशीं आधुनिक जीवनाचीं चित्रें नव्या कादंबऱ्यातून दिसतात. आजच्या प्रथितनाम व प्रथितयश कादंबऱ्यातील प्रणयोन्मादाचा भर आजच्या पिढींत बराच ओसरला आहे. याचें एक कारण असें असू शकेल कीं आम्ही प्रथितयशाच्या कृतींचें अत्यंत निर्भिडपणें केलेलें समीक्षण व

विवेचन पदोपदीं ऐकतों वाचतों. त्यानीं स्वतःच आपापल्या दोषांचें आणि प्रमादाचें अप्रत्यक्षपणे केलेलें आविष्करण आम्हास स्पष्ट दिसतें आणि मागच्याच्या ठेचानीं आम्हास शहाणपणाचा लाभ करून दिला आहे. आजचे नवोदित लेखक जास्त जागरूक आहेत. त्याची दृष्टि आजपर्यंतच्या कथावाङ्मयाच्या मर्यादेपलीकडे राहिलेल्या प्रातापर्यंत पोहोंचली आहे. ग्रामीण जीवन हा एक नवा समाजविभाग कथावाङ्मयांत दिसू लागला आहे हें श्री. दिघे याच्या 'पाणकळा' श्री. चिदरकर याची 'महापूर' इत्यादि कादबऱ्यावरून दिसेल. श्री. कवठेकरहि आपल्याला परिचित अशा ग्रामीण जीवनाचीं चित्रे तन्मयतेनें रगवितात. श्री. बोकील आधुनिक तरुण--तरुणींच्या जीवनातील खेळाडू वृत्तीचाच प्रामुख्यानें आविष्कार करतात. त्या जीवनातील प्रणयोन्मादाच्या अतिरंजित चित्रणानें विटलेल्या वाचकाना त्यानीं रुचिवैचित्र्यानें निदान हवापालट केल्याचें तरी सुख दिलें आहेच. नव्या ज्ञानाचा आणि जुन्या अनुभवाचा वारसा चालू पिढीला मिळत आहे हें त्याचें भाग्य आहे आणि त्या भाग्यामुळेंच त्याचें वाङ्मय मागील पिढीच्या वाङ्मयापेक्षा जास्त व्यापक, जास्त वास्तव, प्रगतिशील आणि पुरोगामी ठरण्याचीं चिन्हे दिसत आहेत.

मागील पिढींत गणलेले ना. ह. आपटे आधुनिक तरुणाच्या जीवनास 'सुखाचा मूलमत्र' देण्याचा आटोकाट प्रयत्न करीत आहेत. तर दा. न. शिखरे राजकीय कादंबरी-क्षेत्रात राजकीय प्रश्न सोडविण्याची उमेद बाळगून आहेत. नव्या दृष्टिकोनानें जग पाहण्याचा प्रयत्न श्री. पत्की याच्या 'आधळा न्याय', श्री. लोहोकरे याचा 'तिसरा प्रवाह' या कादंबऱ्यात दिसतो. परतु उत्तान प्रणयातच दग असलेले लेखक तरुण लेखकातहि आहेत. ती मागील पिढींतील कलावाद्याची उरलेली पुण्याई आहे !

मला मुख्यतः एवढेंच दाखवावयाचे आहे कीं, आजच्या तरुण पिढीनें आजच्या ज्येष्ठ वाङ्मयसेवकाच्या अनुभवाचा, त्याच्या वाङ्मयाच्या समीक्षणाचा, टीकेचा, अतिशय चागला उपयोग करावयास सुरुवात केली आहे. आज कादंबरीक्षेत्रात पदार्पण करणारे उद्या कदाचित् तेथें दिसणारहि नाहींत; परंतु पुढील कादंबरीवाङ्मय-विभागात ते विचारप्रवाह प्रभावी होणार आहेत त्याचीं प्रसादचिन्हें त्याच्या लेखनांत दिसत आहेत. म्हणून या काल-

खंडांत त्यांचा उल्लेख करणें जरूर आहे. कांहीं स्त्रीलेखिकांचा या विभागांत या सुमारास होणारा प्रवेश हें एक प्रमुख प्रसादचिन्ह आहे.

कादंबरीविभागांतील आणखी नवें दालन या कालखंडात दिसत आहे तें म्हणजे 'लोकसाहित्य प्रकाशन' या संस्थेनें सुरू केलेला अनुवादित वाङ्मय-विभाग. या कालखंडातील भाषांतरित वा रूपांतरित कादंबऱ्यांचा मी या लेखात परामर्ष घेऊं शकत नाहीं. परंतु कांहीं निश्चित तत्त्वज्ञानाचा प्रसार करण्यासाठीं योजनापूर्वक अनुवादाचा उपक्रम करण्याच्या दृष्टीनें मुंबईच्या 'लोकसाहित्य प्रकाशन' संस्थेचा उल्लेख केला पाहिजे. या खंडातील ऐतिहासिक वा पौराणिक कादंबऱ्यांचाहि मला परामर्ष घेता आला नाहीं. एक तर नाथमाधव यांच्या नंतर ऐतिहासिक कादंबरीविभाग हा या कालखंडात उपेक्षिला गेला आहे. वस्तुतः हिंदुस्थानच्या आणि विशेषतः महाराष्ट्राच्या इतिहासात संशोधकांनीं अव्याहत परिश्रमानें जी भर घातली आहे तिकडे कादंबरीकारांनीं अद्याप लक्ष दिलेलें दिसत नाहीं. श्री. हडप आपल्या कादंबऱ्यांत आकर्षकता संभाळून या संशोधनाचा थोडाफार उपयोग करतात. परंतु आहेत त्या ऐतिहासिक कादंबऱ्यांचें मूल्यमापन करताना प्रत्यक्ष इतिहासाशीं त्यांची तुलना केली पाहिजे. ऐतिहासिक सत्याच्या कसोटीनें त्यांची परीक्षा केली पाहिजे. इतिहासशास्त्राच्या आजच्या तत्त्वावरून त्यांनीं इतिहासाच्या आधारें काढलेलीं अनुमाने आणि उद्दीपित केलेल्या भावना पाहिल्या पाहिजेत. विस्तारास जागा नसल्यानें त्या विभागाचा समावेश या लेखात केला नाहीं. तसेच 'रात्रीचा दिवस' यासारख्या कादंबऱ्यांनीं लेखनतंत्राच्या दृष्टीनें कादंबरीवाङ्मयात जी विशेष भर पडली आहे तीहि पहाणें जरूर आहे. पण तेंहि आता करण्यास जागा उरलेली नाहीं. वगळलेल्या या भागामुळें या समालोचनास अपुरेपणा आला आहे, याची मला स्वतःला स्पष्ट जाणीव आहे. परंतु या लेखावरील मर्यादा लक्षात घेऊन वाचकांनीं हें धांवतें समालोचन वाचावें अशी माझी नम्र विनति आहे. ज्येष्ठ–वरिष्ठांच्या महोत्सवात तरुण नवोदित लेखकाची कोणी वास्तपुस्त करीत नाहीं ही परिस्थिति मला माहीत आहे. या लेखातहि माझ्या अनेक ज्ञात व अज्ञात तरुण कादंबरीकारांचा नुसता नामनिर्देशहि करता आला नाहीं. परंतु त्याबद्दल त्यांनीं माझ्यावर हेतुपुरस्सर अधिक्षेपाचा किंवा अनु-

क्लेशाचा आरोप करू नये. आपण या द्वितीय महायुद्धानंतरच्या काळापर्यंत थांबू या. आपल्याबरोबर प्रगल्भ झालेल्या वाङ्मयकृतींचें समालोचन त्या काळातील एखाद्या समालोचकाकडून होणार आहे. त्या भावी समालोचका-समोर उभे राहताना आपण जास्त निश्चयानें आणि आत्मविश्वासानें उभे राहू आणि मराठी भाषेच्या आणि वाङ्मयाच्या आपण केलेल्या सेवेचा आत्मविश्वासानें आणि अभिमानानें त्या समालोचकास अहवाल सादर करूं. माझी अशी खात्री आहे कीं, तें समालोचन या समालोचनापेक्षा जास्त आनंददायी आणि अभिमानास्पद होईल.

• • •

: ३ :

# मराठी लघुकथा :

म. ना. अदवंत

आज मराठी लघुकथेचा जन्म झाल्याला जवळ जवळ साठ वर्षे पुरीं होत आलीं आहेत. कै. कृष्णशास्त्री चिपळूणकरानीं आपल्या ' अरबी भाषेतील सुरस व चमत्कारिक गोष्टी ' या पुस्तकाच्या भाषातरानें किंवा त्याहि पूर्वी कै. सदाशिव काशीनाथ छत्रे यानीं आपल्या ' बाळमित्रा ' ने जरी लघुकथेची पार्श्वभूमि तयार केली असली, तरी आजच्या लघुकथेचा खरा जन्म १८८९ सालीं ' करमणुकी ' च्या जन्माबरोबर झाला आणि तेव्हांपासून आतापर्यंत विविध लेखकानीं हे नवें दालन सजवून ते जास्त आकर्षक व विभूषित करण्याचा प्रयत्न केला आहे. कै. हरि नारायण आपटे याच्या वेळच्या उपदेशप्रधान व निबधवजा गोष्टींपासून आजच्या फडकेखाडेकर-काणेकर प्रभृति लेखकाच्या तत्रबद्ध, कलात्मक व प्रसादपूर्ण लघुकथापर्यंतच्या काळात लघुकथा किती तरी निरनिराळ्या स्थित्यतरातून गेली आहे, व तिच्या स्वरूपात, तिच्या तत्रात व तिच्या विषयात किती तरी बदल झालेला आपणाला दिसत आहे. या बदलाची नीट कल्पना येण्यासाठीं लघुकथावाङ्मयात काहीं विशिष्ट कालखड कल्पिले पाहिजेत व त्या प्रत्येक कालखंडातून लघुकथाचा विकास कसा झाला हें पाहिलें पाहिजे. लघुकथेच्या या पंचावन्न वर्षांच्या जीवनात तीन कालखंड स्पष्टपणें पडलेले दिसतात. या कालखंडाना त्या त्या कालखडातील प्रभावी लघुकथालेखकाचें नाव देण्याची प्रथा आहे किंवा त्या त्या कालखडात लघुकथेच्या विकासाला कारणीभूत झालेल्या प्रमुख मासिकाचें नाव कधीं कधीं या कालखंडाना देण्यात येतें.

सुदैवानें कोणतीहि पद्धत स्वीकारली तरी या कालखंडामध्यें फारसा बदल होत नाहीं. पहिल्या पद्धतीने ' हरि नारायण आपटे खंड ', ' गुर्जर-गोखले खंड ' व ' फडके-खाडेकर खंड ' अशीं तीन नावें या खंडाना देतां येतील. दुसऱ्या पद्धतीनें 'करमणूक', 'मनोरजन' व 'यशवंत-किर्लोस्कर' असे खंडाचे तीन विभाग पडतील.

त्यापैकीं आपल्या कालमर्यादेमध्यें पहिला कालखंड जरी येत नसला तरी एकंदर लघुकथेच्या विकासाची कल्पना येण्यासाठीं थोडक्यात त्या कालखंडाचा विचार करणें जरूर आहे. चिपळूणकर पूर्वकालामध्यें इंग्रजी वाङ्मयाचा अभ्यास जरी सुरू झाला असला तरी ' लघुकथा ' हा प्रकार अद्याप वाङ्मयात शिरला नव्हता. मराठी कादबरीचा पाया या काळात हळबे, रिसबुड इत्यादि लेखकानीं ' मुक्तामाला ', ' मंजुघोषा ' इत्यादि अद्‌भुतरम्य स्वतंत्र कादबऱ्या लिहून घातला. पण लघुकथेचें दालन या काळात अगदींच रिकामें होतें. छत्र्याच्या ' बाळमित्रा ' नें, कृष्णशास्त्री चिपळूणकराच्या ' अरबी भाषेतील सुरस व चमत्कारिक गोष्टी ' नें किंवा मोरोबा कान्होबाच्या ' घाशीराम कोतवाल ' नें त्यामध्येंहि काय भर घातली असेल तेवढीच. पण या पुस्तकातील गोष्टींचें एकंदर स्वरूप पाहिलें तर ती भर अगदीं दुर्लक्ष करण्याजोगी होती असें आपणाला खास म्हणता येईल.

तेव्हा प्रत्यक्ष लघुकथेचा जन्म 'करमणुकी'च्या युगातूनच झाला व हरि नारायण आपट्याकडेच तिच्या जनकत्वाचा मान जातो हें आपणाला निःसंशय म्हणता येईल. अर्थात् कै. हरिभाऊ आपटे, कै. सहकारी कृष्ण या त्या वेळच्या लेखकाच्या कथांना 'लघुकथा' ही संज्ञा यथार्थतेनें कितपत देता येईल ही जरी शका असली तरी वास्तववादी समाजचित्रे आपल्या गोष्टींतून आणण्यास सुरुवात त्यानींच केली असें म्हणण्यास काहींच हरकत नाहीं. कै. हरिभाऊ आपट्याच्या लघुकथा म्हणजे लहान कादंबऱ्याच ! वर्णन व पाल्हाळ यामुळें कित्येक वेळा भावनाचा ओघ व परिणामकारकता अडलेली असे; परंतु घरगुती भाषा व वास्तविक स्वभाव—रेखन यामुळें याच्या कथा अतिशय परिणामकारक वठलेल्या आहेत. त्याच्या कित्येक कथातून समाजातील घातुक चालीरीतींवर कोरडे ओढले आहेत व त्यातील चित्रें रंगवताना तीं त्यांनीं अत्यंत जिव्हाळ्यानें रंगविल्यामुळें त्या कथांत एक प्रकारची

आकर्षकना निर्माण झाली आहे 'पुरी हौस फिटली', 'डिस्पेप्सिया', 'पहिलें भाडण', 'पक्की अद्दल घडली' इत्यादि त्याच्या काही गोष्टी रंजकतेच्या व परिणामकारकतेच्या दृष्टीनें अत्यंत सुंदर वठलेल्या आहेत तर 'थोड्या चुकीचा घोर परिणाम', 'अपकाराची फेड उपकारानींच' इत्यादि त्याच्या काहीं गोष्टी म्हणजे छोट्या कादंबऱ्याच आहेत. अर्थात् याचें कारण म्हणजे लघुकथेचें स्वरूप त्या वेळीं निश्चित झालें नव्हतें. किंबहुना 'लघुकथा' हे नावहि त्या वेळीं प्रचारात आलें नव्हतें. हरिभाऊंनीं आपल्या कथाना 'स्फुट गोष्टी' हें नाव दिलें आहे. यावरून त्याचें स्वरूप उपदेशप्रधान गोष्टीपेक्षा निराळें नव्हतें व लघुकथेच्या लघुत्वाची व एकसूत्रीपणाची कल्पना त्या वेळीं नव्हती हे उघड आहे.

कै. सहकारी कृष्ण याचाहि दृष्टिकोन हरिभाऊंप्रमाणें समाजसुधारणेचा व उपदेशप्रधान आहे. अतिशय पाल्हाळामुळें त्याच्या गोष्टी काहींशा निबंधवजा वाटतात. 'कजाग सासू', 'हुंड्याची चाल' या त्यांच्या गोष्टींच्या नावावरूनच त्याचा दृष्टिकोन स्पष्ट होतो. त्याच्या गोष्टी मध्यम व गरीब वर्गाविषयींच असत, पण समाजाच्या घातुक चालीरीतींविषयीं लिहिताना पाल्हाळिक संवाद व पाल्हाळिक वर्णनें यामुळें त्यांच्या कथा निर्जीव वाटतात.

अशा रीतीनें 'करमणुकी' नें बीजारोपण केलेल्या या लघुकथेच्या रोपाची वाढ करण्याचें काम 'मनोरंजन' मासिकानें पत्करलें. 'मनोरंजन' वास्तविक निघालें १८९५ सालीं, म्हणजे 'करमणुकी' च्या युगातच. पण लघुकथेच्या विकासाचें खरें कार्य या मासिकाच्या हातून १९१० सालानंतरच भरीव स्वरूपात झालें असें निःसंशय म्हणता येईल. 'मनोरंजना' च्या काळांत दोन गोष्टी मुख्यतः दिसून येतात. स्त्रीविषयक दृष्टिकोन बदलून स्त्रीशिक्षण—स्त्रियाची उन्नति यासारख्या प्रश्नाकडे पाहाण्याची दृष्टि जास्त उदारमतवादी झाली. 'यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः' हेंच मुळीं 'मनोरंजन' चें ध्येयवाक्य होतें. त्यामुळें सुशिक्षित स्त्री-पुरुषाचीं चित्रें या काळात विशेष येऊं लागलीं. पूर्वीच्या 'लक्ष्मीबाई', 'गंगाबाई' जाऊन त्याच्या जागीं थोडेफार इंग्रजी शिकलेल्या 'कालिंदी', 'सुधा' वगैरेसारख्या तरुणी येऊं लागल्या. दुसरी गोष्ट म्हणजे महाराष्ट्रीय लेखकांचें लक्ष परप्रान्तीय वाङ्मयाकडे--विशेषतः बंग वाङ्मयाकडे--वळलें. त्यामुळें मुकर्जी

प्रेमचंद बानर्जी, टागोर इत्यादि लेखकाच्या ललितकृति मराठी पेहेराव चढवून पुढें येऊं लागल्या. अशा रीतीचीं भाषान्तरें करून मराठी वाङ्मय समृद्ध करणाऱ्या लेखकांत वि. सि. गुर्जर याना मोठें श्रेष्ठ स्थान द्यावें लागेल. 'पतिपत्नी', 'पौर्णिमेचा चद्र' इत्यादि अनेक वग कादंबऱ्याचीं सुंदर भाषान्तरें करून त्यानीं कादबरीवाङ्मयात भर घातलीच, पण अनेक भाषान्तरित व स्वतंत्र कथा लिहून त्यानीं लघुकथेच्या स्वरूपालाहि थोडे निराळें वळण दिलें आहे. आज जवळजवळ दोन तपें ते अव्याहत लेखन करीत आहेत व 'मनोरजन', 'यशवंत' इत्यादि निरनिराळ्या मासिकातून त्यानीं लिहिलेल्या लघुकथाची संख्या तीनशेंच्या वर भरेल असे म्हणतात. गुर्जराच्या पूर्वींच्या काहीं लघुकथा कदाचित् हरिभाऊंच्या युगात पडतील पण 'मनोरंजन'मध्यें प्रसिद्ध झालेल्या निरनिराळ्या लघुकथातून दिसून येणारी प्रसन्न भाषा सुशिक्षित स्त्रीपुरुषाचें स्वाभाविक चित्रण, सुंदर संवाद व नर्म विनोद पाहिला म्हणजे 'करमणूक' कालीन केवळ नीतिबोधातुन मराठी लघुकथा हळूहळू कला-विलासाकडे कशी झुकत होती याची आपणाला सहज कल्पना येते. त्यानीं रूपान्तरित केलेल्या गोष्टींत मूळ गोष्टीपेक्षा बरेच फेरफार केले आहेत— आणि ती गोष्ट रूपान्तर असेल अशी कल्पनाहि वाचकाला न येऊं देण्याचें चातुर्य त्याच्या फेरफारात आहे. त्याच्या 'जगदंबा', 'देशद्रोही', योग-दर्शन', 'शेवटचें हास्य' इत्यादि किती तरी गोष्टी त्याच्या यशस्वी रूपान्तरशक्तीची साक्ष देऊ शकतील. त्याच्या लघुकथा बहुधा घटनाप्रमुख अशाच आहेत आणि त्यामुळे स्वभावरेखनाला त्यात फारसा वाव मिळत नाहीं हें खरे असलें तरी कथानकाची रचना करण्याची व गोष्टीचा शेवट अनपेक्षित कलाटणी देऊन करावयाची त्याची पद्धत कौशल्यपूर्ण आहे यात शंका नाहीं. अशा अनपेक्षित कलाटणीसाठीं ओ. हेन्रीच्या गोष्टी प्रसिद्ध आहेत. या दृष्टीने गुर्जरांच्या 'योगदर्शन', 'पुरुषाची जात', 'नायकाची जात', 'शेवटचें हास्य' वगैरे गोष्टी उल्लेखनीय आहेत. अद्यापहि त्याचें लेखन अव्याहतपणें चालू आहे; पण त्याच्या लघुकथाचा साचा आता ठरीव तऱ्हेचा झाला आहे.

कै. कृ. के. गोखले हेहि या 'मनोरंजन' युगांतील प्रमुख लेखक होते. इंग्रजी कथाचें बेमालूम रूपान्तर करण्याचें त्याचें कौशल्य विशेष वाखाणण्या-

सारखें असे. 'स्तूप केलीत सूनबाई' या त्यांच्या कथासंग्रहांतील कथांत रंजकता व सुबोधता विशेष दिसून येत असली तरी आटोपशीरपणाचा व एकसूत्रीपणाचा अभाव त्यांच्या गोष्टींमध्यें थोड्याफार प्रमाणात दिसून आल्याखेरीज रहात नाहीं. 'बालक' व 'दो दिवसाची बायको' या त्यांच्या हास्यरसपूर्ण कथात व 'मैनाबाईचा राघू', 'मंतरलेलें पाणी' इत्यादि काहीं कथातून त्याचें लेखनकौशल्य विशेष प्रकट झालें आहे.

या 'मनोरंजन' युगामध्यें लघुकथेंतील उपदेशप्रधानता हळूहळू नाहींशी होत होती—पण लघुकथा घटनाप्रधान असल्यानें कथानकाच्या मनोरंजकते-कडे विशेष लक्ष दिलें जाई व लघुकथेचा शेवट सुखान्त करण्याकडे लेखकाची विशेष प्रवृत्ति होत असे. गुंतागुतीचीं व मनोरंजक कथानकें, प्रसंग व पात्रें याचा विस्तार व अद्‌भुतता व कल्पनारम्यता यांचें घेतलेलें भरपूर साहाय्य हें या युगातील मोठें भांडवल होतें. गुर्जर—गोखल्यानीं घालून दिलेली ही प्रथा पुढें चालविणारे पुष्कळच लेखक या कालात निघाले. त्यात ना. ह. आपटे, सरस्वतीकुमार, वा. ना. देशपांडे, प्र. श्री. कोल्हटकर, गो. रा. माटे, इत्यादि लेखकाचीं नावें प्रामुख्यानें घेता येतील.

ना. ह. आपटे यांचें बरेंचसें लिखाण बोधवादी आहे. त्यामुळें त्या बोध-वादाची दाट छटा त्याच्या लघुकथावर उमटली असल्यास नवल नाहीं. 'बनारसी बोरें', 'आरामविराम' हे त्याचे जुने किंवा 'हसा किंवा रुसा,' 'कोंडा—कणी' हे अलीकडील कथासंग्रह सहज चाळले तरी या विधानाची साक्ष पटेल. 'सत्याचा विजय व खोट्याचें पारिपत्य' करण्याची हरिभाऊ-कालीन प्रथा त्याच्याहि 'मंगळागौरीचीं फुलें', 'देवदूत व यमदूत', 'ब्रीदवाक्यें' इत्यादि कथातून दिसून येते. उपदेशप्रधानता व पाल्हाळ यामुळें कलाहीन झालेल्या 'सशयाचें कोलीत', 'दोषपरिमार्जन', 'म्हातारा आला अन् गेला', 'वैदिक' वगैरेसारख्या अनेक लघुकथा जरी त्यानीं लिहिल्या असल्या तरी त्याच्या पुष्कळ लघुकथामध्यें रंजकता आहे. व 'नाव नसलेली गोष्ट', 'सुमति', 'तान्हेला कैदी', 'कल्पनेची भरारी' इत्यादि काहीं कथेंत कलात्मकता पण आहे हें आपण कबूल केलें पाहिजे. 'नुकसानभरपाई',

'पराक्रमाची ती रात्र', 'खंकदेवाचीं पत्रें', 'जावई व घरजांवई' इत्यादि विनोदी कथा त्याच्या विनोदबुद्धीचीहि चांगली साक्ष देतात.

सरस्वतीकुमार हे लेखक मात्र कांहींसे जुन्या जमान्यांत मोडतात. लघुकथेतील कलेची त्याना फारशी जाणीव झाली नाहीं. रहस्यावर आधारलेलीं कथानकें व तत्कालीन सामाजिक अन्यायावर उठवलेली झोड यावरच त्यांच्या बऱ्याचशा गोष्टी आधारलेल्या आहेत. त्यांच्या लघुकथेची लांबी दीर्घ असली तरी 'रंजकता' हा गुण मात्र त्याच्या कथातून बऱ्याच मोठ्या प्रमाणांत सापडतो. 'सिंहस्थ', 'प्रेमवंचन', 'रक्ताची खूण' या गोष्टी या दृष्टीनें वाचनीय आहेत. सयमाच्या अभावीं जरी त्यांच्या लघुकथा लांब झाल्या असल्या तरी त्यांचें रचनाकौशल्य व स्वभावदर्शन पुष्कळच प्रभावी आहे. क्वचित् 'ब्रह्मविद्येचा अभ्यास' यासारख्या गोष्टींत त्यानीं उपहासाचें शस्त्रहि वापरलें आहे. वा. ना. देशपांड्याच्या 'सुखस्वप्नें' व 'दीपावलि' या दोन्ही कथासग्रहांतील लघुकथा त्या मानानें फिक्या पडतात. रचनाकौशल्याच्या अभाव व अवास्तवता आणि अतिशयोक्ति यामुळें त्याच्या कथा परिणामकारक होऊं शकल्या नाहींत. 'तपश्चर्या', 'बायकाची जात' या त्याच्या कथेंत थोड्या-फार प्रमाणांत अतिरंजित चित्रें रेखाटलीं आहेत असा भास होतो. कित्येक वेळीं व्याख्यानाची आवड—व रोगट ध्येयनिष्ठा यामुळें उत्कृष्ट समरप्रसंगहि वाया गेले आहेत. प्र. श्री. कोल्हटकर याच्या कथातून मात्र जिव्हाळा, रचनाकौशल्य व रंजकता चागली दिसून येते. 'मानसपूजा व इतर गोष्टी' या त्याच्या सग्रहातील 'मानसपूजा' ही गोष्ट बरीच लांबलेली वाटली तरी त्यात उत्कटता व करुणरस असल्यानें परिणामकारक झाली आहे. 'निष्प्रेम जीवन', 'कैद्याचीं मुलें' 'गरिबाची दुनिया' या त्याच्या गोष्टींतहि प्रचलित स्थितीविषयीं असंतोषाचा सूर वाहात आहे. तरी पण परिणामकारक लघुकथा म्हणून त्याच्याकडे बोट दाखविता येईल. गो. रा. माटे याच्या मध्यंतरी 'मनोरंजना' मध्यें प्रसिद्ध झालेल्या कथा रंजकतेच्या दृष्टीनें विशेष चांगल्या होत्या. 'शिकलेला × × ×' या गोष्टींत त्याची विनोदबुद्धि व रचनाचातुर्य फार चागलें दिसून येतें.

याशिवाय प्रेमचंदाच्या कथांचा अनुवाद करणारे ह. वा. अत्रे व 'समाधि व इतर सहा गोष्टी'नें शोकप्रधान गोष्टींची मराठींत भर घालणारे दिवाकर कृष्ण याचाहि या 'मनोरंजन' युगात अवश्य उल्लेख केला पाहिजे. दिवाकर कृष्णाच्या लघुकथाची योग्यता स्वभावरेखनाच्या दृष्टीनें मोठी आहे. भावनाचा हळुवारपणा, प्रसगजुळणीचे कौशल्य व भेदक दृष्टि यामुळें त्यांच्या कथा फार परिणामकारक झाल्या आहेत. 'संकष्टी चतुर्थी', 'देवाच्या घरीं' किंवा 'मृणालिनीचें लावण्य' यातील सारे प्रसंग अतिशय हृदयस्पर्शी आहेत. एक प्रकारची नैराश्याची छाया या लेखकाच्या साऱ्या लिखाणावर पडल्या-सारखी वाटते.

या काळात स्त्रीलेखिकाहि लघुकथेचें दालन समृद्ध करण्यासाठीं पुढे सरसावल्या. त्यामध्यें काशीबाई कानिटकर, गिरिजाबाई केळकर व आनंदी-बाई शिर्के यांचीं नावें प्रमुखत्वानें घेता येतील. काशीबाई कानिटकरांच्या 'शिळोप्याच्या गोष्टी' तील किंवा 'गच्चीवरील गप्पा' तील घरगुती भाषाशैली वाखाणण्याजोगी आहे. त्यांच्या लेखनावर हरिभाऊंच्या लेखनाचा परिणाम झाल्याचें स्पष्ट दिसून येतें. मात्र त्यात रचनाकौशल्य फारसें दिसून येत नाहीं. सौ. गिरिजाबाई केळकर यांच्या 'समाजचित्रें' व 'केवळ विश्रांतीसाठीं' या दोन कथासंग्रहात ठराविक साच्याचीं पात्रें—कलाशून्य तत्त्वबोध व रचनाकौशल्याचा अभाव दिसून येतो. त्यामुळें अपवादात्मक एक-दोन सोडून त्यांच्या कथा अगदीं नीरस झाल्या आहेत. सौ. आनंदी-बाई शिर्क्यांच्या कथातून मात्र रहस्यप्रधान कथानकांचें प्राबल्य दिसून येतें.

लघुकथा हळूहळू लोकप्रिय होऊं लागल्यामुळेंच कीं काय, साहित्याच्या इतर प्रातात संचार करणाऱ्या नामवंत साहित्यिकांनीं या दालनात थोडा-फार संचार करावयास सुरुवात केली. न. चिं. केळकर, शि. म. परांजपे, श्री. कृ. कोल्हटकर, वा. म. जोशी यांच्यापैकीं 'कथालेखन' हें मुख्य अंग कुणाचेंच नव्हतें. तरी पण प्रत्येकानें थोडीफार भर या दालनात घातली आहे. न. चिं. केळकर जुन्या पद्धतीनें लिहिणारे आहेत. त्यामुळें पाल्हा-ळाचा दोष त्यांच्या कथात बराच दिसून येतो. तरी पण स्वाभाविक संवाद, यशस्वी स्वभावरेखन व वास्तविक प्रसंग यांमुळें त्यांच्या कथा उल्लेखनीय झाल्या आहेत. 'माझी आगगाडी कशी चुकली', 'कपड्याची अदला-

बदल' यातील प्रसंगनिष्ठ विनोद, 'अलीगड किल्ल्यांतील रहस्य' यांतील वातावरणनिर्मिति, 'शृगालसंमेलना' सारख्या कथेतून दिसून येणारा कल्पनाविलास त्यांच्या लेखनकौशल्याची चांगली साक्ष पटवितात. कै. शि. म. परांजपे यांनीं कथावाङ्मय हें राजकीय मतप्रणालीचें साधन म्हणून वापरलें होतें. त्यामुळें त्यांच्या कथात उपहास--उपरोध हा फार मोठ्या प्रमाणात आपडतो. कल्पनाशक्ति व भाषावैभव या योगानें निसर्गातील अनेक दृश्यात त्यांना त्यांचीं राजकीय स्वप्नें दिसू लागत. 'आम्रवृक्ष', 'एका यात्रेकरूचा प्रवास', 'एक कारखाना' इत्यादि गोष्टी याची साक्ष देतील. त्याहीपेक्षां त्याच्या कल्पनेचें वैभव त्यांनीं 'पुराणांतरीं सापडलेली एक जुनी गोष्ट', 'मदनदहन', 'नवी सृष्टि', 'कर्म' इत्यादि गोष्टींत मुक्तहस्तानें उधळलें आहे. कै. श्री. कृ. कोल्हटकरांचें लक्ष उपरोधपूर्ण विनोदी वाङ्मय व नाटकें याच्याकडे अधिक होतें. त्यांच्या साहित्यव्यक्तिशींतील 'पाडुतात्या', 'बंडूनाना' व 'मी' ही त्रयी आज सर्वांना परिचित आहे. त्यांनीं चार--पांचच गोष्टी लिहिल्या. त्यापैकीं 'संपादिका' व 'गाणारें यंत्र' या दोनच विशेष उल्लेखनीय आहेत. कै. वा. म. जोशी याच्याहि कथालेखनांत मयम नाहीं. त्यामुळें त्याच्या लघुकथा बऱ्याचशा जुन्या वळणावर गेल्या आहेत.

साधारणपणें १९२५--२६ पर्यंत लघुकथा 'कथानकप्रधान' होत्या हें यावरून सहज दिसून येईल. कथाच्या स्वरूपात मात्र बदल होत होता. लघुकथेतील संवाद स्वाभाविक व सहज होत होते. कथेतील पाल्हाळ कमी होऊन त्याला अधिकाधिक रेखीव स्वरूप मिळत होतें. त्याचप्रमाणें कथानकातील घटनेबरोबर मनाचीं आन्दोलनें रेखाटण्याचा प्रयत्न चालू होता. त्याचप्रमाणें कथानकाचें क्षेत्रहि अधिकाधिक विस्तृत होत होतें. समाजात होणाऱ्या सुधारणेचीं चित्रें लघुकथात थोडीफार प्रतिबिंबित होत होतीं. आणि याच काळात हळूहळू नवोदित लेखकाचें लेखनहि वाचकासमोर येत होतें. श्री. वि. स. खांडेकर, प्रा. ना. सी. फडके, प्रा. चिं. वि. जोशी, श्री. भा. वि. वरेरकर इत्यादि लेखकांच्या निरनिराळ्या कथा प्रसिद्ध होत होत्या. त्याचप्रमाणें पाश्चिमात्य वाङ्मयांतील सुप्रसिद्ध लघुकथालेखकांच्या कथा मराठी पेहेराव चढवून आपल्या वाङ्मयांत हळूहळू प्रवेश करीत होत्या.

साधारणपणें पंचवीसनंतर नवीन युगाला सुरुवात झाली असें म्हटलें तरी त्याचीं पूर्वचिन्हें वरील लेखकांच्या लघुकथेंत निःसंशय प्रतीत होत होतीं.

यापुढील एकोणीस वर्षें म्हणजे लघुकथेच्या आत्यंतिक उत्कर्षाचा काळ होय. या काळामध्यें उत्कृष्ट लघुकथा-लेखकाची प्रभावळच्या प्रभावळ एकदम आपल्या नजरेसमोर येते. लघुकथेच्या स्वरूपातील पूर्वीचा विस्कळितपणा व पाल्हाळिकपणा जाऊन तिला जास्त रेखीव स्वरूप येत चाललें. लघुकथेंत घटनेप्रमाणें स्वभावरेखनाला महत्त्व देण्यांत येऊं लागलें. व या काळात सर्वस्वीं लघुकथेला वाहिलेल्या 'यशवंत' मासिकानें सुरुवातीस व 'किर्लोस्कर' मासिकानें नंतरच्या दशकात लघुकथाप्रान्तांत अत्यन्त स्पृहणीय कामगिरी केली आणि त्या दृष्टीनें हें युग 'यशवन्त-किर्लोस्कर' युगच मानलें पाहिजे. 'यशवत' बरोबरच 'रत्नाकर', प्रतिभा', 'संजीवनी', 'ज्योत्स्ना', 'समीक्षक', 'वसत' इत्यादि विविध मासिकांनीं लघुकथेचें दालन चागलेंच समृद्ध केलें. लघुकथेच्या वाढीबरोबर त्याच्या तंत्राचा व स्वरूपाचाहि विचार होऊं लागला. वि. स. खाडेकर यानीं 'यशवता'त, प्रा. ना. सी. फडके यानीं 'प्रतिभा साधना'त व इतर बऱ्याच साहित्यिकानीं अन्यत्र ठिकाणीं लघुकथेचें तंत्र, विकास, समालोचन, नव्या प्रवृत्ति इत्यादिकाचा विचार करण्यास सुरुवात केली. त्याचप्रमाणें लघुकथेच्या तंत्राची चर्चा करणारी श्री. गलगली याचें 'लघुकथा कशा लिहाव्या?' व श्री. देशपाडे याचें 'लघुकथा' हीं दोन पुस्तकें प्रसिद्ध झालीं. तीस ते चाळीस हें दशक तर यथार्थतेनें 'लघुकथेचें दशक' असें आपणाला नक्की म्हणता येईल. अर्थात् या दशकातील सगळ्याच लघुकथा-लेखकाचा परामर्ष यथार्थतेनें या लेखात घेणें अशक्य आहे पण प्रमुख लेखकानीं या दालनात घातलेली भर विचारात घेणें मात्र आवश्यक आहे.

या काळात दोन प्रमुख लघुकथालेखकाचीं नावें एकदम डोळ्यासमोर येतील. एक म्हणजे प्रा. ना. सी. फडके व दुसरें वि. स. खाडेकर. या दोघा लेखकानीं लघुकथेला वैशिष्ट्यपूर्ण बनवून तिला नावारूपाला आणण्याचे चागलेच प्रयत्न केले आहेत. प्रा. फडके यानीं लघुकथेला कलात्मक स्वरूप देऊन तिच्यामध्यें जास्त तंत्रबद्धता व आकर्षकता आणली. त्याच्या 'फडके यांच्या गोष्टी भाग १ ला' पासून नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या

'माझा देश' या कथासंग्रहापर्यंत त्यांचे कथासंग्रह जरी चाळून पाहिले तरी त्यांत विषयाच्या दृष्टीनें तंत्राच्या दृष्टीनें व विचाराच्या दृष्टीनें किती तरी विविधता दिसून येईल. लघुकथेच्या तंत्राचा अभ्यास त्यांच्या किती तरी गोष्टींत दिसून येतो. त्या दृष्टीनें 'उलटें शाकुंतल', 'दुहेरी गुण', 'शोभेसाठीं', 'लघुकथेची अखेरी', 'पुरुषस्य भाग्यम्', 'माल्याची शिकार' इत्यादि कांहीं कथा अभ्यासनीय आहेत. कथानकप्रधान कथाच त्यांच्या संग्रहांत फार सापडतात व अशा लघुकथांचा विकास करतांना 'सुरवात', 'समरप्रसंग' व 'अखेरी' अत्यंत कौशल्यपूर्ण करण्याची ते दक्षता घेतात. आकर्षक सुरुवातीचीं उदाहरणें म्हणून त्यांच्या 'शांता', 'उपकार कीं उपद्व्याप', 'दुहेरी गुण', 'माणूस जगतो कशासाठीं?', 'शोभेसाठी' या गोष्टींकडे बोट दाखविता येईल. लघुकथेची परिणामकारक अखेरी तर त्यांनीं किती तरी लघुकथांतून साधली आहे. पण या तंत्राकडे लक्ष देत असताना स्वभावरेखनाच्या मार्मिक छटाहि त्यांच्या कथांतून वारंवार आढळतात, 'शाता', 'वत्सला', 'लीला', 'पंतांची पदवी', 'चंद्रा', 'माझा देश' इत्यादि कांहीं कथा स्वभाव-रेखनाचे उत्कृष्ट नमुने म्हणून दाखविता येतील. त्याचबरोबर अद्भुतरम्यता व अतिशयोक्ति यांच्यावर आधारलेल्या 'पुरुषस्य भाग्यम्', 'माल्याची शिकार', 'उपमा प्रेम', 'झक् मारतात एम्. ए. पीएच्. डी.' वगैरेसारख्या कांहीं कथा त्यांच्या विनोदबुद्धीची साक्ष पटवितात. त्याच्या उलट 'भाग्य-चिन्ह', 'जागृतीचें स्वप्न', 'मनुष्य जगतो कशासाठीं?', 'गोषा' इत्यादि कांहीं कथा वाचकाना विचार करावयास लावतात. मात्र त्यांच्या कादंबऱ्यांप्रमाणें त्यांच्या लघुकथेंतील वातावरणहि बहुतांशीं श्रीमंत व सुशि-क्षित व्यक्तीपुरतेंच मर्यादित आहे. 'कलेकरिता कला' हे त्यांचें ध्येयवाक्य असल्यानें अलीकडील 'भाग्यचिन्ह', 'माझा देश' वगैरेसारख्या कांहीं कथा सोडल्या तर त्यांच्या कथांत मतप्रचारापेक्षा कलाविलासच अधिक दिसून येतो. विशेषतः 'सुरंगी', 'पत्रिका', 'शोभेसाठीं', 'सुनीति', 'लघुकथेची अखेरी', 'झक् मारतात एम्. ए. पीएच्. डी.' वगैरे-सारख्या प्रेमकथा लिहिताना त्यांच्या कलाविलासाचा खरा उत्कर्ष दिसून येतो. सूक्ष्म निरीक्षण, ओघवती व प्रसादपूर्ण भाषा व मध्यवर्ति पात्र किंवा प्रसंग

यांच्यावर नजर ठेवून केलेली बांधेसूद रचना यामुळें त्यांच्या लघुकथानीं मराठी वाचकवर्गावर मोहिनी घातली आहे असें म्हटलें तर फारसें चुकणार नाहीं.

श्री. वि. स. खांडेकर यांना तर लघुकथासृष्टीचे 'अनभिषिक्त राजे' असेच मानण्यात येतें. त्यांचे आज एकवीस लघुकथासंग्रह मराठी वाचकांसमोर आहेत. त्यांच्या लघुकथामध्ये दोन उघड उघड भाग पडलेले दिसतात. १९२५ ते १९३५ च्या काळातील त्यांच्या लघुकथांतून हरिभाऊ आपट्यांचा पाल्हाळ व विस्कळितपणा व गडकरी-कोल्हटकरांची अद्भुतरम्यता यांचें मिश्रण फार मोठ्या प्रमाणात दिसून येतें. 'मनोरंजन'च्या अंकात प्रसिद्ध झालेली त्यांची 'केशवसुतांची कविता' ही २५-३० पानी लघुकथा, किंवा 'यशवंता'च्या सुरुवातीच्या अंकात प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या 'भावाचा भाव', 'हिरा तो भंगला', 'विजय कोणाचा' वगैरेसारख्या लघुकथा पाहिल्या किंवा त्यांचे सुरुवातीचे कथासंग्रह चाळले तर ही अद्भुतरम्यता व पाल्हाळ किती मोठ्या प्रमाणात त्यांच्या लघुकथांतून दिसून येत होता, याची कल्पना येईल. पण पुढें त्यांच्या लघुकथेंत जास्त जास्त रेखीवपणा येत गेला व १९३५ नंतरच्या त्यांच्या कथा तर तंत्रशुद्धता, अनुभवाची विविधता व जिव्हाळा यानीं पुरेपूर नटलेल्या आहेत. याशिवाय ध्येयात्मकतेची जोड त्याला मिळाल्यामुळें त्यांच्या कथांवर निराळेंच सौंदर्य चढलें आहे. समाजातील निरनिराळीं चित्रें घेऊन आत्यंतिक तळमळीनें तीं वाचकांसमोर ठेवण्याचें खरें कार्य त्यांच्या लघुकथेने केलें आहे. 'गरिबाच्या व श्रीमंताच्या जगामधील भेद', 'संसारातील व जीवनांतील मोहाचे प्रसंग', 'ध्येयाच्या पाठीमागें धावणाऱ्या व्यक्ति', 'स्त्रीजीवनविषयक निरनिराळे प्रश्न', 'भग्न झालेलीं ध्येयें' इत्यादि त्यांच्या कथामधून आलेले विषय पाहिले तर 'त्यांच्या लघुकथा नुसतीच करमणूक करीत नाहींत तर त्या विचार करावयास लावतात', हें विधान यथार्थ वाटू लागतें. वाचकाना विचार करण्यास लावणारे किती लेखक महाराष्ट्रात आहेत याचा विचार केला म्हणजे श्री. खांडेकर यांची योग्यता आपणास पटून येईल. 'फुलें आणि दगड', 'नवा प्रातःकाळ', 'दरी आणि डोंगर', 'समाधीवरील फुलें', 'न दिसणारा पाऊस', 'फाटका शर्ट', अशा किती तरी लघुकथा आपणाला अशा आढळून येतील कीं, ज्यांत श्री. खांडे-

करांनीं मानवी जीवनातील विविध प्रश्न अत्यंत कलात्मक रीतीनें गोंवले आहेत; आणि हे विविध प्रश्न रंगवताना त्यानीं किती तरी अमर व्यक्ति आपल्या लघुकथांतून निर्माण केल्या आहेत. ' देवदूता ' मधील आबा गुरव, ' दरी व डोंगर ' मधील दादा, ' समाधीवरील फुलें ' मधील अबुताई, ' नवा प्रातःकाळ ' मधील आबा, ' न दिसणारा पाऊस ' मधील माई व ' दादू ' मधील दादू, या व्यक्ति एकदा वाचल्यावर वाचकाच्या स्मृतींतून सहजासहजीं जाणे शक्य नाहीं. तत्त्वप्रधान कथा लिहिताना क्वचित् कलेला बाध येतो हें खरें असलें तरी पुष्कळच कथातून त्यानीं तंत्रशुद्धता पाळली आहे. आकर्षक सुरुवात व परिणामकारक शेवट करण्याची त्याची दक्षता ' पांगळ्याचें दुःख ', ' देवदूत ', ' सरस्वती ', ' गार वारा ', इत्यादि किती तरी गोष्टींतून दिसून येते. समर्पक शीर्षक देण्याचें त्याचे कौशल्य तर बहुतेक गोष्टींत दिसून येतें. याशिवाय अलंकाराचें भरपूर लेणेंहि त्यानीं आपल्या कथावर चढवून त्यातील सौंदर्य वाढविलें आहे. मात्र क्वचित् अलंकाराच्या त्याच्या अट्टाहासामुळें संवादाला कृत्रिमता आल्याचीं व कथेतील सौंदर्याला बाध आल्याचीं उदाहरणेंहि त्याच्या कथातून पुष्कळ सापडतात. ' रूपक ' कथाचेंहि नवीन दालन त्यानीं मराठी वाङ्मयामध्यें उघडे केलें आहे. ' कलिका ' व ' मृगजळातील फूल ' हे त्यांचे रूपककथासग्रह या दृष्टीनें अभिनव आहेत.

याच काळात विशेष पुढे आलेल्या लेखकात य. गो. जोशी , वि. वि. बोकील, अनत काणेकर, लक्ष्मणराव सरदेसाई, भा. वि. वरेरकर, कुमार रघुवीर, दौंडकर, द. र. कवठेकर, माधवराव बागल, ना. धों. ताम्हणकर इत्यादि किती तरी नामवंत साहित्यिकाचीं नावे प्रामुख्यानें नजरेसमोर येतात. प्रत्येकानें लघुकथाचें दालन समृद्ध करण्याची आपापल्यापरीनें कोशीस केली आहे. य. गो. जोशाच्या 'पुनर्भेटी'चे आज ७ भाग बाहेर पडले आहेत व लघुकथावाङ्मयात आपलें विशिष्ट स्थान निश्चित करून ठेवलें आहे. त्याची 'यशवंता' तील लघुकथेच्या चढाओढींत पहिलें पारितोषिक मिळालेली ' शेवग्याच्या शेंगा ' ही लघुकथा वाचकाच्या स्मरणातून सहजासहजीं जाणें शक्य नाहीं. अशा ' शेवग्याच्या शेंगा ' त्याच्या सातहि भागात पुष्कळ सापडतात. घरगुती व प्रेमळ वातावरण घेऊन अत्यत जिव्हाळ्यानें त्याचें चित्रण करण्याची कला य. गो. जोशी याना छान साधली आहे. ' कर्ज फिटलें, पण सावकार

गमावला ', ' वहिनीच्या बांगड्या ', ' सुपारी ', ' कोसळलेली भिंत ', ' आला का रे बाळकृष्ण ? ' इत्यादि त्यांच्या कथा वाचताना वाचकांच्या चित्तवृत्ति थरारून येतात–आणि यातच जोशीबुवांच्या यशाचें रहस्य आहे. आपल्या लघुकथेंतून त्यांनीं ' माई ', 'अन्नपूर्णाबाई', ' मथुराकाकी ', वगैरे-सारख्या प्रभावी व्यक्ति निर्माण केल्या आहेत. ' चल, चल रे नवजवान ', ' कवि आणि कुस्ती ' वगैरेसारख्या उपरोधपूर्ण व विनोदी कथाहि त्यांनीं लिहिल्या आहेत. थोडक्यात त्यांच्या लघुकथांवरून त्यांना ' कौटुंबिक लेखक ' असें नाव कुणी दिलें तर तें अगदीं यथार्थ ठरण्यासारखें आहे. संसारांतील रंगणीय चित्रें घेऊन तीं आपल्या खेळकर व विनोदपूर्ण भाषेंत वाचकांसमोर ठेवणारे दुसरे लघुकथालेखक म्हणजे वि. वि. बोकील. त्यांच्या ' यशवंता'तील ' वधी 'नें प्रथम त्यांना पुढे आणलें. आणि त्यानंतर ' तारेचा संसार ', ' पूर्वजाची आठवण ', ' जखम ', ' कोरी वही ' वगैरेसारख्या मनोरम कथा लिहून त्यांनीं आपलें स्थान मराठी वाङ्मयांत कायम टिकविलें. खेळकर भाषा, धावते व विनोदपूर्ण संवाद व संसाराचीं मनोरम चित्रें हे त्यांच्या लघुकथेचे विशेष होत. त्यांच्या विनोदी लघुकथांनींहि त्यांना चांगला लौकिक मिळवून दिला; पण त्यांच्या गोष्टींतील विनोद बहुधा भाषेंतील खेळकरपणा व यशस्वी व्यक्तिदर्शन यावर अवलंबून असल्यानें तो खरोखरच श्रेष्ठ दर्जाचा ठरला आहे. ' जमीन आणि अस्मान ', ' फुगा ', ' निळोबाचा गाथा ', ' हीं वडील माणसें ' वगैरे गोष्टी या विधानाची चांगली साक्ष पटवतील. इंग्रजीमधील ' वुइल्यम ' वरून त्यांनीं मराठींमध्यें निर्माण केलेला बालनायक ' वसंत ' आज वाचकवर्गाची आपल्या दांडगाईनें चांगलीच करमणूक करीत आहे.

प्रा. अनंत काणेकर यांच्या लघुनिबंधाइतकी त्यांची लघुकथा खुसखुशीत वाटत नाहीं. तरी पण उत्कृष्ट वर्णन सूक्ष्म निरीक्षण–मानवी मनोव्यापाराचें ज्ञान व प्रसादपूर्ण भाषा यामुळें त्यांच्या ' जागत्या छाया ' व ' मोरपिसें '-मधील कांहीं लघुकथा अतिशय वैशिष्ट्यपूर्ण झाल्या आहेत. ' पठाणाचें हृदय ' ही रेडिओ–कथा व ' कालप्रवाहाशीं झुंज ', ' दत्ताचें देऊळ, ' ' खरें झालेलें स्वप्न ', ' काश्मिरी गुलाब ', ' काळी मेहुणी ' या त्यांच्या कथा एकदा वाचल्यावर वाचक विसरणार नाहीं. ' दिव्यावरतीं अंधेर ' या

कथासंग्रहातील जगाचा उलटा न्याय दाखविणारीं नऊ चित्रें अत्यंत परिणामकारक व उद्वेग उत्पन्न करणारीं आहेत. ' काळी मेहुणी ' या कथासंग्रहांतील ' शुभ्र दात, कुरळे केस व एक खलपुरुष ', ' कोकोनाडा एक्स्प्रेस ', ' नागवेलचे पोफळे ', ' कुशाभाऊच्या छत्र्या ' इत्यादि विनोदी गोष्टी त्याच्या लेखनाची दुसरी बाजू दाखवतात. प्रा. लक्ष्मणराव सरदेसाई यानी प्रादेशिक वातावरण निर्माण करून आपल्या कथातून गोमातकीय सौंदर्य रम्यतेनें खेळवलें आहे. पण त्याशिवाय कथानकाकारिता निवडलेले प्रसंग हृदयस्पर्शी असल्यानें त्याच्या लघुकथेचें निराळेंच वैशिष्ट्य निर्माण झालें आहे. ' शामा ', ' संरक्षक देवता ', ' आनीतेचें दिव्य ', ' विटाळलेली देवता ', ' फुलराणी ' वगैरे पुष्कळच कथा या दृष्टीनें वाचनीय आहेत. मामा वरेरकराच्या कथेंत खालच्या वर्गाचीं व मजुराचीं चित्रे तन्मयतेनें रेखाटलीं आहेत; पण कथेंत आवश्यक असणारी रंजकता मात्र त्या मानानें फारशी नाहीं असें म्हणावें लागतें. त्याच्या ' षोडशी ', ' स्वैरसंचार ', ' एकादशी ' इत्यादि कथासंग्रहांत ' पोऱ्या ' सारखीं काहीं सुंदर शब्दचित्रें सोडलीं तर बाकीच्या कथा सामान्य प्रतीच्या वाटतात. श्री. दौंडकर यांच्या कथांतून मात्र तंत्रशुद्धता व रेखीवता अत्यंत मोठ्या प्रमाणात सापडते आणि त्या दृष्टीनें ' मोत्याची कुडी ' हा त्याचा लघुकथासंग्रह अभ्यासनीय आहे. संसारातील चित्रें करुणरम्यतेनें रंगविणारे आणखी एक लेखक म्हणजे द. र. कवठेकर. भावनेची उत्कटता हा त्याच्या कथाचा विशेष आहे. ' अंध अंधारीं बैसले ', ' गालावरचा मुका ', ' तो एक वेडा आणि मी पण वेडी ' वगैरे किती तरी कथा वाचकाच्या डोळ्यांना पाणी आणतात. करुण चित्रें प्रभावी रीतीनें रगवून वाचकाच्या भावना हालवून सोडण्याचें सामर्थ्य त्यांच्या लेखणींत आहे. ' अन् लोक म्हणतात मी भिकारी आहे म्हणून ', ' अंध अधारीं बैसले ' इत्यादि काहीं कथातील स्वभावरेखन प्रभावी झालें आहे.

मराठी वाङ्मयात शब्दचित्रें व व्यक्तिचित्रें कलात्मक रीतीनें रगविणाऱ्या लेखकात कुमार रघुवीर, माधवराव बागल, गागल, ना. धों. ताम्हणकर यांचा प्रामुख्यानें उल्लेख करावा लागेल. कुमार रघुवीर यांच्या ' हृदय ' या संग्रहातील शब्दचित्रें अतिशय रेखीव व आकर्षक आहेत. अशाच तऱ्हेचीं शब्दचित्रें वि. द. घाटे यांनीं ' काहीं म्हातारे व एक म्हातारी '

या पुस्तकांत रेखाटली आहेत. यांतील बरींच व्यक्तिचित्रें त्यांच्या परिचित व्यक्तींचींच असलीं तरी त्यांत वर्णन केलेल्या स्वभावछटा फार मार्मिक व कलात्मक वाटतात. त्यातील ' कारकून ' हें शब्दचित्र खरोखर आदर्श शब्दचित्राचा नमुना म्हणून दाखविण्यासारखें आहे. समाजातील अन्यायाचीं चित्रें माधवराव बागल यानीं आपल्या प्रभावी लेखणीनें अत्यंत जिव्हाळ्यानें रंगविलेलीं असलीं तरी त्यात कलेचा विकास फारसा दिसून येत नाहीं. ना. धों. ताम्हणकरानीं मात्र यशस्वी स्वभावचित्रें निर्माण करून त्या स्वभावचित्राभोंवतीं निरनिराळे प्रसग लघुकथेच्या रूपात रगवून एका उपेक्षित लघुकथादालनाला चालना देण्याचें कार्य केलें. त्यानीं निर्माण केलेला ' दाजी ' अद्याप मराठी वाचकाच्या स्मरणात आहे. अशी प्रभावी व्यक्ति निर्माण करून त्याभोंवतीं विविध प्रसंगांचें जाळें निर्माण करण्याचे प्रयत्न आपणांकडे फारसे झाले नाहींत. कै. श्री. कृ. कोल्हटकरांची ' पाडुतात्या-बंडुनाना व मी ' ही त्रयी, गडकऱ्याचा ' बाळकराम ', चिं. वि. जोशाचा ' चिमणराव ' व ' आजीबाई ' ताम्हणकराचा ' दाजी ', ' तात्या ' व ' गोट्या ' फाटकांचा ' आण्णा ' व बोकिलाचा ' वसंत ' एवढींच कांहीं तरी प्रभावी व्यक्तिचित्रें आपणांकडे निर्माण झालीं आहेत. एरवीं हें दालन अद्याप उपेक्षितच आहे.

या एकोणीस वर्षांत लेखिकाची प्रभावळ सुद्धा फार मोठ्या प्रमाणात दिसून येते. विभावरी शिरूरकरांचे ' कळ्याचे निःश्वास ' याच काळात गाजले. स्त्रीजीवनातील निरनिराळ्या प्रश्नाची व त्याच्या दुःखाची अत्यंत प्रभावी लेखणीनें चर्चा करून काहीं काळ या लेखिकेनें आपल्या या कथासंग्रहाने व त्यानंतर प्रसिद्ध झालेल्या निरनिराळ्या कादंबऱ्यांनीं चागलीच खळबळ उडवून दिली. सौ. शाताबाई नाशिककर यांचे ' नीलेचा दिलरुबा ' व ' वाळूंतील सरोवर ' हे दोन कथासंग्रह प्रसिद्ध झाले. स्त्रीजीवनाच्या विविध प्रश्नाची चर्चा याच्या कथांतून केलेली आढळते. सौ. कुसुमावतीबाई देशपाडे याचा ' दीपकळी ' कमलाबाई टिळक याची 'हृदय-शारदा' कृष्णाबाई यांच्या ' मानसलहरी ' व ' अनिरुद्धप्रवाह ' हे चार विशेष आकर्षक असे कथासंग्रह या काळात प्रसिद्ध झाले. कै. आनंदीबाई किर्लोस्कर, सौ. कमलाबाई बंबेवाले, कु. पिरोज आनंदकर, सौ. कुमुदिनी रांगणेकर,

सौ. कमल फडके, सौ. सिंधु गाडगीळ इत्यादि किती तरी लेखिका मराठी कथावाङ्मयाचें दालन आज विभूषित करीत आहेत. स्त्रीजीवनाचे विविध पैलू याच्या कथातून दिसत असले, तरी पहिल्या तीन-चार लेखिका सोडून दिल्यास विशेष प्रभावी असें लघुकथालेखन फारसें कुणाच्या हातून झालें नाहीं. स्त्रीजीवनविषयक विविध प्रश्नांची चर्चा ज्या दृष्टीनें त्याच्या लघुकथातून व्हावयास पाहिजे तशीहि ती झालेली दिसत नाहीं.

विनोदी कथाचा प्रान्तहि गेल्या एकोणीस वर्षांत अगदीं समृद्ध झाला आहे. चिं. वि. जोशी यांनीं ' चिमणराव ' निर्माण करून चिमीच्या लग्नाची मोहीम सुरू केली. या चिमणरावावर उभारलेल्या गोष्टींतील विनोद बराचसा स्वभावनिष्ठ असल्यानें तो चागला साधला आहे. चिमणरावाबरोबर त्यानीं गोष्टींवल्हाळ आजीबाईहि निर्माण केल्या आहेत, पण चिमणरावाइतक्या त्या प्रभावी ठरूं शकल्या नाहींत. चिमणरावाच्या स्वभावामुळे निर्माण झालेल्या विनोदी प्रसगाचे नमुने ' आणखी चिमणराव ' या पुस्तकात खूपच सापडतात. चिं. वि. जोशाप्रमाणें स्वभावनिष्ठ विनोदाचा अवलंब ना. धों. ताम्हणकर यानीं ' दाजी ' त केला पण दाजी हा केवळ विनोदनिर्मितीसाठीं निर्माण झाला नाहीं. समाजातील निरर्थक रूढि व ढोंग नाहींसें करण्यासाठीं बंडाचें निशाण घेऊन निर्भीडपणें आघाडीवर निघाला होता. त्यामुळें स्पष्टवक्तेपणा-निःस्पृहता-खोटेपणाची चीड या त्याच्या ( अव ) गुणामुळे व्यवहारी जगात त्याला अनुभवावे लागलेले प्रसंग वाचून गंमत वाटते; पग त्याबरोबर दाजीविषयीं सहानुभूति वाटू लागते. बोकिलाचा बालनायक ' वसंत ' याचे पराक्रमहि स्वभावनिष्ठ विनोदाचे उत्कृष्ट मासले आहेत.

आचार्य अत्रे याचें विनोदी कथालेखन भरपूर नसलें तरी आहे तें भरीव आहे. ' जाबुवन्त ', ' दंतमजन ' सारख्या काहीं गोष्टींत तो विनोद शब्दनिष्ठ आहे. ' ब्रँडीची बाटली, ' ' बाळूची बायको ', ' माझा व्यापार ' अशासारख्या गोष्टींत प्रसंगनिष्ठ व व्यक्तिनिष्ठ अशा दोन्ही विनोदाचें मिश्रण आहे. ' गुत्यात नारद ' हें त्याच्या प्रसंगनिष्ठ गोष्टीचें अत्यंत उत्तम उदाहरण म्हणतां येईल. वि. मा. दी. पटवर्धनानीं पी. जी. वुडहाउसच्या जीव्हजवरून मराठी वाङ्मयात ' जिवा ' आणला. पण तो तितकासा यशस्वी होऊं शकला नाहीं. शामराव ओकाच्या विनोदी गोष्टी मात्र उल्लेखनीय

आहेत. कांहीं रूपान्तरित तर कांहीं स्वतंत्र अशा अनेक विनोदी गोष्टींची पाठीले त्यांनीं ' मालगाडी ' तून वाचकांच्या भेटीला पाठविलीं आहेत. वा. वि. जोशांनीं काढलेले ' रेशमी चिमटे ' चुरचुरीत असले तरी यशस्वी विनोदी लघुकथालेखनाला लागणारी वृत्ति त्यांच्या कथेंतून फारशी आढळून येत नाहीं.

' नवीन प्रकार ' म्हणून ' लघुतम ' कथा मराठींत आणण्याचा प्रा. भा. म. गोरे यांनीं प्रयत्न केला व कथादालनात ' नवें निशाण ' उभारलें. पुष्कळ प्रथितयश लेखकांनीं हें ' नवें निशाण ' उभारण्यास मदत केली. पण लघुतमकथा केवळ घटनेच्या चमत्कृतीवर अवलंबून असल्यानें त्या मराठी वाङ्मयात इतक्याशा लोकप्रिय होऊं शकल्या नाहींत.

प्रा. फडके-खाडेकरासारख्या प्रभावी लेखकाची परंपरा पुढे चालू ठेवतील असे नवोदित लेखकहि या काळांत पुष्कळ आहेत आणि ते सर्व आपापल्या परीनें कथा-वाङ्मयाच्या दालनात भर टाकण्याचा प्रयत्न करीत आहेत. त्याच्या वाङ्मयीन कार्याचा हा आरंभच असल्यानें त्यांच्या लघुकथांवर यथार्थतेनें मत देणें जरी अशक्य असलें तरी त्याच्या आजच्या लघुकथांचें स्वरूप त्यांच्या भावी उज्ज्वल कार्याबद्दल मनात आशावाद निर्माण करण्यास पुरेसें आहे. या नवोदित लेखकात र. वा. दिघे व ग. ल. ठोकळ याचीं नावें काहींशीं प्रामुख्यानें पुढें येतात. र. वा. दिघे याचा अद्‌भुततेकडे विशेष ओढा आहे हें त्याच्या ' दण्डकारण्यातील रम्य रात्रीं ' तील ' घरकुल ', ' केळीचें पान ' वगैरे लघुकथा वाचताना सहज लक्षात येतें. नुकतीच ' किर्लोस्कर ' मध्यें प्रसिद्ध झालेली त्याची ' ताजमहाल ' ही गोष्ट घेतली किंवा ' सस्यशामला ' ही गोष्ट घेतली तरी हीच अद्‌भुततेची आवड त्यात दिसून येते—पण या अद्‌भुततेंत कल्पनाविलासाचें नावीन्य असल्यानें त्याच्या या गोष्टी आकर्षक वाटतात. ग. ल. ठोकळ यानीं आपल्या कथांतून ग्रामीण वातावरण रंगविण्याचा अत्यंत यशस्वी प्रयत्न केला आहे. त्याच्या ' कडू साखर ' या कथासंग्रहातील लघुकथा ग्रामीण जीवनाचे उत्कृष्ट नमुने म्हणून दाखविता येतील. त्याबरोबर त्यांच्या विनोदी कथांनीहि मराठी वाङ्मयात चांगली भर घातली आहे. प्रा. माटे याचा अन्तर्भाव नवोदित लेखकामध्यें करणें चमत्कारिक वाटेल—पण लघुकथाप्रान्तात त्यानीं नव्यानेंच

पदार्पण केलें आहे आणि ‘ उपेक्षितांचें अन्तरंग ’ उघडून यशस्वी लघुकथा-लेखकाला लागणारे गुण आपल्या अंगीं आहेत हें त्यानीं सिद्ध केलें आहे. त्यामुळें त्याच्या भावी लेखनाकडे आशावादीपणानें आपण नजर लावली तर आश्चर्य नाहीं. प्रभाकर पाध्यानीं ‘ व्याधाची चादणी ’ प्रसिद्ध करून काहीं सुंदर लघुकथाची भर कथादालनांत घातली आहे. स्वभावातील मार्मिक छटा रंगविण्यात व रसानुकूल वातावरण निर्माण करण्यात त्याचा हातखंडा आहे. ‘ सायंकाळच्या सावल्या ’ ही लघुकथा वातावरणनिर्मितीकरिता व ‘ व्याधाची चादणी ’, ‘ देवगाईचा पाय ’ या लघुकथा स्वभावरेखनासाठीं उल्लेखनीय वाटतात. याशिवाय ‘ गगनाला गवसणी ’ घालणारे श्री. भिडे, वाचकाना ‘ मधाचें बोट ’ चाटविणारे श्री. विद्वांस व ‘ पांढरपेशाच्या जगा ’ मध्यें विहार करणारे श्री. श्री. ज. जोशी याच्या लघुकथेमधील नवखेपणाचे दोष वजा केले तर आशावादीपणानें याच्याकडे पाहाण्याइतकें कथाकथनकौशल्य याच्या-मध्यें आहे हें खास. याशिवाय डॉ. वर्टी, मु. बा. गडकरी, श्री. मोकाशी, वा. ग. तळवळकर, जी. एन्. आपटे, शशिकान्त पुनर्वसु इत्यादि किती तरी लघुकथालेखक आज निरनिराळ्या मासिकातून झळकत आहेत. ‘ समीक्षक ’, ‘ किर्लोस्कर ’, ‘ महाद्वार ’, इत्यादि मासिकानीं लावलेल्या लघुकथाच्या चढाओढीमुळें नवीन नवीन प्रतिभेचा शोध लागत आहे. या सर्वांचा यथायोग्य परामर्ष घेणें अशक्य असलें तरी लघुकथेच्या भावी वैभवा-विषयीं आशावाद निर्माण करण्याचें सामर्थ्य त्याच्या लघुकथात आहे असें निश्चित म्हणता येईल.

याप्रमाणें हरिभाऊंच्या काळापासून आतांपर्यंत एकंदर पंचावन्न वर्षांच्या काळात लघुकथेच्या स्वरूपात कशा रीतीचीं अवस्थान्तरें झालीं याची कल्पना येऊं शकेल. सुरुवातीच्या केवळ उपदेशप्रधान दृष्टिकोण मधल्या काळांत कमी होत होत, ‘ लघुकथेचा उद्देश केवळ आनद देणें आहे ’ असें विधान कर-णाऱ्या लेखकाच्या काळात बोधवादाची लघुकथेंतून अजीबात हकालपट्टी केली; पण त्यानंतर पुन्हा ध्येयात्मक लघुकथाची सुरुवात होऊन कलात्मक मतप्रचार लघुकथेंत शक्य आहे. लघुकथेच्या सौंदर्याला तो यत्किंचितहि बाध न आणता क्वचित् लघुकथेंतील सौंदर्य वाढविण्यास तो साहाय्य करतो हें मत प्रस्थापित झालें. हरिभाऊंच्या वेळचा पाल्हाळ, एकसूत्रीपणाचा अभाव

इत्यादि लघुकथेतील दोष ' मनोरंजन ' काळात बरेच कमी झाले व ' यशवंत ' युगात तर तंत्रशुद्धतेकडे व रेखीवतेकडे अधिकाधिक लक्ष देण्यात येऊ लागलें. लघुकथा परिणामकारक होण्यासाठीं आकर्षक सुरुवात, प्रभावी समरप्रसंग, मार्मिक व्यक्तिदर्शन व परिणामकारक शेवट याची आवश्यकता आज बहुतेक लेखकाना पटली असल्याची जाणीव त्याच्या लघुकथावरून आपणाला सहज दिसून येते.

आज लघुकथेचें स्वरूप पूर्णपणें परिणतावस्थेप्रत गेले असें जरी आपणाला निश्चितपणे म्हणता येत नसलें तरी तंत्रदृष्ट्या, विषयदृष्ट्या व प्रकारदृष्ट्या आज त्यात अतिशय विविधता आली आहे हें निश्चित. तंत्रदृष्ट्या जर आपण विचार करूं लागलों तर चार-पाच गोष्टी ठळकपणें आपल्या डोळ्यात भरतील. पूर्वी लघुकथेच्या ' सुरुवाती 'ला विशेष महत्त्व देण्यात येत नव्हतें. अद्यापहि काहीं लेखकाना आकर्षक सुरुवातीचें महत्त्व पटल्याचें दिसत नाहीं. परतु फडके, खाडेकर, काणेकर इत्यादि काहीं लेखकाच्या लघुकथा पाहिल्या तर ' आकर्षक सुरुवाती 'चें महत्त्व आपणाला सहज समजून येईल. ' आकर्षक सुरुवात ' करण्याची एखादी विशिष्ट अशी पद्धत नाहीं. काहीं लेखक एखाद्या सूचक वाक्यानें पुढें येणाऱ्या कथानकाची जाणीव देऊन वाचकाच्या मनात अपेक्षा निर्माण करतात. काहीं लेखक एखाद्या सामान्य सिद्धान्तानें करतात, तर काहीं व्यक्तीच्या वर्णनानें करतात. सुरुवात कशीहि असली तरी ती पाल्हाळिक व कंटाळवाणी असता कामा नये ही गोष्ट लघुकथालेखकानें प्रथम लक्षात ठेवली पाहिजे. नवीन लेखकाच्या लक्षात हें ' आकर्षक सुरुवाती 'चें महत्त्व आल्याचें दिसत नाहीं. पण समरप्रसंगाची रचना करताना वाचकाची उत्कंठा व विस्मय वाढवीत त्याना कथानकातील उच्चबिंदूकडे नेण्याची काळजी मात्र आज बहुतेक लघुकथालेखकाच्या लघुकथेंतून घेतली जात असल्याचें आपणाला आढळून येतें. मात्र तंत्रदृष्ट्या रेखीव रचना करताना संयमाचें महत्त्व मात्र बऱ्याच लेखकाना पटल्याचें दिसत नाहीं. फडके, खाडेकर व दौंडकर याच्या कथेंत जी रेखीव आकर्षकता दिसते ती बोकील, य. गो. जोशी इत्यादि लेखकाच्या लघुकथेंत दिसून येत नाहीं. त्यामुळे समरप्रसंगाची परिणामकारकता मधल्या पाल्हाळामुळें काहींशी अडल्यासारखी वाटते. परिणामकारक शेवट हें एक

यशस्वी लघुकथेचें गमक आहे. लघुकथेंतील एकंदर प्रसंगाचा मनाव झालेला परिणाम कायम करण्यासाठीं हा शेवट म्हणजे शेवटाला दिलेत पूर्णविरामच. त्या पूर्णविरामानें जितकी मनाची पकड घेतली जाईल तितव लघुकथेचा परिणाम मनावर अधिक होईल. किंबहुना लघुकथेचा शेव दृष्टीसमोर ठेवूनच लघुकथालेखकानें लघुकथा लिहिण्यास सुरवात केल पाहिजे असें जें सांगितलें जातें याचें कारण हेंच! ठराविक विख्या लघुकथालेखकांशिवाय इतर लेखकांनीं हें रहस्य अद्याप फारसें आत्मसा केल्यासारखें दिसत नाहीं.

कथानकाच्या या सौष्ठवाकडे लक्ष देताना त्यातील स्वभावरेखनाकडे तितकें लक्ष पुरविलें पाहिजे. जितकें स्वभावदर्शन परिणामी तितकी लघुकथा अधि आकर्षक. कथानकाच्या विकासाला गति देण्यासाठीं लघुकथेतील पात्रें हीं जिवं व वैशिष्ट्यपूर्ण वाटलीं पाहिजेत. 'मनोरंजन' कालात लघुकथा मुख्यतः घटन प्रधान होत्या. त्यामुळें व्यक्तिरेखनाकडे बहुधा दुर्लक्ष केलें जात असे व्यक्तिदर्शनाचें खरें महत्त्व प्रा. फडके यानीं ओळखलेल्या 'शान्ता', 'माणू जगतो कशासाठीं', 'पंताची पदवी' इत्यादि निरनिराळ्या लघुकथा तून त्यानीं निरनिराळ्या मानवी स्वभावाच्या छटा कलात्मक रीती रंगविण्यास सुरवात केली आणि त्यानंतर खांडेकर, काणेकर, बोकील, य. गो जोशी, द. र. कवटेकर इत्यादि अनेक लेखकांनीं आपल्या लघुकथा वाङ्मयातून विविध मानवी स्वभावाच्या छटा रंगविल्या. त्यामुळें लघुकथ ही हळूहळू स्वभावप्रधान होऊं लागली. आजच्या नवोदित लेखकाच्य लघुकथामध्यें अशा मार्मिक स्वभावछटा दिसत नाहींत हें खरें आहे; प त्याच्या लघुकथातून अशा स्वभावदर्शनाचे चाललेले प्रयत्न पाहून त्यां हें सामर्थ्य विकासाच्या मार्गावर आहे असें म्हटलें तर फारसें चुकणार नाहीं

निवेदनपद्धतीमध्यें सुद्धा आज विविधता आली आहे. पूर्वीची साध गोष्ट सांगण्याची ढोबळ पद्धत जाऊन त्यामध्यें निरनिराळीं आकर्षणें उत्प करण्यात आलीं. त्यामध्यें संवादाचें स्थान फार मोठें आहे. गुर्जरांच्या गोखल्यांच्या कथातून संवादाचा उपयोग फार मोठा करण्यात येत असे, प त्या संवादात व्यक्तिगत निराळेपणा किंवा चातुर्य फारसें दिसून येत नसे आजच्या लघुकथात संवादातील चातुर्य प्रा. फडके, बोकील व य. गो

जोशी याच्या कथांतून फार मोठ्या प्रमाणात दिसून येते. वि. स. खाडेकराचे सवाद त्यांतील अलकाराच्या अट्टाहासानें कांहीसे बोजड व कृत्रिम वाटतात. पण ज्या ठिकाणीं त्यानीं अलंकाराचे जोखड फेकून दिलें आहे त्या ठिकाणीं त्याचे संवाद प्रसन्न व स्वभावदर्शक झाले आहेत. मात्र तुलनात्मक दृष्टीनें 'मनोरजन'–युगापेक्षा या युगातील सवाद जास्त स्वभावनिष्ठ व वास्तव असे झाले आहेत. सवादाबरोबर वर्णनामध्यें देखील जास्त सूचकता व चातुर्य येत आहे. पूर्वींची व्यक्तीचें किवा देखाव्याचें सरळ वर्णन करण्याची प्रत्यक्ष पद्धति जाऊन त्या जागी कथानकाच्या ओघात रसानुकूल व सूचक अशीं वर्णनें करण्याची पद्धत येऊं लागली आहे. स्वभावाच्या काय किंवा देखाव्याच्या काय, लाबलचक वर्णनाना अलीकडील कथांतून थारा मिळत नाहीं. पण वातावरण निर्माण करण्यासाठीं या वर्णनाचा जितका फायदा घेतला पाहिजे तितका तो घेतला जात नाहीं हें मात्र खरें आहे. कथानकातील रसाला अनुकूल असें वातावरण निर्माण करण्याची कला अवघड आहे व ती फारच थोड्या लेखकाना साध्य झाली आहे. 'वातावरणप्रधान' लघुकथा तर मराठीमध्ये फार थोड्या आहेत. प्रा. फडके याची 'लाटकी लक्ष्मी', अनंत काणेकराच्या 'खरें झालेले स्वप्न', 'काश्मिरी गुलाब', 'सहा कुमारिका आणि लग्न', प्रभाकर पाध्याची 'सायकाळच्या सावल्या', कवठेकराची 'तो एक वेडा आणि मी पण वेडी' इत्यादि काहीं कथा रसानुकूल वातावरणनिर्मितीच्यीं उत्कृष्ट उदाहरणे म्हणून दाखविता येतील. प्रा. लक्ष्मणराव सरदेसाई, जयवतराव सरदेसाई, सुखटणकर, बी. रघुनाथ, पै, रायकर इत्यादि लघुकथालेखकाच्या लघुकथातून गोमातकीय वातावरण फार रम्यतेने रगविले गेले आहे. प्रादेशिक कथाचे रम्य नमुने म्हणून याच्या कथा मराठी वाङ्मयात गाजल्या आहेत.

विषयाच्या दृष्टीने तर या काळात फार मोठी विविधता आली आहे. 'मनोरजन'–कालामध्यें लघुकथेचें विश्व सुशिक्षित समाजापुरतें मर्यादित होतें; पण या काळात लघुकथेचा संचार सर्व प्रकारच्या जीवनातून होऊ लागला आहे. सामाजिक जीवनातील विविध अंगे व समाजातील निरनिराळीं चित्रे आजच्या लघुकथामध्ये प्रतिबिंबित होत आहत. गुर्जरकालीन

अद्‌भुतता व कल्पनारम्यता जाऊन तिच्या जागीं कलात्मक वास्तवता वाङ्मयामध्यें येऊं लागली. गरिबाच्या झोपडीपासून राजवाड्यातील महाला-पर्यंत व शुचिर्भूत ब्राह्मणाच्या घरापासून वेश्येच्या माडीपर्यंत सर्व प्रकारचीं चित्रें आज वाङ्मयात येऊं लागलीं. मध्यमवर्गीय जीवनाचें चित्रण करणाऱ्या लेखकाच्या वर्गाबरोबर दलितवर्गाचें जीवन व त्याच्यापुढील प्रश्न तन्मयतेने व जिव्हाळ्यानें रेखाटणारा लेखकवर्ग निघाला. सामाजिक प्रश्नाबरोबर धार्मिक व राजकीय प्रश्नाची चर्चा लघुकथातून येऊ लागली. थोडक्यात म्हणजे सामाजिक व आर्थिक जीवनाची एकहि बाजू अशी राहिली नाही कीं, जिचें चित्रण लघुकथातून झालें नाहीं.

एकूण १९१४ ते ४४ हा तीस वर्षांचा काळ घेतला तर या काळात लघुकथेची सर्वांगीण प्रगति झाली असें आपणाला निःसंशय म्हणता येईल. केवळ बाह्य स्वरूपातच ही प्रगति झाली असे नसून लघुकथेचें अंतरंगहि तितकेंच प्रगत झालें आहे हे सहज लक्षात येण्यासारखें आहे. ना. सी. फडक्यांनीं लघुकथेला कलेचा उजळा दिला, वि. स. खांडेकरानी तिला ध्येयप्रवणतेची व अलंकाराची जोड दिली. अनंत काणेकरांनी निसर्ग व मानव यांच्यामधील झगड्याचें स्वरूप तिच्यामध्यें रंगविलें. य. गो. जोशी, वि. वि. बोकील व द. र. कवठेकर यानीं घरगुती व कौटुंबिक जीवनातून तिला खेळवलें व प्रा. लक्ष्मणराव सरदेसाई वगैरे गोमंतकीय लेखकानीं गोमंतकातील सौंदर्याचा साज तिच्यावर चढवला. त्याबरोबरच लघुकथेने मामा वरेरकराबरोबर मजुराच्या जीवनात दिघे, ठोकळ वगैरे लेखका-बरोबर ग्रामीण जीवनात संचार करून आपलें अनुभवक्षेत्र अधिक विस्तृत बनलें. राजेरजवाड्यांपासून रस्त्यावरील आंधळ्या भिकाऱ्यापर्यंत व 'माई'-सारख्या पतिव्रता स्त्रीपासून निसर्गाशीं झुंज खेळणाऱ्या सामान्य वेश्येपर्यंत सर्वांना तिने थारा दिला व सर्वांच्या मानसिक व्यापाराचें सहानुभूतीपूर्वक निरीक्षण केलें. थोडक्यात म्हणजे लघुकथा आज डौलदार—आकर्षक—कलापूर्ण व ध्येयप्रवण अशी बनली आहे.

'यशवन्ता' च्या ऐन अमदानीच्या काळाच्या मानानें मराठी लघु-कथेची आज पिछेहाट झाली आहे असा आक्षेप अनन्त अन्तरकरानीं शं. ह. देशपांड्याच्या 'लघुकथा' या पुस्तकाच्या प्रस्तावनेत घेतला आहे.

कला व उपयुक्तता याच्या वादात उपयुक्ततावादी मतप्रणालीचा प्रभाव आज साहित्यावर पडला आहे आणि त्यामुळें कलेची कदर बाळगली जात नाहीं असा त्याचा आक्षेप आहे. पण 'यशवन्त' संपुष्टात आल्यावर 'किर्लोस्कर'-मधून आलेल्या फडके–खांडेकर याच्या लघुकथा–त्यानंतरच प्रसिद्ध झालेले अनत काणेकर–बोकील, य. गो. जोशी, प्रा. माटे, द. र. कवठेकर याचे वाङ्मय आणि नवोदित लेखकापैकीं दिघे–ठोकळ–पाध्ये वगैरेंच्या लघुकथा या जर वाचल्या तर लघुकथेच्या पिछेहाटीसबधीं त्याचा आक्षेप कितपत सयुक्तिक ठरेल हा प्रश्नच आहे. उपयुक्ततावादामुळें लघुकथेची पिछेहाट झाली आहे हे त्याचें म्हणणेंहि इतकेंसें बरोबर नाहीं. वि. स. खाडेकराच्या कथा ध्येयप्रवण असून त्यातील कलेला बाध येऊ शकला नाहीं. अनत काणेकराच्या किंवा ग. ल. ठोकळाच्या कथेंत दलित किंवा ग्रामीणवर्गाचें चित्रण आहे म्हणून त्याच्या लघुकथा हिणकस ठरूं शकल्या नाहींत. वेश्याजीवनाचे विदारक चित्र रगविणाऱ्या 'कालप्रवाहाशीं झुज' किंवा 'काश्मिरी गुलाब' या त्याच्या लघुकथा उत्कृष्ट गणल्या जातात. येवढें खरे आहे, कीं कांहीं सामान्य प्रतिभेचे नवीन लेखक हा दलितवर्गाचा प्रश्न वाङ्मयात आणण्याचा प्रयत्न करतात आणि त्याच्या लेखणीला तो न पेलल्यामुळें त्याच्या लघुकथा नीरस होतात. परिणामकारक लघुकथेला आवश्यक अशीं मूलतत्त्वे विचारात न घेता एकदम मोठी उडी घेण्याच्या या त्याच्या प्रयत्नामुळें त्याचें वाङ्मय निःसत्व ठरतें. पण अशा मूठभर लघुकथालेखकाच्या कृतींवरून सर्व लघुकथावाङ्मयासबंधीं असा आक्षेप घेणें बरोबर ठरणार नाहीं. अर्थात् कला व उपयुक्ततावाद याच्यामध्यें श्री. अंतरकर समजतात त्याप्रमाणें मोठा संघर्ष आहे काय हाच मुळीं वादग्रस्त प्रश्न आहे. पण त्याची चर्चा करण्याचें हें प्रस्तुत स्थळ नव्हे.

लघुकथेच्या या एकंदर इतिहासावरून एक गोष्ट प्रामुख्याने नजरेस येईल. लघुकथेचा दरबार मोठमोठ्या सरदारानीं फुलून गेला आहे. वि. स. खाडेकर हे मुख्य प्रधानाच्या मानाच्या आसनावर बसले आहेत. त्याच्या शेजारींच प्रा. फडके–य. गो. जोशी–काणेकर–बोकील वगैरेसारखे पहिल्या प्रतीचे सरदार मानाच्या आसनावर बसले आहेत. निरनिराळ्या दुय्यम सरदारानीं आपापलीं आसनें विभूषित केलेलीं आहेत. एका बाजूला आनंदीबाई

शिर्के–शिरूरकर–मालतीबाई दाडेकर–कृष्णाबाई मोटे–कमलाबाई टिळक इत्यादि स्त्रिया मानाच्या ठिकाणीं आपला नजराणा घेऊन उभ्या आहेत पण ......पण लघुकथासम्राटाचें सिंहासन अद्याप मोकळें आहे. त्या सम्राटाच्या सिंहासनावर कोण अधिष्ठित होणार आहे ? दरबारातील एकादी व्यक्तीच त्या सम्राटाच्या सिंहासनावर अधिष्ठित होणार आहे का या सम्राटाचा दरबारात अद्याप प्रवेश व्हावयाचा आहे; भविष्यकाळच या प्रश्नाचें उत्तर देण्यास समर्थ आहे.



: ४ :

# लघुनिबंध

प्रा. विष्णु बापूजी आंबेकर

‘ लघुनिबंध ’ या काटेकोर संज्ञेने आजकाल परिचित असलेलें लेखन मराठींत गेल्या पधरा वर्षांत विशेष जोराने जोपासलें गेले आहे. पण या लेखनप्रकाराचा इतिहास आणि विकास याचा व्याप वर्णन करून सांगताना मात्र एवढी लहानशीच कालमर्यादा जमेंत धरून भागणार नाहीं. सामाजिक, राजकीय, वैचारिक आणि वाङ्मयीन प्रगतीच्या अनुरोधाने लेखकाच्या लेखनविषयक स्फूर्तीला, शैलीला आणि विचारप्रदर्शनाला एकसारखीं निरनिराळीं वळणें मिळतात. या वळणांचें इतिहासदृष्टीनें सूक्ष्म परीक्षण केल्याशिवाय कोणताहि वाङ्मयप्रकार आज आहे या स्थितींत कसा परिणत झाला याचा परिपूर्ण बोध होऊं शकत नाही. मराठींतील गेल्या तीस वर्षांतीलच नव्हे तर गेल्या शभर वर्षांतील वाङ्मय हे मुख्यतः अनुकरणाच्या लालसेनेंच निर्माण झालें आहे. ब्रिटिश राजवट सुरू झाल्यानतर राज्यकर्त्यांच्या सर्व सामाजिक चालचर्येचें अनुकरण करण्याचा मोह तत्कालीन विचारी लोकाना होणें अर्थातच अपरिहार्य होते. मराठींतील कोणताहि आधुनिक लेखनप्रकार पाहिला तर त्याजवरील परोपजीवित्वाची जी एक छाप आहे ती दृष्टिआड करून चालणार नाहीं. या परोपजीवित्वाच्या निरनिराळ्या छटा आहेत हे मात्र नीट दक्षतेनें ध्यानात घेतलें पाहिजे. दुसऱ्याचें सर्वस्वीं अंधानुकरण करण्यापासून तो केवळ स्फूर्ति घेण्यापुरताच दुसऱ्याच्या कृतीचा आधार घेणें येथपर्यंत या छटा सामावलेल्या आहेत. मराठींतील निबंधवाङ्मयाच्या वाढीलाहि हाच न्याय लागू पडतो. त्यामुळें परोपजीवित्व या शब्दानें कुणी

बिचकून जावयास नको. फरक आहे तो हें परोपजीवित्व केवळ लाचारीनें पत्करलें आहे कीं, स्वत्व आणि स्वानुभव यांचें पाणी देऊन मूळचा नमुना अधिक आकर्षक आणि आपलाच आहे असें भासविण्याइतक्या चातुर्यानें स्वीकारलें आहे हें जाणून घेण्याचा आहे.

इंग्रजी किंवा इतर पाश्चात्य वाङ्मयांत शतकाशतकातून जी निबंध-लेखकाची निपज झाली त्याचे नमुने पाहूनच आमच्याइकडील निबंध-लेखनाची सजावट करण्यांत आली. इंग्रजी राजवट सुरू होण्यापूर्वी कोणत्याहि देशी भाषेंत त्रुटित निबंध लिहून लोकजागृतीचें व लोकरंजनाचें कार्य झाल्याचे आढळत नाहीं, तोंपर्यंत मराठी गद्यलेखनाचे प्रकार फारसे प्रचारांत नव्हते. बखरी किंवा ऐतिहासिक कागदपत्रें हीं घडलेले इतिहास वर्णन करण्याचीं सामान्य साधने होतीं. पण प्रगल्भ आणि प्रगतिपर विचाराना वाट करून देऊन लालित्यपूर्ण भाषेनें जागृति व रंजन करण्यासाठीं वाङ्मय लिहावे ही शिस्त इंग्रजी राजवटींतच निर्माण झाली व विकास पावली. अर्थात् हा राज्यकर्त्यांच्या सहवासाचा एक सामान्य परिणाम मानला पाहिजे. इंग्रजाचे ज्ञानभांडार आणि विचाराचें वैभव पाहून दिपलेल्या पहिल्या पिढींतील लेखकानीं जें लेखन केले ते सर्वस्वीं तर्जुमा करण्याच्या बुद्धीने. स्वतःच्या व स्वकीयांच्या अज्ञानानें ते अगदीं ओशाळून गेले होते. त्याचबरोबर परकीयाच्या झगझगीत ज्ञानप्रभावानें ते दिपूनहि गेले होते. अशा स्थितींत लेखनाच्या बाल्यावस्थेंत त्या लोकानीं आपल्या धूळपाटीवर दुसऱ्यांनीं सांगितलेलीं सारीं अक्षरें आज्ञाधारकपणाने व ज्ञानप्राप्तीच्या बालिश आनंदानें जशीं उमटलीं तशीं उमटविलीं असल्यास आश्चर्य मानावयास नको. मुद्रणकलेचा सुलभ आश्रय हेहि या लेखननिर्मितीचें एक आवश्यक आकर्षण होतें. ठिकठिकाणीं छापखाने निघाले. वृत्तपत्रें जन्मास आलीं. त्याचे रकाने भरून काढताना काहीं तरी बोधपर लिहावें असें उत्तेजन लेखकांना मिळणें अगदीं स्वाभाविक होतें. खिस्ती धर्मप्रचारकानीं जशा शिक्षणाच्या शाळा घातल्या तशाच त्यांनीं नीतिपर आणि सदाचरणप्रवण धर्मभावना लेखन-भाषणद्वारां शिकविण्यासाठीं संस्था स्थापन केल्या. त्यांच्याद्वारें अनेक देशी-परदेशी व्यक्तींचें लेखन प्रकाशित होऊं लागलें. मात्र हें लेखन परकी धर्मप्रचारकाचें असो किंवा आमच्याकडील साक्षर लेखकाचें असो, त्यांत

निर्भेळपणानें बोधपर विषय उपदेशकाच्या भूमिकेनें मांडून दाखविण्याची ईर्ष्या प्रत्येकानें व्यक्त केलेली दिसते. विद्या संपादन करा, आळस नाहींसा करा, आपसातील वैरभाव विसरण्यास शिका, व्यसनांच्या आधीन होऊं नका, देशपर्यटनाचें महत्त्व शिका, सत्य व सदाचार अंगीं बाणवून घ्या असलीं ठसठशीत, तात्पर्ये वाचकाच्या मनावर पूर्णपणें बिंबलीं पाहिजेत असा लिहिलेल्या प्रत्येक अक्षराचा आग्रह दिसतो. बिघडलेल्या प्रकृतीला जसें औषध द्यावयाचे व तेंहि त्याचें गुणकारित्व पटवून देऊन, त्याप्रमाणें नादान म्हणून मानल्या गेलेल्या समाजाला विवेकपुष्ट बनविण्यासाठीं हे बोधामृताचे घुटके एकसारखे देण्याचा उपक्रम करण्यात आला. भाषा केवळ वापरली ती वाङ्मय म्हणून नव्हे तर विचारवाहनाचें एक मामुली साधन म्हणूनच होय.

मराठी भाषेतील पहिले निबंध खिस्ती धर्मप्रचारकानींच लिहिले. मिसेस् फीरार या लेखिकेनें १८३५ साली नाशिक येथे 'कुटुंबप्रवर्तननीति' हा निबंध प्रसिद्ध केला. "आपल्या स्वभावाला जो जिंकील तो दुर्ग जिंकणारापेक्षा श्रेष्ठ होय," हे त्यातील तात्पर्यात्मक वाक्य पाहिले म्हणजे त्या वेळची बोधप्रधान प्रवृत्ति ध्यानात यावयास अडचण पडणार नाहीं. हीच कल्पना आजचे फडके काणेकर सांगतात. पण त्या सांगण्यात जाणूनबुजून पढविण्याचा, शिकविण्याचा हेतु नाहीं. शिवाय वाचक अगदीं असमंजस, अडाणी आहे अशी भूमिका त्या वेळीं लेखक ग्राम्य मानीत. तर आजचे लेखक आपले वाचक रसिक, चाणाक्ष आणि भावनाशील असून आपल्या लिहिण्यातील अर्थ मर्मज्ञपणाने उकलून घेण्याइतके शहाणे आहेत असे मनापासून मानतात. 'मातृबोध', 'मुलास वागविण्याची रीति', 'दारूपासून अनर्थ', 'आळशी आणि दिवाळखोर यास उपदेश', 'सत्यनिरूपण', 'परोपकार', आमचें कर्तव्यकर्म कोणतें', 'मुंबईतील सुशिक्षित तरुण हिंदु लोक', 'लावल व नाटक याविषयीं निबंध', 'शिक्षालाभ', 'सृष्टीच्या सौंदर्याविषयीं निबंध', 'क्रियेवाचून ज्ञान पंगु', 'उद्योग', 'पुरुषार्थ', 'लिहिण्याची शैली' इत्यादि अनेक विषयावरील विविध निबंध त्या काळात लिहिले गेले. बाळशास्त्री जांभेकर, भाऊ महाजन, रामकृष्ण विश्वनाथ, भवानी विश्वनाथ कानविंदे, का. बा. मराठे, कृष्णशास्त्री चिपळूणकर, इत्यादि तत्कालीन प्रसिद्ध पंडितानीं जमल्या विषयावर आपल्यापरी उद्-

बोधक निबंधलेखन केलें. दर्पण, दिग्दर्शन, प्रभाकर, पुणें पाठशालापत्रक, चंद्रिका, दंभहारक, ज्ञानसंग्रह इत्यादि नियतकालिकांनीं या निबंधलेखनाला प्रसिद्धि दिली. सांगितलेली विद्या आणि दिलेली शिदोरी या पद्धतीवर हें सारें लेखन झालें. त्यात आत्मीयता, स्वतःच्या मनाशीं मतें पक्कीं करून घेण्याची प्रवृत्ति, आपली बुद्धि विशेष प्रखरपणें व्यक्त करण्याची लालसा, स्वतःच्या सामाजिक सृष्टीशी समरस होण्याची भावनाशीलता, वाङ्मयीन आनंद उत्पन्न करण्याची एकतानता, लेखनशैलीचा प्रामादिकपणा आणि मांडणीचें लालित्य अंगीं जडवून घेण्याची परिश्रमशीलता इत्यादि कोणतेच गुण त्यात दिसत नाहींत. पण पुढें विस्तीर्ण जलाशयामुळें आणि तीरावरच्या प्रतिबिंबित होणाऱ्या गहिऱ्या सृष्टीनें शोभिवत होणारी सरिता उगमापाशीं करंगळीएवढ्या धारेची असावी व खडकाळ परिसराला फारसा ओलावा देणारी नसावी यात आश्चर्य कसलें ?

या सर्वात उल्लेखनीय प्रयत्न म्हटले म्हणजे सरदार गोपाळराव हरि देशमुख ऊर्फ लोकहितवादी यांचे होत. सुमारे शंभर वर्षांपूर्वीच या गृहस्थाना एकंदर देशपरिस्थितीची जाणीव झाली होती हाच यांचा विशेष होय. त्यांच्या लिहिण्यात परकीयाचा जयजयकार आणि स्वकीयाचा धिक्कार मोठ्या प्रमाणात व्यक्त झाला असला तरी तळमळ आणि ज्ञानपिपासा या दोन गुणामुळें त्यांच्या लेखनाचें आजहि महत्त्व वाटते. 'शिमग्याचा दुराचार', 'शाक्तमार्ग', 'मानास व दानास पात्र', 'नशिबावर हवाला' इत्यादि काहीं लेख मतप्रचार किंवा नवविचारप्रदर्शन करण्यासाठीं जरी जाणूनबुजून लिहिले असले तरी त्यातील लेखनशैली अभिजात व मार्मिक आहे. प्रसंगविशेषीं त्यांच्या लेखणीला आस्थेवाईकपणाच्या अतिरिक्त धारेनें असे काहीं तज चढत कीं, तींतून व्यक्तिगत उत्कट भावना आणि भारदस्त व सुसंकृत अंतःकरणाच्या संपन्न संवेदना अगदीं साहजिकपणें स्रवू लागतात. स्वकीयाच्या उद्धाराची त्यांची तळमळ त्यांच्या रक्तात इतकी भिनल्यासारखी वाटते कीं, एखाद्या आजच्या लघुनिबंधलेखकाच्या तदेकपरतेशीं ते सहज स्पर्धा करूं शकतील. पण त्यांच्या वेळीं वाङ्मयलेखन ही कला असण्यापेक्षा ज्ञानप्रसाराचें एक साधन होतें. आणि त्यांच्या वेळीं त्यांच्यासमोर जे पाश्चात्य नमुने होते त्यातहि कलारम्यतेसाठीं लेखन करण्याची प्रवृत्ति त्या मानानें कमी होती हें कबूल केलें पाहिजे.

शिवाय ज्यांच्यासाठीं लिहावयाचें त्या लोकाची साक्षरता व्यावहारिक आणि कामचलाऊ होती. आजच्यासारखी ती नित्य नव्या हौसे-मौजेनें नटणारी आणि मुरडणारी नव्हती. आधीं जिणें जगण्यासाठीं आहे हें पटवून देऊन मग जगावें कसे हे सागावे लागले. नव्या युगात नवीन विचार आत्मसात् करून कणखरपणाने व डोळसपणानें जगण्यास शिका हे सागण्यात व पटवून देण्यात लोकहितवादी व चिपळूणकर यांच्या पिढ्या खर्चीं पडल्या. वाङ्मय-कलेचा विकास साधण्यापेक्षा वाङ्मयाची कला बीजरूपाने अस्तित्वात आणण्याची कामगिरी त्या काळांत घडावयाची होती. म्हणून अडाणी माणसाला शिकवावें तसें त्या वेळचे म्हणजे १८४० पासून १८७५ पर्यंतचे सारें निबध-लेखन उपदेशप्रधान झाले असल्यास नवल नाहीं. गोविंद नारायण माडगावकर, बाबा पदमनजी, कृष्णशास्त्री चिपळूणकर, विश्वनाथ नारायण मडलिक, विष्णुबुवा ब्रह्मचारी याचेहि या संबधात उल्लेख केले पाहिजेत. इग्रजी राजवटींतील पहिल्या पिढीचे हे मानकरी आहेत. त्याचे लेखन आज जुनाट आणि तात्पर्यवादात्मक वाटत असले तरी त्याच्या काळात याच लेखनानें नव्यानवतीचा दिमाख मिरविला होता, हे विसरून चालणार नाहीं.

पण १८७४ साली विष्णुशास्त्री चिपळूणकर यानीं सुरू केलेल्या निबध-मालेने मोठे मन्वंतर घडून आले. तो काळपर्यंत मतप्रतिपादनाचा अभिनिवेश, विचाराचा ओजस्वी आवेश, भाषेतील सुपदन्यासाचा अर्थव्यजक गौरव, शैलीची तेजस्वी आढ्यता, बहुश्रुतपणाचा डौलदार दिमाख, रुचिर आणि समर्पक अवतरणाचे व दृष्टान्तार्चे मनोहारित्व, सरस शब्दसपत्तीने विषयाची प्रतिमा सचेतन व साकार करण्याचें सामर्थ्य या कोणत्याहि संस्मरणीय लेखन-शैलीला अत्यावश्यक असलेल्या गुणविशेषाचा आढळ झाला नव्हता, तो प्रथम विष्णुशास्त्री यानीं मोठ्या हिरीरीनें आणि पराक्रमी बाण्यानें केला. आमच्यात काहींच चागलें नाहीं असे मानून कर्तव्यमूढ आणि विचारमूढ बनलेल्या पहिल्या पिढीतील लेखकाची अंधानुकरणप्रियता, क्षुद्र आणि उपेक्षणीय विचाराच्या मागें धावण्याची बालिश वृत्ति, दृष्टिकोनाचा आकुंचितपणा, भाषेचे आणि विचाराचें दारिद्र्य या साऱ्या अवगुणावर चिपळूणकरानीं विलक्षण वेगानें मात केली. क्रमिक पुस्तकातील धड्यातून वापरण्याइतपतच ज्या भाषेंत सामर्थ्य आहे असे वाटत होते तींत चिपळूणकरानीं नाना

शास्त्राची, नाना विचाराची आणि साऱ्या नव्या-जुन्या तत्त्वज्ञानाची आवेशपूर्ण भरारी आक्रमण्याचें तेज निर्माण केलें.' कोणत्याहि विषयावर झेप घेऊन तो सर्वस्वीं आपलासा करण्याइतकी मराठी भाषा समृद्ध आणि समावेशक आहे हें चिपळूणकरांनीं आपल्या लेखनानें प्रत्यक्ष पटवून दिलें. या बाबतींत त्याची पूर्वजप्रीति एक प्रकारें उपकारक ठरली. ज्ञानेश्वरापासून बखरकारापर्यंत सुमारें सहाशें वर्षें जी भाषा अनेक आक्रमणाना आणि परिवर्तनाना पुरून उरली ती इंग्रजी राजवटीच्या पहिल्या प्रकाशात एकदम थिजून गेल्यासारखी झाली. स्वदेश, स्वधर्म व स्वभाषा ही चिपळूणकरांनीं निर्माण केलेली आधुनिक स्वातंत्र्यवादाची प्रस्थानत्रयी वाङ्मयाच्या विकासाला सर्वस्वीं उपकारक ठरली. भरीला स्वतः चिपळूणकर पौरस्त्य व पाश्चात्य अशा दोन्ही ज्ञान-शाखाशीं परिचित होते. पौरस्त्याची तार्तिक कीस पाडण्याची पृथक्करण-प्रियता आणि पाश्चात्याची सहृदयपणे दुसऱ्याच्या भूमिकेशीं तादात्म्य पावून मार्मिक रसग्रहण करण्याची तरेल संवेदनाक्षमता याचा सुदर सगम चिपळूण-कराना साधता आला. त्याचे कविपचक एवढ्याच्र कारणामुळे वाङ्मयात सस्मरणीय होऊन राहिलें. मेकॉले, जॉन्सन आणि ॲडिसन् याच्या वाङ्म-यातील अनेक गुणविशेष चिपळूणकरानीं चाणाक्षपणे आत्मसात् केले. मेकॉ-लेची भाषेची साफसफाई, जॉन्सनचें पाडित्यप्रदर्शन आणि ॲडिसन्‌चा परि-हासगर्भ बहुश्रुतपणा या गुणाचा चिपळूणकरानीं समन्वय केला. जोडीला मेकॉलेचा एककल्लीपणा, जॉन्सन्‌चा तऱ्हेवाईकपणा आणि ॲडिसन्‌चा खोच-दार उपरोधिकपणा हे दोषहि त्यानीं उचलल्याचा भास होतो. चिपळूणकरानी लिहिले ते सारेच जबरदस्त आणि जड विषयावर लिहिलें. देशाभिमान, धर्म-परायणता आणि भाषेवरील प्रेम या स्वकीय गोष्टींचा आधार ज्याला नाहीं असें चिपळूणकराचे लेखन नाहीं.

असें असूनहि त्याच्या कित्येक दीर्घ निबधातलि काहीं भाग आजच्या लघुनिबंधातील सहज आणि उत्स्फूर्त विचाराच्या साहजिक आणि प्रसन्न प्रवाहासारखे लालित्यपूर्ण आणि टवटवीत वाटतात. 'लोकभ्रम', 'अपशकुन', 'अनुकरण' असल्या विषयावर लिहिताना त्यांची लेखणी स्वैरपणानें नाचत-बागडत असल्याचा भास होतो. किंबहुना हे असले उत्स्फूर्त विचार लिहि-ण्याचा आगाऊ मानस नव्हता, पण ओघाला आल्यावर ते नकळत कागदा-

वर उमटले असा जो रम्य भास चिपळूणकरांच्या निबंधमालेतील कित्येक मुद्द्याच्या माडणीसंबंधात वाचकाला होतो, त्यांतच आजच्या लघुनिबंधाची सूक्ष्म बीजें दडलेलीं आहेत. चिपळूणकरात रससिद्धता आहे, विचारपक्वता आहे, उपरोधप्रियता आहे, कलाविलासाचें चातुर्य आहे, भाषेचा प्रसाद आहे, विनोदाची बारीक किनार त्याच्या सर्वच वाङ्मयपटाला शोभादायक झाली आहे. त्याच्या लिहिण्यात तर्ककर्कशता आहे, विवेककुशलता आहे; लेखणीचें खड्ग करून प्रतिपक्षाला घायाळ करण्याचा झुजारपणा आहे; लेखणीचें सुस्वर वाद्य बनवून त्यातून ' आमच्या देशाची स्थिति ' या पालुपदानें करुणरम्य झालेलें आर्त आणि उत्कट गीत उमटवण्याचें सामर्थ्य आहे; कथनकुशलतेचा गोडवा आहे, आत्मप्रतिष्ठेची झोकदार ऐट आहे; वाचकाशीं सलगी करून त्याला लीलेनें विश्वासात घेण्याचें वाक्पाटव आहे ! उत्कृष्ट निबधलेखकाचेच नव्हे तर कोणत्याहि वाङ्मयप्रकाराला शोभादायक ठरणारे गुण त्याच्या ठिकाणीं एकवटलेले होते म्हणूनच त्याच्या पुढल्या पिढीतील निरनिराळ्या शाखातील अग्रेसर लेखकानीं त्याना आपले स्फूर्तिदाते गुरु मानले. आगरकर-टिळकांनीं वृत्तपत्रीय लेखन केलें, तरीहि आगरकराच्या ' वल्लभोपासना ', ' समजत नाहीं ते हे ', ' शनिदेव ऊर्फ साडेसातीचा देव ' या लेखाना लघुनिबंधांचा रग चढला आहे. हरिभाऊ आपट्याचा ' खंडाळ्याच्या घाटात ', वि. मो. महाजनी याचा ' सृष्टिसुंदरीची दिवाळी ', शि. म. पराजप्याचे ' भासाची भवितव्यता ', ' नवी सृष्टि ', ' सूर्याच्या गैरसोयी ', ' धनुर्धारींचे त्रुटित लेख ', ना. गो. चापेकराच्या ' गच्चीवरील गप्पा ' कृ. ना. आठल्यांचे ' केरळ कोकिळा ' तील, वि. को. ओकाचे ' बालबोध ' मासिकातील आणि रा. भि. जोशी याचे ' निबंधचंद्रिके ' तील लेख इत्यादि साहित्य बरवर पाहाणारालाहि लघुनिबंधाच्या प्रसूतिवेदनाचा सूक्ष्म ध्वनि ऐकूं आल्याशिवाय राहाणार नाहीं. या साऱ्याच्या लेखनात कमीअधिक प्रमाणात कल्पनाविलास, भावनेची धग आणि अंतःकरण शक्यतोंवर निर्मळपणें व निर्भेळपणें व्यक्त करण्याची कसोशी हे गुण दिसतात. पण हें सारें लेखन एक विशिष्ट वाङ्मयप्रकार बुद्धिपुरस्सर सजवावा म्हणून झालें नाहीं. मुख्य इमारत बाधून उरलेल्या राड्यारोड्यांतून एकादें तात्पुरतें झोपडें उभारावें त्याप्रमाणें आपलें इतर

लेखन मनःपूत आणि मनसोक्त झाल्यावर उरलेले विचार कुठें तरी पेरून देण्यासाठीं हें लेखन झालें असल्याचा भास होतो. आजच्या लघुनिबंधाच्या कलात्मक रचनेला हे असलें औदासीन्य व ही असली अनास्था अर्थातच बावडी आहे. त्याचप्रमाणें केवळ विशिष्ट मतप्रचार करण्यासाठीं माध्यम म्हणून निबंधप्रकार जरी वापरला तरी त्याला आजच्या लघुनिबंधातील सलगीच्या स्नेहबुद्धीने आणि सौहार्दाने संभाषण करण्याच्या हातोटीची नाजूक जादू साध्य झाली असे म्हणता येणार नाहीं. तरीहि आजच्या चालू जमान्यातील लघुनिबंधलेखनाच्या कलेवर ज्याचा परिणाम झाला असे तीन लेखक प्रामुख्यानें उल्लेखिले पाहिजेत. याच्या कर्तबगारीचा ऐन उत्कर्ष जरी पंचवीस वर्षांपूर्वी झाला असला तरी त्याच्या लेखनापासून कळत न कळत स्फूर्ति घेऊन नवीन वाङ्मयरचना करणारी आजची पिढी आहे हें विसरून चालणार नाहीं. हे तीन लेखक म्हणजे न. चिं. केळकर, अ. ब. कोल्हटकर व गडकरी होत. जुन्या काळातील मतप्रचाराला कलेचें कोंदण ढगदारपणें बसविण्यात या तिन्ही लेखकानीं बरेच मोठे यश संपादन केले आहे. केळकर व कोल्हटकर हे दोघेहि वृत्तपत्रकार. केळकराची वृत्ति कोणतीहि गोष्ट सजवून सागावी आणि सुबक रीतीने माडून दाखवावी अशी आहे. केसरीच्या अग्रलेखापासून विलायतच्या पत्रापर्यंत कोणताहि वृत्तपत्रीय भाग असो; त्याची माडणी शक्यतोवर रुक्ष होऊ नये, उलट ती सरस, रमणीय आणि आकर्षक व्हावी म्हणून भाषेपासून विचारापर्यंत डौलदारपणा, रेखीवपणा आणि चटकदारपणा यावा अशी केळकर दक्षता वाहातात. शिवाय त्याना वाङ्मयातील अनेक प्रकाराना हात घालून ते सजविण्याची स्वाभाविक हौस आहे. भरीला त्याची नित्य नव्या गोष्टींबद्दलची आवड ताजी आणि टवटवीत असते. त्याचा 'सिमल्याचे वर्णन' एवढा एक जरी लेख घेतला तरी त्यात कल्पकता, पदलालित्य, अलकाराची समर्पकता आणि माडणीच चातुर्य इत्यादि गुण स्पष्टपणानें दिसतात. केळकरानीं सतत चार तपें लिहिण्याचा उद्योग केला, तोहि शिळेपणाने नव्हे तर नवीन कालाच्या वेगाशीं शक्यतोंवर अनुसंधान राखून. त्यामुळें आजच्या काळात म्हणजे गेल्या दहा-पाच वर्षांच्या अवधींत त्यानीं जें लेखन कल त्यात लघुनिबध हाहि वाङ्मयप्रकार त्यानीं बऱ्याच यशस्वीपणें हाताळला. आपल्या पिढींतील इतर लेखकापेक्षा केळकरानीं

वाङ्मयरचनेबद्दलचा एक वेगळा दृष्टिकोन बाळगला. वाङ्मयलेखनाचा हेतु कलाविलास असावा असें त्यांचे प्रतिपादन आणि वाङ्मयविषयक आचरण आहे. ह. ना. आपटे, शि. म. परांजपे, राजवाडे, केतकर इत्यादि त्यांच्या पिढींतील लेखकांनीं कलेचा उपयोग उद्बोधन, जागृति व मतप्रचार यांसाठीं प्रामुख्यानें केला हें दृष्टिआड करून चालणार नाहीं. त्यांचे सहकारी खाडिलकर आणि स्नेही श्री. कृ. कोल्हटकर यांच्यातहि सौंदर्यलोलुप आनदवाद नाहीं असे नाही. पण एकाचा तत्त्वनिष्ठ राष्ट्रवाद आणि दुसऱ्याचा सुधारणाप्रिय रूढिविच्छेद या प्राणभूत मनोधर्मांनीं त्याच्या लेखनापासून निर्माण होणारा आनंद हा अगदीं वेगळ्या स्वरूपाचा भासतो. केळकराची आनदवादी भूमिका ही निर्भेळ वाङ्मयीन स्वरूपाची असून त्यांनीं प्रत्यक्ष लिहिलेल्या वाङ्मयानें असाच निर्हेतुक आनंद उत्पन्न केला आहे. एकादी आरास ठाकठिकीने सजविण्याने जो प्रसन्न आनद निर्माण होतो तोच वाङ्मयरचनेने व्हावा हे या नवीन हेतूचें एक मुख्य सूत्र केळकरापासून नव्या पिढीनें आत्मसात् केलें. ‘ पालापाचोळा ’ या नावाने केळकरांनीं लघुनिबंधसंग्रहहि प्रकाशित केला आहे.

अ. ब. कोल्हटकर याच्या विद्युद्वेगी लिहिण्यात कल्पकतेपासून भावनेच्या आर्ततेपर्यंत कोणता धर्म प्रकट झाला नाहीं असाच प्रश्न विचारावा लागेल. अच्युतरावांनीं आपले लिखाण मुख्यतः मतप्रचारासाठीच केलें. पण त्यांतल्या मतप्रचारापेक्षाहि लेखनशैलीचा जिवतपणा, अंतःकरणाची असामान्य कालवाकालव, कल्पकतेच्या भरारीचा तेजस्वी आवेश आणि विषयाचा मांड चटकदार करण्याची मोहक ऐट या गुणाचा आविष्कार त्याच्या लेखनात विशेष प्रभावीपणाने झाला असल्याचे आढळून येते. अवखळपणा, वात्यपणा, परिहासप्रियता, प्राजलपणा, मार्दव, आत्मनिष्ठा, तादात्म्य इत्यादि विरोधी मनोधर्मांची त्यांच्या लेखनात गर्दी उडून गेलेली दिसते. टांगेवाल्यानीं, हॉटेलवाल्यानीं आणि तांबोळ्यांनीं वाचण्यासारख्या क्षुद्र विषयालाहि अच्युतरावाच्या कल्पकतेचा स्पर्श झाला कीं, त्यात एक प्रकारची आकर्षकता आणि खमगपणा हीं निर्माण होत. पूर्वींच्या लेखकाच्या लेखनातील सारा प्रौढ भारदस्तपणा सोडून देऊन अच्युतरावानीं त्यात उच्छृंखल बालकाचा अवखळपणा आणला. अच्युतराव विद्वान् होते तसे रसिकहि होते. त्याच्या सहानु-

भूतीचें क्षेत्र जसें विशाल होतें तसेंच त्याच्या बोचक उपरोधानें आणि वाह्यात् उपहासाचें क्षेत्रहि विस्तृत होतें. त्याचे हे मनोधर्म कोणत्या व्यक्तीला किती तीव्रतेनें आणि तरलतेनें स्पर्श करतील याचा केव्हाहि भरवंध नसे. ' शेवटची वेल सुकली ', ' माधवाश्रमात शिवाजी ', ' बोबाबोब ', ' सगळेंच मुसळ केरात ', ' डोहाळजेवणाची धादल ', ' मानवा तूं कोण आहेस ', ' तुम्ही पुरुष कीं बायका ', ' हजामती का करता ', ' प्राणनाथ, काय आज्ञा आहे ', ' न कर्त्याचा वार शनिवार ', ' मोतीचुराचे लाडू ' इत्यादि त्याचें वृत्तपत्रीय लेखन नुसत्या मथळ्यामुळेहि आकर्षक ठरलें. त्यातील भाषा, मांडणी अलंकाराची पैदास हीं सारीं एखाद्या लघुनिबंधाला साजेशीं आहेत. डबींत लहान डबी, तिच्यात त्याहून लहान डबी अशी जादू करून एखाद्याला आत काय आहे तें शोधण्यास सांगावें आणि प्रयासपूर्वक त्यानें तें सारें उलगडल्यावर आत एकादी पेपरमिंटची वडी निघावी तसें अच्युतरावाचें लेखन आहे. भाषेचा पसारा जितका विस्तृत तितकाच आकर्षक. एकादीच कल्पना निरनिराळ्या शब्दांनीं पिंजण्याचें त्याचें कौशल तर विलक्षण होतें. उपमा, उत्प्रेक्षा केळकरांसारख्या व्यावहारिक असल्या तरी केळकरांचा व्यवहार प्रतिष्ठित समाजातला तर अच्युतरावाचा व्यवहार श्रमजीवि धंदेवाल्यापर्यंत पोंचलेला. शिवाय केळकरांची अभिरुचि सात्त्विक तर अच्युतरावाची आर्ष ! अच्युतरावांनीं कोणताहि विषय वाङ्मयीन स्वरूपाला लायक असल्याची ग्वाही दिली. मुद्देसूद, प्रतिष्ठित, सभ्य आणि तर्कशुद्ध बुद्धिप्रधान मांडणीला सक्षेप देऊन गैरलागू पण आकर्षक अर्वाच्य पण मनोरंजक, असभ्य पण आवश्यक, विकारवश पण भावनाप्रधान असली मांडणी त्यांनीं फुलवून दाखविली. शिवरामपंत परांजपे किंवा सावरकर हेहि काव्यमय आणि भावनाप्रधान लिहितात, पण त्यात व्यास–वाल्मिकींसारख्या कवींचें गांभीर्य आणि शुचिर्भूत तपस्तेज असतें. अच्युतरावाच्या लिहिण्यात लावणीकाराचा अवखळ ढंग, सोंगाड्याचा चलाख हजरजबाबीपणा आणि खेडवळाच्या मस्तवाल रंगेलपणाचा कैफ आहे. अच्युतरावातील दोष वर्ज्य करून गेल्या तीस वर्षांतील मराठी लेखकांनीं त्याची कल्पकता, रंजकता, लालित्य आणि आवेशपूर्ण भावनात्मकता या गुणाचे वस्तुपाठ गिरविले. आजच्या लघुनिबंधाच्या सौंदर्यप्रधान मांडणीशीं अच्युतरावाचें फार जवळचें नातें आहे.

गेल्या पंचवीस-तीस वर्षांतील लेखकावर विशेष प्रमाणांत जर कोणी स्वामित्व गाजविलें असेल तर ते गडकऱ्यानींच होय. गडकऱ्यानीं निबंध-लेखन प्रायः केलेच नाहीं. बाळकराम ही विनोदी लेखमाला कांहीं आजच्या निबंधलेखकाना नमुनेदार वाटावी अशी नाहीं. पण गडकऱ्याचें खरे तेज प्रकट झाले ते त्यांच्या नाटकातील स्वगतांतून. त्याच्या नाटकातील पात्रांची मोटमोठीं आत्मगत भाषणे हीं खाडिलकर किंवा इतर नाटककार याच्या नाटकातील स्वगताहून अगदी वेगळ्या स्वरूपाचीं आहेत. इतर नाटकका-राच्या नाटकातील स्वगते हीं कथावस्तूच्या किंवा स्वभावविश्लेषणाच्या विका-साला पोषक आणि साहाय्यक ठरणारीं आहेत. उलट गडकऱ्याच्या ‘ एकच प्याला ’तील सुधाकराचे दारूच्या पेल्यावरील भाषण किंवा पुण्यप्रभावातील भूपाल-वसुधरा याच्या प्रवेशातील सृष्टिवर्णनात्मक सुंदर आत्मगत भाषण हीं केवळ काव्यात्म, कल्पकतापूर्ण आणि भावप्रकटीकरणात्मक अशीं आहेत. नाटककाराला कादंबरीकाराप्रमाणे पात्राचीं मनोगते आपण होऊन वर्णन करता येत नाहीत. त्याचीं पात्रें जें काही बोलतील, जे काहीं हावभाव कर-तील आणि जीं काहीं संभाषणे परस्पराशीं करतील त्यातूनच कथानकाच्या प्रगतीचा प्रवाह आणि स्वभावरचनेच्या प्राणभूत खाणाखुणा व्यक्त होतात. नाटक संसाराचे चित्र आहे हे या अर्थाने अगदीं खरे आहे. व्यवहारांत माणसें फक्त एकमेकाशीं बोलतात. त्या बोलण्यातून आणि नित्यनैमित्तिक अभिनयातून जो काहीं अर्थ निघेल तोच काय तो व्यक्तीच्या स्वभावाला लागू पडतो आणि त्यावरूनच अमुक एक व्यक्ति अशी आहे याचा पड-ताळा पटतो. रसिकता, रंगेलपणा, रूक्षपणा, तार्किकपणा, मुत्सद्दीपणा व्याव-हारिकपणा, दुबळेपणा, चलाखपणा इत्यादि माणसाचे अनेक गुण बोलण्या-चालण्यावरूनच उघड होतात. इतरानीं कुणी या गुणाची शहानिशा आणि मामासा पावलोपावलीं करण्याची व्यवहारात गरज उरत नाहीं. गडकऱ्यानीं व्यवहारातला हा नाट्यगुण बरोबर पारखला होता. त्याच्या नाटकातील पात्रे नाट्यरचनेच्या दृष्टीनें जरी स्वैर आणि विसंगत भाषणे करणारी असलीं तरी त्याच्या भाषणातून त्या त्या व्यक्तींच्या स्वयंपूर्ण स्वभावाचे धागेदोरे स्पष्ट आणि रेखीव स्वरूपात उलगडून मिळतात. त्याचप्रमाणे व्यवहारातसुद्धा माणसाचें मन अनेक भावनाचें व विषयाचें चिंतन न कळत करीत असतें.

हें चिंतन किंवा स्वप्नरंजन त्याच्या व्यवहाराला नेहमींच आवश्यक असतें असें नाहीं. गडकऱ्यांच्या नाटकातील पात्रानीं ही वास्तविक पण सुप्त मनोरचना फार सुंदर रीतीने प्रकट केली आहे. या प्रकटीकरणांत गडकऱ्यांच्या लेखणीचे सारे धर्म मोठ्या तडफेनें व्यक्त झालेले आहेत. सुधाकर, सिंधु, वसुंधरा, भूपाल, जयंत, लीला, मालती, मनोहर, प्रभाकर, लतिका या त्याच्या पात्रानीं रंगभूमीवर आपल्या मनातील शेंकडों मनोगते विश्वासाने आणि सलगीने बोलून दाखविलीं आहेत. असलीं स्वगतें नाटकाला कितपत आवश्यक आहेत, हा प्रश्न बाजूला ठेवला तर एक गोष्ट मात्र स्पष्टपणाने मान्य केली पाहिजे, आणि ती ही कीं, गडकऱ्याच्या पात्रानीं आत्मगत आणि भावपर लघुनिबंधाच्या वाढीला नकळत साहाय्य केलें. भावनेची धग पूर्णपणे कायम टिकवील अशी भाषा, मनोगताला सर्वस्वीं गवसणी घालील अशी अलंकाराची सौंदर्यप्रधान रचना, अंतःकरणाचे हर्षखेदादि विकारांचे कढ लयबद्ध स्वरूपांत व्यक्त करणारी वक्तृत्वपूर्ण वाक्यरचना, बोलल्याशिवाय राहावत नाहीं असा भास उत्पन्न करणारी हृदयाची कळकळ, स्वतःच्या अनुभवाच्या तादात्म्याने समाधिसुखांत तल्लीन होण्याची उत्कटता, झगझगीत प्रसंग–घटनाच्या गुतागुंतींत सापडलेल्या चित्तवृत्तींची तरल संवेदनाक्षमता, जीवन जगल्याचा साक्षात्कार भासवून देणाऱ्या आत्मप्रचीतीचा मधुर आक्रोश, संकेताचीं सारी कुंपणें तुडवून जाण्याची वेगवान् भरारी आणि स्वतःच्या भावनाची व संवेदनाची भरगच्च जाणीव व्यक्त करण्याची दुर्दमनीय लालसा हे गुण मराठी वाङ्मयात-गडकरी घराण्याने वाढीस लावले. नदीचें पाणी पिणाऱ्या व्यक्तीला तिच्या पाण्यात कोणकोणतीं द्रव्ये कसकशीं मिसळलीं आहेत हें माहीत नसलें तरी त्या द्रव्याचा त्या व्यक्तीच्या शरीरपोषणावर जसा परिणाम होतो तसा गडकरी वाङ्मयाचा आजच्या सर्वच लेखकावर कळत न कळत पण फार मोठा परिणाम झालेला आहे.

श्री. कृ. कोल्हटकर, बा. ना. देव, पांगारकर, सावरकर, वा. गो. आपटे, बा. मा. आंबेकर, श्री. म. माटे, 'प्रबोधन'कार ठाकरे, ना. के. बेहेरे, माडखोलकर इत्यादि अनेक लेखकानीं गेल्या तीस वर्षांत विविध विषयांवर लेखन केलें आहे. आयुर्मर्यादा व लेखनव्यवसायाचा काल या दोन्ही दृष्टींनीं हे सारे लेखक गेल्या पंचवीस वर्षांच्या कालखंडांत पडतात.

पण या साऱ्याचा मन:पिंड जो घडलेला होता तो वाङ्मयविलासाचा किंवा कलानंदाचा नव्हता आणि नाहीं. लोकाना शहाणे करण्याकरितां आपलें ज्ञान व बहुश्रुतपणा हीं कारणीं लावलीं पाहिजेत असा त्याच्या मनानें कालप्रभावानुसार सूक्ष्म आग्रह बाळगल्याचे दिसते. नीति, न्याय, स्वातन्त्र्य, धर्मप्रेम, अभिरुचि, याजबद्दलच्या त्याच्या कल्पना पाश्चात्य वाङ्मयातील मिल-स्पेन्सर, इमर्सन् याच्या वाचनाने पक्कया आणि स्थिर झालेल्या होत्या. लोकशाहीप्रधान स्वातन्त्र्यलालसा आणि व्यक्तिविकासात्मक उदारमतवाद याचें लोण पाश्चात्य वाङ्मयापासून घेऊन ते आपल्या अज्ञ बाधवापर्यंत पोचविण्याचें ककण बाधलेले हे सारे कलमबहाद्दर होते. बेकन, ॲडिसन्, स्टील, गोल्डस्मिथ्, जॉन्सन्, लॅब, हॅझलिट्, कार्लाइल्, बर्क, स्विफ्ट इत्यादि लेखक चिपळूणकरापासून असहकारितेच्या युगापर्यंत म्हणजे सुमारें पन्नास वर्षें आमच्या इकडील लेखकाच्या परिशीलनाचे, अनुकरणाचे आणि निदिध्यासाचे आराध्यविषय होते. लिहावे तर त्याच्यासारखें. समाजाला त्यानीं जे नव्यानें सागितलें तेंच आपणहि आपल्या समाजाला थोड्याफार फरकानें सागितलें पाहिजे अशी या लेखकांची अट असल्याचे दिसतें. इंग्लडमध्ये १८३२ च्या नवीन मतदानाच्या कायद्यानें मध्यमवर्गीय समाजाला नवे हक्क मिळाले. १८६७ सालीं मजूरवर्गालाहि राजकीय हक्क मिळाले. स्त्रियानाहि मतदानाचे हक्क मिळाले. राजकीय हक्क मिळाले कीं, कोणत्याहि वर्गाचा सामाजिक व नैतिक दर्जा बदलल्याशिवाय राहात नाहीं. त्या वर्गाच्या आचारविचाराना, रूढींना, संकेताना आणि भावनाना शिष्टमान्य स्वरूप मिळून त्यावर प्रतिष्ठेचे शिक्कामोर्तब होते. इंग्लंडात निरनिराळे सामाजिक व राजकीय अधिकारप्राप्तीच्या मार्गानें एका पातळीवर येऊं लागल्याबरोबर विद्येपासून करमणुकीपर्यंतच्या सर्व गोष्टींत क्राति झाली असल्यास आश्चर्य मानण्याचें कारण नाहीं. गेल्या शतकाच्या उत्तरार्धात इंग्लडमध्यें ही जी इंग्लंडपुरती लोकशाहीप्रधान प्रगति होत होती तिकडे साम्राज्यांतील दलित राष्ट्रांनीं आशेनें पहावें हेंहि स्वाभाविक होतें. गाधींच्या असहकारितेच्या चळवळीपर्यंत हिंदुस्थानांतील साऱ्याच विवेकवंत पुढाऱ्याना व लेखकाना इंग्लंडातील प्रगतीची परंपरा

आदर्श व अनुकरणीय वाटत होती. तेथील राजकीय, सामाजिक, औद्योगिक, शैक्षणिक आणि वाङ्मयीन परंपरा ही सर्वस्वी संशयातीत स्वरूपाची असून त्यांच्या अनुकरणानेंच आपणा दलिताचा उद्धार होईल असें मनापासून मानण्याची प्रवृत्ति १९२० पर्यंत आमच्या अंगीं बाणलेली होती. पण मागल्या युद्धानंतर आणि हिंदुस्थानांतील असहकारितेच्या चळवळीनतर इंग्लंडबद्दलची ही श्रद्धा कमी झाली हें एक वाङ्मयरचनेच्या दृष्टिकोनातील फरकाचें मुख्य कारण आहे. चिपळूणकरानीं इंग्रजी विद्येला 'वाघिणीचें दूध' म्हटलें आणि रानड्यानीं इंग्रजाच्या संसर्गाला हितावह परमेश्वरी संकेत म्हणून संबोधलें त्याचें कारण हेंच असावें. पण "Do unto others as you would be done by" ( न तत्परस्य संदध्यात्प्रतिकूलं यदात्मनः ) असली वृत्ति मनुष्यस्वभावात नसते आणि विशेषतः साम्राज्यसंवर्धक राज्यकर्त्यांमध्यें असतेच असें नाहीं याचा पडताळा अनेक उदाहरणांवरून आला. यामुळें पक्क्या आणि स्थिर चाकोऱ्या पाडून लोकशाहीप्रधान ध्येयाकडे मार्गक्रमण करणाऱ्या पहिल्या पिढीनंतरचे किंवा त्या पिढीच्या शिक्षेंत तयार झालेले लेखक व त्यांची विचारपरंपरा हीं मागें पडलीं. आणि चालू पिढींतील गेल्या दहा-वीस वर्षांतील वैचारिक अराजकाचा जन्म झाला. नीति, कला, शिक्षण, आचारविचार या सर्व बाबतींत समाज नव्यानें बंडखोर, असंतुष्ट, व्यर्थवादी, शंकित आणि उदासीन बनावा अशी स्थिति निर्माण झाली. कुटुंबसंस्था, विवाहसंस्था, समाजसंस्था आणि राज्यसस्था या चार खांबावर उभी असलेली समाजाची इमारत डळमळित झाली. कारण या प्रत्येक संस्थेचा बारीकसारीक शाखेंतील हजारों प्रश्नांचा आणि अवशेषाचा अगदीं नव्यानें विचार सुरू झाला.

सहानुभूतीवर आधारलेली सामाजिक उद्धाराची कल्पना आज मागें पडली आहे. दीनदुबळे आणि खालच्या थरांतील श्रमजीवि लोक यांच्यावर भावनाप्रधान मनानें मेहेरबानी करावी या सुधारणाविषयक कल्पनेचें वैय्यर्थ्य लोकाना पटत चाललें आहे. उलट समाजाच्या सर्व थराना सामाजिक असे न्याय्य आणि मूलभूत हक्क आहेत ही कल्पना विशेष प्रबळ होत चालली आहे. न्याय, नीति, धर्मबुद्धि, पातिव्रत्याचा प्रभाव, वैयक्तिक जीवनातील काव्यात्म प्रेमाची प्रेरणा, त्या प्रेमाचें वासनारहित आणि समाजनिरपेक्ष स्वरूप,

इत्यादि अनेक समाजघटनाविषयक आधारभूत प्रमेयात आजच्या विचारसरणीनें क्रांति चालविली आहे. शहरी आणि ग्रामीण जीवनातील परंपरेचे अनेक अवशेष आणि प्रतिष्ठेच्या सांप्रदायिक कल्पना झपाट्यानें मागें पडत आहेत. जातिभेद, राष्ट्रभावना, लग्नसंस्था, गृहस्थधर्म, आतिथ्य, उपचार, कलांची अभिरुचि, जीवनाचा उपभोग घेण्याची पद्धति, कुटुंबव्यवस्था इत्यादि विविध कल्पनासंबंधात परंपरेनें बाधून दिलेले शिस्तीचे तट एकसारखे ढासळत चालले आहेत. वरिष्ठवर्गीयांची भावनामूलक विषण्णता आणि कनिष्ठवर्गीयांची जीवनविषयक अर्थमूलक विषण्णता या आत्मनिष्ठ न राहता सर्व समाजाच्या योगक्षेमाला प्रेरक आणि प्रवर्तक आहेत याची जाणीव एकसारखी वाढत चालली आहे. अशा रीतीनें गेल्या दोन तपांचा काळ विलक्षण क्रांतीचा गेला. सामाजिक जीवन एकसारखें उध्वस्त होत चाललें आहे. त्यामुळें कुठल्याहि थरांतील व्यक्तीच्या जीवनाचे सांप्रदायिक बांध फुटून गेले आहेत. आशा, आकांक्षा, मनोगत आणि कार्यतत्परता या सर्व बाबतींत बहुतेकांच्या वाट्याला असाफल्य येत गेलें. त्यामुळें हें सारें असाफल्य ज्या सदोष समाजपद्धतींतून निर्माण झालें तिची नीट उपपत्ति लावण्यासाठीं वाङ्मयसेवक अधिक खोल बुद्धीनें आणि समावेशक पद्धतीनें समकालीन जीवनाकडे पाहात आहेत. जुन्या नव्या सर्वच गोष्टींबद्दल समाज साशंक झाला असून अग्रणी व्यर्थवादी होत चालले आहेत. याच्या जोडीला देव, धर्म, स्पृश्यास्पृश्यता, जातिभेद, वर्णभेद, ध्येयवाद, शीलसंपन्नता, चारित्र्य, नीतिमत्ता, अभिरुचि, व्यवसायपावित्र्य इत्यादि वैयक्तिक व सामाजिक विविध गुणांचें आकारमान व मोजमाप यात ठळकपणें फरक पडत चालला आहे. समाजाची संस्कृति बदलत आहे, असें सर्व लोक, कुणी चांगल्या अर्थानें तर कुणी वाईट अर्थानें म्हणत चालले आहेत. शिक्षित समाज व त्याचे घटक प्रत्येक परंपरेच्या विधिनिषेधासंबंधात ‘ का ’ असा प्रश्न विचारूं लागले आहेत. कांहींना हा प्रश्न विचारण्याची तऱ्हा अश्रद्धेची व ऱ्हासाची वाटली तर कांहींना ही जागृतीची व प्रगतीची निदर्शक वाटली. मागल्या युद्धानंतर निरनिराळ्या राष्ट्रांनीं आपले योगक्षेम कसे सुखाचे आणि समृद्धीचे केले याचें ज्ञान इकडेहि फैलावलें. वाङ्मय आणि इतर कला यांची अभिवृद्धि ही समाजाच्या संस्कृतिवर्धनाला पोषक असल्याची ग्वाही मिळाली. त्यातून

नवे वाङ्मयप्रकार, नवे विचारप्रदर्शन, नवी मांडणी आणि भावनासंवेदनांची नवी व्याप्ति व प्रचीति याचा वापर करण्याची पद्धति निर्माण झाली.

मागें जें म्हटलें कीं, मराठी वाङ्मयावर अनुकरणाचा ठसा आहे तो आजहि या दृष्टीनें खरा ठरत आहे. इंग्लंडातील युद्धोत्तर परिस्थितीनें तिकडे वृत्तपत्रें आणि नियतकालिकें याची विलक्षण वेगानें निपज झाली. जुन्या वृत्तपत्रांनीं कात टाकून नवीन स्वरूप धारण केलें. धावपळीच्या जीवनांत थोडक्यांत पण चटकदार असे कांहीं तरी वाचावयास हवें अशी लोकांची एकसारखी मागणी आहे. टाइम्स, मॉर्निंग पोस्ट, डेली टेलीग्राफ, डेली मेल, मँचेस्टर गार्डियन्, वेस्टमिन्स्टर गॅझेट या वृत्तपत्रानीं वाचकाची ही मागणी नाना तऱ्हानीं पुरी करण्याचा सपाटा चालविला आहे. या चुरशींत यश वाचकाला कीं वृत्तपत्राला येणार यासंबंधानें मन साशंक होतें. नियतकालिकें आणि मासिकें याचीहि वीण काहीं कमी नाहीं. या नियतकालिकांतून व वृत्तपत्रातून प्रकाशित होणाऱ्या गोष्टी, लघुनिबंध, लेख इत्यादि वाचनीय मजकूर मागाहून पुस्तकरूपानें प्रकाशित व्हावा अशी तिकडे एक परंपराच पडून गेली आहे. कॉर्नहिल्, कॉटेंपोररी, लंडन मर्क्युरी नाइन्टीन्थ् सेंचरी इत्यादि मासिकें आणि हिबर्ट, राउंड टेबलसारखीं त्रैमासिकें यानीं वाङ्मयप्रकाशनाला हातभार लावला, इतकेंच नव्हे तर वाङ्मयनिर्मितीच्या नवीन प्रयोगानीं प्रेरणा पुरविली. वीज आणि कारखाने यांची सुबत्ता झाल्यामुळे जीवनातील स्वास्थ्य वाढून सुखलोलुपतेसाठीं रिकामा वेळ राहू लागला. या रिकाम्या वेळाचा जास्तींत जास्त मनोरंजक आणि आल्हादजनक कार्यात उपयोग व्हावा म्हणून कलात्मक वाङ्मयाची निपज मोठ्या प्रमाणात प्रसृत होऊ लागली. काय सांगायचें तेथपासून तें कसें सांगायचें येथपर्यंत वाचकाना नावीन्य, रम्यता, कलाचातुर्य आणि अगदीं आधुनिक पद्धतीचें सुखोत्पादन हवें होतें. म्हणून भाषा दिवसेंदिवस अर्थगर्भ, प्रसादपूर्ण पण चटकदार बनत गेली. दीर्घ वाङ्मयप्रकार मागें पडून त्रुटित, लहान आणि डोक्याला शीण न देतां हृदयाला आनंदित करतील असे वाङ्मयप्रकार जन्म पावले. हजारों लोकाना आपलेसे वाटतील, हवेसे वाटतील आणि आल्हादक ठरतील असे नित्य परिचयाच्या जीवनातील अगदीं उपेक्षणीय विषयहि कवितेच्या व वाङ्मयाच्या प्रांतात झपाट्याने शिरले.

त्याचा प्रवेश एकाद्या स्वरूपसुंदर नर्तिकेसारखा लालित्यपूर्ण आकर्षक आणि चित्तवेधक बनविण्यात आला. सांस्कृतिक जीवनात बारीकसारीक संवेदनांना, हालचालींना आणि उपेक्षणीय गोष्टींनाहि फार महत्त्व आहे हे समाज नव्यानें पटवून घेऊं लागला. कोणतीहि शिकवण हसत-खेळत दिली पाहिजे आणि घेतली पाहिजे, किंबहुना हंसत-खेळतच सारा जीवनव्यवहार चालला पाहिजे आणि तो तसा चालताना सौंदर्यपूर्ण आणि कलात्मक बनला पाहिजे, असा त्याच्या सामाजिक जीवनात न कळत दंडक निर्माण झाला

चारचौघात आवरूनसावरून बसून विचारपूर्वक आणि मुद्देसूद बोलण्यापेक्षा आपल्या घरगुती जीवनात शेंकडों दैनंदिन बार्बीविषयीं आपण ज्या साहजिक रीतीनें बोलतों ती पद्धत लघुनिबंधलेखनात आली, तिचें कारण वर सांगितलेला नवीन जीवनप्रवाह ! उद्याच्या अंकाला काहीं तरी लिहावयाचें झाले म्हणजे आज जे मनात किंवा जनात घडतें आहे तेंच उचलावें लागतें. मग तें तात्पुरत्या महत्त्वाचें असले तरी त्याला आपल्या लेखनशैलीनें लेखक आहे त्यापेक्षाहि अधिक महत्त्व चिकटवितो. सबंध जीवनाचा एकाद्या तत्त्वज्ञान्याप्रमाणे विचार करून खल करीत बसण्यापेक्षा आता जें चाललें आहे तेवढ्यापुरतेंच बोलावें असें वाटणें हा या जीवनप्रवाहातील धादलीचा आणि धावपळीचा परिणाम आहे. शिवाय हजारों वर्षे चालत आलेलें तत्त्वज्ञानात्मक विचार शंकास्पद वाटतात ते निराळेंच ! पण यामुळेंच लेखकाच्या अंतरंगात दडलेल्या खऱ्याखुऱ्या, वास्तविक आणि नैसर्गिक भावना बाहेर पडूं शकतात. म्हणूनच आजच्या निबंधलेखकाला ' उपेक्षणीय वस्तूंचा संग्राहक ' किंवा ' शेकोटीजवळचा गोष्टीवेल्हाळ तत्त्वज्ञानी ' असें यथार्थपणें संबोधण्यात येतें. गार्डिनर, चेस्टरटन्, बेलॉक, ल्युकस्, बिरेल्, लिंड्, मॅक्स बीरबॉम इत्यादि लेखकात या साऱ्या गोष्टी आढळून येतात. ते ज्या युगात नांदले त्याच्या पसाऱ्याकडे शंकास्पद दृष्टीनें बघण्यासारखी एकंदर परिस्थिति आहे. सारे जुने संकेत त्याना व्यर्थ आणि हास्यास्पद वाटतात. त्यांच्यातील हास्यास्पदता खेळीमेळीनें व्यक्त करावी. ते नव्या जीवनाला कसे अपुरे आणि पुराणे वाटतात त्याचा स्फोट करावा अशी वृत्ति स्वाभाविकपणेच निर्माण झाली आहे. लोकांनीं जोपासलेल्या अनेक सहृदय भावनांचा तोडकेपणा चेस्टरटननें अगदीं विदारक पद्धतीनें

आणि उपरोधाच्या तीव्र धारेनें छानून काढला. पण आपल्याबरोबर वाचकां-नाहि या साऱ्या दूधखुळ्या दुबळेपणाबद्दल हंसावयास लावलें. 'अल्फा ऑफ दि प्लाऊ' या टोपण नावाने गार्डिनरने इंग्लिश लघुनिबंधाच्या पद्धतींत उल्लेखनीय भर घातली. मागल्या युद्धात 'स्टार' पत्राने आपल्या वर्तमानपत्रात नावीन्य आणण्यासाठीं गार्डिनरची ही लेखमाला नियमितपणें सुरू केली. 'पेबल्स ऑन दि शोअर' या नावानें जेव्हा या निबंधाचें पुस्तक प्रकाशित झाले तेव्हा त्यातील नवीन आगामी जगाच्या अवतारा-बद्दलचा आशावादी दृष्टिकोन पाहून पुष्कळ वाचकाना एक अपूर्व गोडी चाखता आली. गार्डिनरनें अनेक सामान्य विषयावर खेळकर कलाविलासानें लेखणी चालविली. शय्येवर पडून वाचन करणें, पाळीव प्राण्यांची मगत करणें, स्वताशीं बोलण्याची मौज लुटणें इत्यादि विषयावर त्यानें घरगुती शैलीनें लेखन केलें आहे. त्यात कलाविलासाचा आनद आहे, भावनात्मक शब्दसपत्तीचे वैभव आहे, बारीकसारीक वर्णनें चतुराईनें करण्याचें कसब आहे, जीवनातील सामान्य मनाच्या अनेक सवेदनाचे सूक्ष्म ध्वनि आहेत, आणि प्रासगिक विषयावर, सकृद्दर्शनीं अप्रासगिक पण खोल दृष्टीनें आक-र्षक ठरणारे विचार वठविण्याचें सामर्थ्य आहे. आमच्या इकडील लेखकाना 'अल्फा ऑफ दि प्लाऊ' अनुकरणीय वाटला. बेलॉकची आरसपानी भाषाशैली आणि नाना विषयातील गति, ल्युकसचा जबरदस्त लेखनसभार आणि त्याची वाचकाला अनेक प्रकारानीं सुखविण्याची शक्ति, बिरेलचा हास्यविनोदाचा खळखळाट, लिंडचे भोंवतालच्या सर्वसामान्य वस्तुभाडाराशीं व व्यक्तिसमूहाशीं तल्लीन होण्याचें सामर्थ्य, इत्यादि विविध लेखकांच्या मनोधर्माचा आणि लेखनपद्धतींतील वैशिष्ट्याचा मराठींतील आजच्या लेखकांनीं डोळस अध्ययनानें स्वतावर भरपूर परिणाम करून घेतला आहे.

"आपण सामान्य माणसं द्वेष करतों, लोभ करतों, प्रेम करतों, विविध आशा उराशीं बाळगतों, मनोरथ करतों, जें करायला नको होतं ते केलं, आणि जें करायला हवं होतं तें आपल्या हातून घडलं नाहीं अशा दुहेरी णीवेनें व्याकुळ होतों, आणि कधीं हसत, कधीं सुस्कारे सोडीत जीवि-ी वाट चालत असतों. उत्कृष्ट निबंधकार आपल्याला भेटला, कीं ज्याचे ाव बहुतांशीं आपल्यासारखेच आहेत, परंतु जो त्यांचें वर्णन आपल्याला

साधत नाहीं इतक्या मनोज्ञ रीतीनें करतो, अशा एका सोबत्याची संगति आपल्याला मिळाल्यासारखी वाटते, आणि मग जीवितमार्गावरची सहल करण्यास आपल्याला नवा हुरूप येतो." असे जे उद्गार प्रो. फडके यांनीं काढले आहेत त्यावरून वर वर्णन केलेल्या इंग्लिश लघुनिबंधाशीं मराठीचा संबंध कोणत्या मार्गानें पोंचतो त्याचा सहज उलगडा होईल. "रोजच्या जीवनकलहात आपण जीवनातलें काव्य विसरून जातों. नियतीच्या कर्कश कोलाहलामध्यें निसर्गाचें कोमल कूजन आपल्याला ऐकूंच येत नाहीं. मध्यान्हकाळच्या काहिलींत पोळून निघताना मध्यरात्रीची शांतता आपल्याला स्वप्नवत् वाटते; पण सामान्य मनाला न जाणवणारीं हीं सौंदर्यें लघुनिबंधकार मोठ्या कुशलतेनें गोळा करून जीवनातल्या चिमण्या पण अविनाशी आनंदाशीं त्याची ओळख करून देतो. बाह्यत: रूक्ष दिसणाऱ्या लौकिक जीवनाच्या अगदीं लहानलहान भागातहि सौंदर्य, विनोद, तारुण्य व तत्त्वज्ञान याचे सुवर्णकण सापडतात. हे विविध कण वेंचून जीवनाची संपन्नता मनुष्याला पटविणें आणि जगात नीरस असें कांहीं नाहीं याची त्याला जाणीव करून देणें हें लघुनिबंधाचें मुख्य कार्य आहे." हे खांडेकरासारख्या दुसऱ्या एका प्रभावी लेखकाचे विचार प्रो. फडके याच्या उद्गारांबरोबर ध्यानात घेतले म्हणजे आजचें लघुनिबंधवाङ्मय सामाजिक जीवनातील असाफल्याच्या जाणिवेंतून कसें निर्माण झाले याची उपपत्ति ध्यानात यावयास वेळ लागणार नाहीं.

१९२५ सालीं 'रत्नाकर' मासिक निघाल्यावर त्यात प्रो. फडके यानीं 'गुजगोष्टी' हा वाङ्मयप्रकार लिहिण्यास आरंभ केला. प्रो. फडके याच्या अध्ययनाचा व अध्यापनाचा विषय तत्त्वज्ञान आहे. अनेक लहानमोठ्या जीवनविषयक प्रश्नाची व विशेषत: मनोगताची छाननी मूलग्राही रीतीनें करण्याचा प्रसंग येतो तो याच विषयाच्या निदिध्यासात! सामान्य लोकाना आपल्या सामान्य व्यवहारांत अनेक गोष्टी आगंतुक आणि अकारण वाटतात. पण त्या तशा वास्तविक नसतात, हे उलगडून सागण्याचें काम तत्त्वज्ञानी लेखकानीं करावें अशी अपेक्षा असते. प्रो. फडके तत्त्वज्ञानाचे अभ्यासक आहेत तसेच ते सौंदर्यवादी कलावंत आहेत. जीवनाच्या वाटेवर आढळलेल्या हरेक गोष्टींतला रस आपल्या नाजुक स्पर्शानें चाखावा, तो

गोड आणि आपल्या स्वतःच्या संसाराला सुखावह वाटला तर तो दोन्ही हातांनी पिळून काढावा, त्यातील चैन आणि माधुर्य इतराना वर्णन करून सांगावीं अशी त्याची वृत्ति आहे. आजच्या व्यवहारांतील कला आणि क्रीडा यांच्याकडे कौतुकानें, दक्षतेनें आणि समरसतेनें लक्ष पुरवून त्यांच्यातील साऱ्या सुखोत्पादक संवेदनांच्या जाणीवेनें एक प्रकारचें समाधान लाभवून घ्यावें असा त्याचा मनोधर्म आहे. संगीत, चित्रकला, नृत्य इत्यादि ललित-कलांशीं त्यांनीं विलक्षण आपुलकीनें आणि जिव्हाळ्यानें सलगी केली आहे. क्रिकेट, टेनिस, हॉकी इत्यादि सांघिक खेळांतील उन्मादकारक आनंदाचा कैफ उपभोगण्यासाठीं जिकीरीचा प्रवास पत्करण्यासहि ते कंटाळा करीत नाहींत. भरीला त्यांना कांहीं अंशीं गरजेमुळें व कांहीं अंशीं हौसेमुळें भरपूर प्रवास घडलेला आहे. असल्या प्रवासांत ते समाजशास्त्रज्ञाची किंवा तत्त्वज्ञानी विवेचकाची अवजड भूमिका कधीं पत्करत नाहींत. उलट व्यवसायामुळें अंगावर पडलेली असली जबाबदारी मागें घरीं ठेवून जाण्याची कला त्यांना साधलेली असावी असें दिसतें. त्यांच्या शरीरापासून त्यांना बाजूला काढतां येत नाहीं अशी एकच गोष्ट आहे व ती म्हणजे त्यांच्यातील सौंदर्यासक्त, रसिक कलावंत ! त्यांच्या हृदयापासून त्यांना एकच गोष्ट दूर करतां येत नाहीं व ती म्हणजे रुचिर आणि आकर्षक गोष्टींची आसक्ति ! आणि त्यांच्या बुद्धीला फक्त एकाच व्यवधानाचा विसर पडत नसावा. ते म्हणजे रसास्वादाचे ज्ञानतंतु अतिशय तरल राखण्याचें सामर्थ्य ! नैसर्गिक देखाव्यापासून विधर्मी व्यक्तींपर्यंत आणि आहारपानादि व्यवहारापासून विविध कला-क्रीडापर्यंत मार्गांत येणारी कोणतीहि गोष्ट असो, त्या गोष्टींतील प्राणभूत आनंद कशांत आहे हें शोधून काढण्यांत ते कुशल आहेत. त्यांची सहानुभूति या दृष्टीनें व्यापक आहे. पण दुःखपरिहार करण्यासाठीं बाहेर पडलेल्या धर्मोपदेशकाच्या सहानुभूतीपेक्षा त्यांची ही सहानुभूति अगदीं वेगळ्या प्रकारची आहे. गेल्या पंचवीस वर्षांतील साऱ्या राजकीय आंदोलनांतून ते शरीरानें आणि मनानें फिरून आले तो त्यांतील कलेला उपयोगीं पडणारा आकर्षक मालमसाला उचलून ! व्यवसायाच्या निमित्तानें त्यांनीं निरनिराळ्या प्रदेशांत वास्तव्य केलें. त्यांतूनहि त्यांनीं आपल्या कलेचें भरपूर पोषण करून घेतलें. चार मंडळींत बसले असतानाहि त्यांचें सौंदर्यलोलुप मन कुठें तरी

गुंतल्याचा भास होतो. ते तटस्थ कलावंत आहेत. कलेने जीवनावर इतकी विलक्षण मात केल्याचें उदाहरण सहसा कधीं सापडणार नाहीं. आत्यंतिक भक्ताला आपल्या आराध्य दैवताचें व्यवधान असावें, छादिष्ट शास्त्रज्ञाला आपल्या प्रयोगाचें वेड असावें तसें त्याना आपल्या हजारों कलावस्तूंचें अनावर आकर्षण आहे. न्याय–अन्याय, नीति–अनीति, शिष्ट–अशिष्ट याची उचापत करण्यापेक्षा केवळ सुंदर व कुरूप यातील भेद जाणण्यात तल्लीन होऊन जावें असा त्याचा मनोधर्म असावा असें वाटतें. वाङ्मय वाचनाची व लेखनाची त्याची निवडहि अशीच सौंदर्याच्या एका रेखीव आणि आखीव श्रद्धेनें तयार झाली आहे. तार्किक विचाराच्या गाढतेपेक्षा सौंदर्य-लोलुप हृदयाचे झंकार त्याना अधिक हवेसे वाटतात. पांडित्याच्या प्रखर तेजापेक्षा त्याना सहृदयत्वाचा मंद प्रकाश मुळातच मानवतो. विराट् दुःखानीं आणि जगड्व्याळ संकटानीं उध्वस्त झालेल्या उजाड भूमींतील पड-झडीच्या कारुण्यापेक्षा ताजमहालातील प्रीतीचें उदासरम्य कारुण्य त्याच्या मनाला मोहिनी घालील अशीच त्याची मनोरचना आहे. गांजलेल्या जनतेच्या असहाय्य स्वरसमुद्रातून निर्माण होणाऱ्या आक्रोशाच्या किंकाळ्यापेक्षा संगीतातील जोगी रागाचे आर्त स्वर त्याना जास्त लवकर पाझर फोडूं शकतील. अर्थात् हीं काहीं त्याचीं वैगुण्यें नव्हेत. ते समाजातल्या एका विशिष्ट वर्गाचे घटक आहेत. बौद्धिक व्यवसाय करून स्वास्थ्य, सुस्थिरपणा आणि सुख मिळविणाऱ्या वर्गाचे ते सच्चे प्रतिनिधि आहेत. त्या वर्गाशीं समरस होण्यात त्यानीं बिलकुल कसूर केलेली नाहीं. किंबहुना हा वर्ग थोडा फार चैनी, विलासप्रिय, सुखसोयींनीं सुसज्ज, समृद्धीची जोपासना करणारा आणि सौंदर्यप्रधान कलाविलासाची आवड बाळगणारा नाहीं, असें कधींहि म्हणता येणार नाहीं. आणि याहि वर्गाचीं काहीं मनोगतें आणि वाञ्छितें आहेत. त्याच्याहि आशा-आकांक्षा आहेत. त्याच्याहि जीवनात सुखाचे जाति-मंडप आणि दुःखाचे काटेरी मार्ग आहेत. त्याच्या रोजच्या जीवनात अनेक बारीकसारीक उपेक्षणीय हर्षामर्षाचे प्रसंग व घटना आहेत. प्रो. फडके यांनीं आपल्या गुजगोष्टींतून या साऱ्यांची मोठ्या कौशल्यानें वास्तपुस्त केली आहे. इंग्रजींतील मागें उल्लेखिलेल्या लेखकाचे सारे गुणविशेष त्यानीं या कामीं प्रयास-पूर्वक कारणीं लावले आहेत.

सत्याचा आभास उत्पन्न करून, अनेक उपेक्षणीय व रोजच्या जीवनात झिजून गेलेल्या अनेक विषयांवर प्रो. फडके यानीं लेखणी चालविली आहे. गुजगोष्टी, धूम्रवलये आणि नव्या गुजगोष्टी या गेल्या बारा वर्षात प्रकाशित झालेल्या त्याच्या पुस्तकातून सुमारे पन्नास-पन्चावन्न विषयावर जें लेखन त्यानीं केलें आहे त्यात त्याच्या लेखणीचे सारे आत्मीय गुण प्रकट झाले आहेत. सामान्यतः उपेक्षणीय वाटणाऱ्या व्यावहारिक गोष्टींची चमत्कृतिपूर्ण आणि अभिनव महती अति हलक्या हाताने व्यक्त करण्याचे या वाङ्मय-प्रकाराचें वैशिष्ट्य प्रो. फडके यानीं यशस्वीपणे आत्मसात् केलें आहे. एखाद्या मित्राशीं जिव्हाळ्याने बोलल्यासारखी घरगुती भाषाशैली त्यानीं लीलेनें वापरली आहे. विषयाच्या मांडणीला डोईजड होणार नाहीं, अशा अनेक आख्यायिकाची अधूनमधून बेतशीर आणि साहजिक पेरणी करून देऊन वाचकाला विश्वासात गुरफटून टाकण्याचें चातुर्यहि त्यानीं व्यक्त केलें आहे. लोकानीं वापरून बेचव ठरलेलें एखादे अगदीं सामान्य सिद्धान्तरूप प्रमेय एका नवीन कैवारात वाचकापुढें मांडण्याची हातोटी प्रकट करून त्यांनीं चालू जीवनातील रसिकतेच्या नवीन पैलूंची वाचकाना मोठ्या खुबीनें ओळख पटवून दिली आहे. विद्वत्ता आणि रसिकता, पांडित्य आणि गोष्टी-वेल्हाळपणा, मार्मिकपणा आणि बहुश्रुतपणा, सकोच आणि विस्तार, सत्य आणि सत्याभास, अशा परस्परपोषक जोड्या त्यानीं आपल्या लेखनात कलात्मक रीतीनें उपयोगात आणल्या आहेत. शेवटची ओळ वाचेपर्यंत वाचकाला कंटाळा येणार नाहीं, उलट त्याची जिज्ञासा वाढत राहावी हे लेखणीचें कौशल्य टिकवून ठेवण्यात त्याना यश लाभलें आहे. भाषेत प्रसाद, वर्णनांत सुबोधता, आख्यायिकाच्या निवेदनात चटकदारपणा, प्रमेय किंवा सिद्धान्त यांच्या मांडणींत मार्मिकता आणि आभासात्मक कल्पनातून सत्या-विष्कृतीची निपज इत्यादि आदर्श लघुनिबंधलेखकाचीं अवधानें त्यानीं दक्ष-तेनें पाळलीं आहेत. त्यांनी अशी दक्षता वाहिली आहे हें ध्यानात याव-यासहि वेळ लागावा इतकें त्यांच्या लिहिण्यात मार्दव आणि माधुर्य एकवटलें असून त्याच्या निवेदनपद्धतींत अगदीं सहजासहजीं ओघाओघानें बोलत गेल्याची भावनाशीलता आहे. व्यवहारातील सारे नाट्यगुण त्यानीं इतक्या सराईतपणें वापरले आहेत कीं, छापील मजकूर वाचतानाहि आपल्याशीं

एकान्तांत कुणी तरी नाजूकपणें मानवी वाणीनें बोलत असल्याचा भास व्हावा ! वस्तुतः हा लेखनप्रकार हाताळणें ही गोष्ट वरपांगी वाटते इतकी सोपी नाहीं. त्याला व्यासंग, अवलोकन आणि मनोगाहन या गोष्टींची फार आवश्यकता असते. नाना देशातील विचारवंताचे अभिप्राय लीलेनें समर्पक शब्दांनीं व्यक्त करणें, समाजाच्या विविध व्यवहारांतील बारीकसारीक खाचाखोचा कधीं उपरोधानें तर कधीं सहानुभूतीनें उलगडून दाखविणे, आणि मानवी मनोरचनेंतील अनेक विकारविचाराच्या संगराचे मूलभूत सूत्र एकाद्या उपेक्षणीय गोष्टीच्याहि उल्लेखाने सहज स्पष्ट करून दाखविणें या गोष्टी करण्याला विशिष्ट प्रकारचा अभ्यास पाहिजे. मराठींत नव्यानें हा वाङ्मयप्रकार जन्मास घालणाऱ्या प्रो. फडक्यासारख्या लेखकानें पहिल्या सलामीलाच त्याचा प्रपंच इतका ठसठशीत, नमुनेदार आणि आदर्शवत् करावा ही गोष्ट मराठी वाङ्मयाच्या इतिहासात सदैव कौतुकाची होऊन राहील यात शंका नाहीं.

ऐन पंचविशी, एकान्तवास, सुहास्य, अज्ञान, पहिलें चुंबन, अधारी रात्र, पहिला पाढरा केस, पहाटे उठण्याचा वेडेपणा, आंबट द्राक्षें, उघडं गुपित, ताजा कलम इत्यादि त्याच्या लघुनिबंधातून या गुणाचीं अनेक उदाहरणें शोधतां येतील. " जत्राच्या वेळीं क्षणभर लहान होऊन पाळण्यात किंवा फिरत्या चक्राच्या लाकडी घोड्यावर अथवा वाघावर बसण्याचा, दोन पैशाची पिपाणी किंवा करकरें घेऊन वाजविण्याचा पोरखेळ जे लोक करीत नाहींत ते मोठे अभागी म्हटले पाहिजेत. " " मला मोटार घ्यायची नाहीं, घर बांधायचं नाहीं, किंवा परदेशाला जायच नाहीं. पण या सगळ्या चवकशा मला फार प्रिय वाटतात. कल्पना ही एक माणसाला मिळालेली बहुमोल देणगी आहे. माणसाच इतर सर्व प्रकारचं वैभव विनाशी आहे, तें त्याच्यापासून लुटून घेता येईल, पण माणसाच कल्पनाधन कोण हिरावून घेऊ शकेल ? " " ज्याच्या अन्तःकरणात सौंदर्य असेल त्याच्या दृष्टीस सुंदर वस्तु पडतात. ज्याच्या अन्तःकरणात संगीत असेल त्याला मधुर स्वर ऐकूं येतात. ज्याच्या अन्तःकरणात स्नेह असेल त्याला मित्र मिळतात. ज्याच्या अन्तःकरणात प्रेम असेल त्याला प्रेमिकाची जोड होते ! माणसाच्या अंतरंगाचीं प्रतिबिंबंच त्याच्या भोंवतालच्या वस्तूंत अन् व्यक्तींत पडत असतात. जग म्हणजे एक विलक्षण आरसेमहाल आहे ! " " सूर्य ऐन माथ्यावर

आलेला असताना संथपणानं तृणाकुर खुडून चरणाऱ्या गाई, तिन्हीसांजाच्या अंधुक उजेडात गुराख्याच्या पाव्याचे स्वर ऐकत कुरणातून रेंगाळत परत जाणाऱ्या मेंढराचा कळप, किंवा अरुणोदय होतान आपापल्या घरट्यांतून बाहेर पडून कुणीकडे कुणास ठाऊक पण अत्यानंदान किलबिलाट करीत भरारी मारणाऱ्या पक्ष्याचा थवा—असलीं दृश्य पाहून ज्याच्य खासगी दुःखांचा लोप होत नाहीं असा एक तरी मनुष्य मला कुणी दाखवील का ? ज्या ज्या वेळीं मन अत्यत उद्विग्न झालेल असताना मी समुद्राच्या तीरावर जाऊन बसलों, व त्या अथाग जलाशयाकडे दूर दूर दिसणाऱ्या क्षितिजाच्या अवाढव्य रेषेकडे, आणि अनंत आकाशाकडे मी टक लावली त्या त्या वेळीं माझ्या मनातलीं दुःख पार कुठच्या कुठं नाहींशीं झालीं. " "मस्तकावरचा पहिला पाढरा केस पाहून मला भीति वाटली. तरुण माणस आता माझ्याविषयीं आदर दाखवू लागणार. तरुणाच्या आदरासारखी दुसरी आपत्ति नाहीं असं नेहमीं मला वाटत आलं आहे. "

केवळ नमुन्यादाखल दिलेल्या एवढ्या अवतरणावरून फडक्याची जीवनविषयक दृष्टि रसिक कलावताची कशी आहे हे ध्यानात यावयास वेळ लागणार नाहीं. या त्रुटित अवतरणातूनहि त्याची तारुण्यसुलभ सौंदर्याची आवडच प्रामुख्यानें व्यक्त झाल्याशिवाय राहात नाहीं. सौंदर्य, संगीत, सुगंध आणि प्रेमिकाचें संमीलन याचे उल्लेख आल्याशिवाय जीत राहणार नाहींत, ती प्रो. फडके याची शैलीच नव्हे असें कुणालाहि काहींशा विनोदानें म्हणावेसें वाटेल. सुखवस्तु मध्यमवर्गीय समाजाच्या मनाची बारीकसारीक सुखदुःखें कशात सामावलीं आहेत तें अचूकपणें टिपून घेण्यात फडके निपुण आहेत याचाहि बोध वरील अवतरणावरून सहजच होईल. हे सत्य नव्हे, हा सत्याभास आहे. प्रो. फडके काय किंवा त्याच्या वर्गातील इतर स्त्री-पुरुष काय, वर वर्णन केलेल्या गोष्टी जशाच्या तशा अनुभवतात किंवा करतात असें खासच नव्हे. पण त्या वर्गाची एकंदर चालचर्या आणि मनोवांच्छिताची उडी असल्याच गोष्टीशीं समरस झालेली असते हें नाकारता येणार नाहीं. म्हणूनच इग्लंडांतील सुखवस्तु यंत्रसिद्ध जीवनानें विलासलोलुप आणि चैनी बनलेल्या एका विशिष्ट वर्गाचें मन उघडें करून दाखविणारे लघुनिबंध हे नमुन्याबद्दल पुढें धरून स्वतःच्या सौंदर्यदृष्टीचें आणि कलाविलासाचें

भरगच्च माप त्यात ओतून मराठीच्या जीवनाशीं एकरूप होणारा वाङ्मय-प्रकार फडक्यांनीं जन्मास घातला असें म्हणावयाचें. त्यातील भाषेचें माधुर्य, विचारांचे प्रत्यक्षानुभव, वर्णनाची सरसता आणि निरूपणाची कुशलता हीं सारीं फडक्यांची स्वायत्त आहेत.

फडक्याच्या बरोबरीनें ज्याचा उल्लेख करावा लागेल असे दुसरे लेखक म्हणजे खांडेकर होत. त्याची लिहिण्याची आक्रमशक्ति विलक्षण वेगाची आहे. लिहिण्याच्या वेगाबरोबर मेंदूची क्रिया आणि अन्तःकरणाची तळमळ यांनीं मागें पडता कामा नये अशी जणू काय त्यानीं अट पाळलेली दिसते. खांडेकर कल्पक आहेत तसेंच मनानें वाजवीपेक्षां जास्त हळवे असल्याचा भास होतो. एकादी गोष्टच काय, पण किती गोष्टी किती प्रमाणात मनाला लावून घ्याव्यात या बाबतींत त्याना संयम राखतां आला असेल तर तो अपवादादाखलच होय. प्रवाहाबरोबर वाहात जाण्यासारखें त्याचें मन ओढाळ आहे. कलावताचें ताटस्थ्य त्याच्यात नसलें तरी सहृदय आणि सद्भावना-शील मनाची तळमळ त्याच्या ठिकाणीं काठोकांठ भरली आहे. त्यानीं लिहिलेल्या एका लघुनिबंधात ‘थोडे अविचारी व्हा’ असा जो संदेश सांगितला आहे तो सत्य मानावयाचा झाला तर तो त्यानाच काहीं प्रमाणांत लागू करता यईल. विहिरीच्या काठावर बसल्यावर आंत उडी घ्यावीशी घाटणे किती स्वाभाविक आहे याचें जें वर्णन त्यानीं आपल्या लघुनिबंधातील एका नायकासंबंधांत केलें आहे तें त्यांच्यासंबधात अगदींच गैरवाजवी नाहीं. त्यांचा तारुण्याचा काळ एका विशिष्ट ध्येयानें प्रेरित होऊन घालविण्याच्या संकेतानें गेला. त्याग, शुश्रूषा आणि परहितपरता या गुणाची जोपासना त्यानीं धर्मबुद्धीने केली आहे. आगरकरांसारख्या कडव्या ध्येयनिष्ठ लेखकाला त्यानीं आराध्य दैवत मानलें होतें. त्यांच्या ठिकाणीं कल्पनाविलास आहे तो अतिशय आदर्श मनोरथ पाहणाऱ्या तपोनिष्ठ ऋषीचा. सौंदर्याची अभिरुचि आहे ती तें सौंदर्य आजच्या कुरूपतेचा संहार करण्यासाठीं एखाद्या सिद्धीनें समूर्त करावें असल्या आशावादावर आधारलेली ! पण कल्पनेच्या साम्राज्यातील शेंकडो सुंदर आणि आदर्श वस्तूच्या चिंतनाबरोबर आज भोवतीं पसरलेल्या दुःखमय आणि कारुण्यमय पसाऱ्यातील विकल आणि विद्रूप गोष्टींची सहानु-भूति बाळगण्यात त्याच्या मनाची धाव केवळ अनावर असते. म्हणूनच केवळ

सुंदर कलाविलास करण्याचें त्याना साधत नाहीं. सगीतनृत्यादि कला त्याना मोह घालीत नाहींत असें नाहीं. पण त्यांच्या मनाची ओढ मुळातच आर्ततेकडे आहे. आक्रोश ऐकला कीं कावरेंबावरें होऊन जावें, दैन्य पाहिलें कीं पाझरून जावें, अनाठायीं आक्रमण पाहिलें कीं, अशरण चीड येऊन तापून जावें, अन्यायाचा संचार भोंवतीं पाहिला कीं तळमळून उठावें, अनीतीचें थैमान दिसलें कीं विमनस्क होऊन जावें, अशी त्याच्या मनाची घडण आहे. विशेषतः हजारों सामान्य लोकाचे एकसुरी बुटके आयुष्यक्रम पाहून त्यांचें मन वेदनांनीं विव्हळ होऊन जातें. घर ते कचेरी आणि कचेरी ते घर, घर ते बाजार आणि बाजार ते घर असल्या ठराविक बोगद्यांतून फिरणाऱ्या सर्वसामान्य स्त्रीपुरुषांच्या जीवनक्रमांत प्रकाशाचे नवे कवडसे निर्माण केव्हा होतील म्हणून मनाशीं एका नवीन सृष्टीची तुलनात्मक जपमाळ जपण्यात त्याची कल्पकता स्वैरपणें रंगून जाते. गेल्या वीस-पंचवीस वर्षांत परतंत्र हिंदी जीवनातील प्रत्येक घटकानें अपमान, अन्याय, असाफल्य, दलितावस्था, स्वामित्वाच्या ताडवाचे विदारक आघात आणि व्यक्तित्वाचा कोंडमारा याचा अनुभव अगदीं झीट येईपर्यंत चाखला आहे. खांडेकरांनीं जणूं काहीं याच एका जीवनाबद्दल सहानुभूति बाळगलेली दिसते. त्याच्या लघुनिबंधांची घडण असल्या जीवनाच्या अनुभवावर आधारण्याचा त्यानीं तळमळीनें प्रयत्न केला आहे. त्यामुळें त्याच्या लेखनशैलींत बांधीवपणा कमी असला तरी आपुलकीची ओढ आहे. लेखाच्या रचनेंत शिल्पाची प्रमाणबद्धता कमी असली तरी उद्गार काढणारें मन कसल्या तरी विषण्णतेनें भरून गेल्याची स्पष्ट जाणीव होते. " काळाचा क्रूरपणाहि असाच आहे. तो खून करीत नाहीं. शस्त्रक्रिया करतो. त्याच्या एका डोळ्यात उन्हाळा असला तरी दुसऱ्यात पावसाळा आहे. जगाच्या बागेंतील त्या माळ्याच्या कंबरेला चकचकीत कोयती चमकत असली तरी त्याच्या हातांत पाण्याची झारी आहे. ' कालाय तस्मै नमः ' हे उद्गार काढतांना त्या झारीकडे लक्ष दिलें तर काल हा राक्षस नसून देवमाणूस आहे, असेच उद्गार कुणाच्याहि तोंडून निघतील." या विचारात कालापुढें नमलेल्या खुरटलेल्या आयुष्याना नवीन चेतना देण्याचें सामर्थ्य नाहीं असें कोण म्हणेल ! " वाफेनें उडणाऱ्या किटलीवरील झाकणाच्या पोटींच जसा आगगाडीचा जन्म झाला, त्याप्रमाणें बाह्यसृष्टि

हुबेहूब दाखविणाऱ्या अरशांतूनच कधीं ना कधीं तरी अंतःसृष्टीचें सत्यस्वरूप दाखविणारा आरसा जन्माला येईल. असे आरसे घरोघर झाले कीं, जगांतल्या निम्या तरी दुःखाना आपले तोंड काळें करावे लागेल. या नव्या आरशामुळें आजची अपूर्ण सृष्टि निःसंशय आदर्शसृष्टि होईल. पण अशा आरशाचा शोध कधीं तरी लागेल का " या कल्पनेंत व्यक्त होणारी अपूर्ण सृष्टीबद्दलची सहानुभूति समाजनिरीक्षणांतून निर्माण झाली नाहीं असें कसें म्हणता येईल ? " श्रीमंती हें मद्य व गरिबी हें दूध आहे असें मानण्याचा प्रघात आहे. पण सामान्य मनुष्याच्या अन्तःकरणाचा कौल घेतला तर श्रीमंती हें मद्य असलें तरी गरिबी हें हलाहल आहे, असें आमचें उत्तर येईल. " गरिबींत सुख मानणें हा एक प्रकारचा गुन्हा आहे हे नवीन तत्त्वज्ञान या उद्गारानीं आत्मसात् करण्यात केवढी चपळाई दाखविली आहे ! " स्त्री-पुरुषांमधील प्रणयांतून लग्न व लग्नातून प्रेम उत्पन्न होतें. किंबहुना आपल्यें अगर संकटें एकामागून एक येऊं लागलीं कीं, त्याच्या मैत्रीच्या वेलीवर फुलें फुलूं लागतात असें म्हणायलाहि हरकत नाहीं. स्त्रीपुरुषांच्या प्रेमाला स्वर्गांतल्या अमृतापासून पाताळातल्या गंगाजळापर्यंत हजारों उपमा कवींनीं दिल्या असतील; पण संसारी दृष्टीनें बोलावयाचें तर तें लिंबाचें लोणचें आहे. जों जों तें जुनें होत जातें तों तों त्याची किंमत अधिक. " चालू जीवनांतील तरुण मनाच्या उच्छृंखल विकाराना खोट्या काव्यापासून वास्तव सत्याकडे ओढण्याची धडपड या लिहिण्यात व्यक्त झाल्याशिवाय राहात नाहीं. " जगातल्या लहानसहान वस्तूंतहि लपलेल्या मधुर आनंदाचीं अनंत रूपें ओळखता आलीं तर जीवन आकर्षक होण्याला विलंब का लागणार आहे ! " या म्हणण्यांत हजारों सामान्य लोकांच्या बुटक्या आयुष्यांतील तोटके आनंद हलक्या हातानें व्यक्त व्हावेत हीच मनीषा प्रकट होत आहे. " भावना हेंच जीवनातले चांदणें आहे. चंद्रिका मातीच्या घरात संगमरवरी सौंदर्याचा साज चढविते आणि बाभळीच्या झाडाना नंदनवनांतील पारिजातकाइतकी मोहकता प्राप्त करून देते नाहीं का ? अमावास्येलाच सारी भुतावळ बाहेर पडते ही जुनी कल्पना काहीं अगदीं अर्थशून्य नाहीं. चांदण्यांत पिशाच्चें बाहेर पडतील तर त्यांचें चटकन् यक्षगंधर्वांतच रूपांतर होईल. " या उद्गारांत

हजारों रूक्ष संसारी लोकांना बारीकसारीक भावनाच्या आनंदाची महती किती साहजिक युक्तिवादानें पटवून दिली आहे?

वायुलहरी, मंदाकिनी, अविनाश, चादण्यात, सायकाल, इत्यादि लघु-निबंधसग्रह खाडेकरांनीं गेल्या दहा वर्षात प्रकाशित केले. सामान्यतः त्यानीं लिहिलेल्या लघुनिबधांची संख्या शभरच्या वर जाईल. त्याच्या लिहिण्यांतील गति आणि वेग हीं विस्मयकारक तर खरींच; आणि ही विस्मयकारकता जास्त वाढण्याचें कारण त्याच्या लेखनशैलींतील कल्पकतेचा आवेश हेंच आहे. आलंकारिक रचना गद्यात इतक्या सफाईनें सजविणारा दुसरा लेखक आज तरी त्याच्या समकालीनात कोणीहि नाहीं. चमत्कृतिपूर्ण कल्पनाना, संदर्भाना, पौराणिक आणि ऐतिहासिक उल्लखाना आणि वाङ्मयांतील अवतरणाना व सकेताना झपाट्यानें आकर्षक कलाटणी देऊन वर्ण्य विषयांचे तेज वाढविण्याचें त्याचें सामर्थ्य लघुनिबंधलेखनाच्या कलेला फार साहाय्यक झालें आहे. कोणत्याहि परिचयाच्या विषयात नवीन, अपरिचित आणि मनोज्ञ संकेत निर्माण करून त्याची रमणीयता वाढविण्यात खाडेकर फार कुशल आहेत. शिवाय आदर्श लघुनिबधलेखकाचे कलात्मक गुणहि त्याच्या शैलींत आहेत. मागे उल्लेखिलेले या कलेचे तंत्र खाडेकरानींहि झपाट्यानें आत्मसात् करून या शाखेतील आपले आघाडीचें स्थान संख्या आणि गुणवत्ता या दोन्ही दृष्टींनीं अढळ राखलें आहे.

फडके-खाडेकराच्या बरोबरीनें पण काहीं अंशीं स्वतंत्र आणि विशिष्ट स्थान संपादन करण्यांत अनंत काणेकर यानीं स्पृहणीय यश संपादिलें आहे किंबहुना काणेकराची लघुनिबधलेखनाची स्फूर्ति ही कोणत्याहि समकालीनाशीं होणाऱ्या प्रतिष्ठित स्पर्धेतून निर्माण झालेली नाहीं. ती स्वयप्रेरित आहे. त्यामुळें तंत्रदृष्ट्या जरी त्यांची लेखनकला या लेखकांशीं क्वचित् साम्य-विरोधानें तुलनीय ठरली तरी काणेकराचा दृष्टिकोन आणि मनोधर्म हे दोन्ही अगदीं वेगळ्या वातावरणानें, चिंतनानें आणि अभ्यासानें घडविले आहेत. प्रगमनशील मनाची खळबळ प्रामाणिकपणें व्यक्त करण्यात काणे-करानीं एका विशिष्ट कालात जें औचित्य साधलें त्यातच त्यांच्या लोक-प्रियतेचें खरें मर्म आहे. कोणत्याहि मतासंबंधांत काणेकर जागरूक आहेत, पण आग्रही नाहींत. स्वतांची भूमिका मांडण्यांत जसे ते कुशल आहेत तसेंच

इतरांची भूमिका समजावून घेण्यांत ते चतुर आहेत. विचारानें व अनुभवानें आपलें पहिलें मत बदलण्याचा प्रसंग आला तर खळखळ न करतां खिलाडूपणानें तें आपलें मत बदलतील आणि तसें प्राजलपणें जाहीर करतील. कोणताहि पक्ष, कोणताहि देशीपरदेशी लेखक, कोणतीहि मतप्रणालि, कोणतीहि तत्त्वमीमांसा हीं निःसंशय प्रमादरहित आहेत असें न मानण्यांतच काणेकराच्या स्वभावधर्माचें खरें मर्म आहे, म्हणून आज दुसऱ्या कोणत्याहि लेखकापेक्षां त्यांची जिज्ञासा टवटवीत आहे, लेखणी तेजस्वी आहे, विवेचन तर्कशुद्ध आहे, आणि मनोरचना स्वच्छ आणि समावेशक आहे. त्यांच्या भोंवतालचें राजकीय व सामाजिक वातावरण व त्याचा दैनंदिन वृत्तपत्रव्यवसाय या गोष्टींनीं त्याना मनुष्यस्वभावाच्या ढोंगासोंगाचें जे ज्ञान झालें आहे त्यांचा त्याच्या लेखनावर रंग चढला आहे. वृत्तपत्राची जागाच अशी आहे कीं, तेथें न कळत मनुष्य मार्मिक आणि मर्मभेदक बनावा. त्या चावडीवर येणारीं हजारों लहान-मोठीं खेंगटीं तटस्थपणें पाहून त्यांतील सत्याशापेक्षां सत्यापलापाचा बोधच जास्त प्रमाणात मनावर बिंबावा. शिवाय काणेकरांवर साम्यवादी विचारसरणीनें मोठा परिणाम केला. या विचारसरणीनें अंकित झालेले मन प्रत्येक रूढ गोष्टीविषयीं अगदीं वेगळ्या तऱ्हेनें विचार करण्यास प्रवृत्त होतें. त्यांत साशंकतेबरोबर शास्त्रीयता असते; दंभद्वेषाबरोबर सत्यनिरूपण असतें; रूढीच्या तिरस्काराबरोबर नव्या तर्कशुद्ध घटनांचें आकर्षणहि असतें; असल्या अन्तःकरणाची सहानुभूति ही दानधर्माच्या स्वरूपाची असत नाहीं किंवा मनाच्या दुबळ्या हळवेपणातूनहि ती निर्माण होत नाहीं. मात्र ती सहानुभूति जास्त व्यापक आणि खोल असते. ती हृदयापासून जन्म पावली तरी बुद्धीशीं घटस्फोट करीत नाहीं. महाराष्ट्रातल्या पहिल्या साम्यवादी लेखकाना जुन्या कल्पनांचा सर्वस्वीं उच्छेद करण्याची कामगिरी करावी लागली. लेखकांच्या मनोधर्मानुसार या कामगिरीचें स्वरूप ठरलें. काणेकर ढोंगासोंगाकडे बघून रागावत नाहींत कींव येऊन हंसतात. त्यांना चीड येत नाहीं तर मानवी मनाचा सामाजिक प्रवाहानें घडविलेला एक विचित्र आणि अजब नमुना सांपडल्याचा आनंद होतो. यातूनच त्याची लघुनिबंध-लेखनकलेची एक विशिष्ट घडण तयार झाली. पिकलीं पानें,

तुटलेले तारे, शिंपले आणि मोतीं, उघडया खिडक्या, काळे आणि पांढरे इत्यादि नावांनीं त्यानीं आपले निबंध एकत्रित केले आहेत. काणेकरावर कोणत्या इंग्लिश लेखकाचा परिणाम झाला आहे, हें शोधीत बसणे वेडेपणाचे ठरेल. त्याच्या वाचनांत मागें उल्लेखिलेले निबंधलेखक आले नसतील असें नाहीं. सगळ्यांचा मिळून झाला असला तर संकलित परिणाम झालाहि असेल. पण तरुण पिढी आज प्रत्येक गोष्टीकडे साशंकतेनें, संशयानें आणि व्यर्थवादित्वाने पाहते त्याचे काणेकर हे एक प्रतीक म्हटले पाहिजे. " बेधडक खोटे बोलणें, हेंच केव्हा केव्हा खरें बोलण्यापेक्षा चागलें ", " दुसऱ्याच्या डोळ्यानीं पाहाण्याची संवय ", " घडयाळाचे गुलाम ", " बुवा आणि बुवा ", " वडीलशाही ", " व्यवस्थितपणाचें वेड ", " छोटे चोर आणि मोठे चोर ", " पति आणि वल्लभ ", " चागुलपणाचे तोटे ", " तत्त्वनिष्ठा आणि तमासगीर ", " पाचामुखीं सैतान ", " यथेच्छ झोपा " इत्यादि लेखाचे नुसते मथळेच त्याच्या वर वर्णन केलेल्या मनोधर्माची साक्ष देतील. आपल्या निबंधात गणूकाका निर्माण करून काणेकरानीं लघुनिबंधाच्या वातावरणात घरगुती जीवनाचे ओघ उत्पन्न केले. गणूकाका म्हणजे सर्वसामान्य रूढिप्रिय माणसाचा प्रतिनिधि ! त्याच्या मनाला नवीन कल्पनाचे धक्के देताना काणेकरानीं समाजातल्या हजारों गणूकाकाना त्या धक्क्याचा आचका बसेल अशी कलापूर्ण माडणी केली आहे. " आम्ही बुद्धिवान् लोक अपत्यवात्सल्याविषयीं रसाळ कविता लिहूं किंवा मित्रप्रेमावर एखादा फर्डा लेखहि खरडूं. पण आमचा मित्र आजारी पडला असतां इकडची काडी तिकडे करण्याचें काहीं आम्हाला जमणार नाहीं. पण तेंच एखादा सामान्य मनुष्य आपल्या स्नेह्याच्या आजारात त्याची शुश्रूषा करण्याचें किंवा घाण उपसण्याचें काम आमच्यापेक्षा शतपट अधिक चोखपणें करतो. " या लिहिण्यात स्वास्थ्यप्रिय समाजाच्या खोट्या कलासक्तीचा केवढा दंभस्फोट आहे ! ' दोन मेणबत्त्या ' या निबंधातील विचारसरणी उपदेशप्रधान नसूनहि सामाजिक दृष्टिकोनाला उपकारक आहे. " आपणात जीवन असतें किंवा जिवंतपणा असतो, म्हणजेच आपणात सारखा फरक पडतो, किंवा आपला विकास होतो. या विकासाचें मोजमाप करण्याकरितां 'काळ' या नांवाची एक कल्पना आपण शोधून काढली आहे. जीवन आहे—विकास

आहे म्हणून ही कल्पना करावी लागते. म्हणूनच मी म्हणतों कीं, काळाला कांहीं म्हणावयाचें असेल तर त्याला मृत्यु म्हणूं नका! काळ म्हणजे जीवन!" शब्दाचे अर्थ एका विशिष्ट संदर्भानें उलटविण्याचें हें कसब चेस्टर्टन्ची आठवण करून दिल्याशिवाय राहील काय?

वृत्तपत्रव्यवसायाच्या टोचणींतून निर्माण झालेल्या या लेखनात इतर कोणत्याहि लेखकापेक्षा सुबोधता, प्रवाहशीलता, युक्तिवादाची सुगमता, भाषेची गति आणि एकच मुद्दा आटोपशीरपणें पण ठसठशीत स्वरूपात मांडून दाखविण्याची घाटणी या गोष्टी अपरिहार्यतेनें आलेल्या आहेत. पण त्यात तंत्रशुद्धता, भाषाशैली किंवा विचारसौंदर्य या कलात्मक अंगापेक्षाहि वेगळ्याच गुणाना महत्त्व आहे. दंभस्फोट, हास्यास्पद गोष्टी उघडकीस आणण्याचें कौशल्य, रूढ संकेतातील खुळचटपणाचा आविष्कार आणि मनातील हजारों गुंतागुंतीच्या बतावण्यावरील बुरखे फाडून काढण्याचें सामर्थ्य हे ते गुण होत. पण हे गुण काणेकरानीं वापरले ते प्रचारकाच्या भूमिकेनें नव्हे तर कलावंताच्या! म्हणूनच हे सारे गुण एक प्रकारच्या आर्जवी आणि मृदु भाषेनें झाकून वाचकापुढें येतात. त्यात खेळकरपणाची चमक केव्हाहि क्षीण होत नाहीं. त्यात हमरीतुमरी नाही, पण गोड रुसव्याची नाजूक जादू आहे. म्हणूनच त्याचे लेख लघुनिबंध या संज्ञेस सर्वथैव पात्र ठरले. कागदी विमानें (र. गो. सरदेसाई), साखरझोंप (ग. भा. निरंतर), धूम्रतरंग (मा. का. देशपांडे), कोंवळे ऊन (ना. मा. संत), फेरफटका (वि. पां. दाडेकर), पहिली उडी (भावे), रजःकरण (रघुवीर सामंत), किनाऱ्यावर (वि. द. साळगावकर), दीपदान (कुसुमावती देशपांडे), नकोत त्या गोष्टी (वा. भा. पाठक) इत्यादि उल्लेखनीय लघुनिबंधसंग्रह गेल्या दहा वर्षांत प्रकाशित झाले आहेत. त्यानीं या वाङ्मयप्रकाराची शोभा निःसंशय वाढविली आहे. विशेषतः दाडेकर, सरदेसाई, व निरंतर हे थोड्याच अवधींत या वाङ्मयशाखेंत फडके–खांडेकर–काणेकर यांच्या बरोबरीची जागा मिळवूं शकतील असा खात्रीनें विश्वास वाटतो. या प्रत्येकाचे अनुभव, आत्मनिष्ठा, दृष्टिकोन, जीवन जगण्याची श्रद्धा यातून या प्रकाराला पोषक अशा कित्येक गोष्टी लाभल्या आहेत आणि लाभतील. सरदेसाईंची उपरोधगर्भता, दाडेकरांचें आर्जव, निरंतराचें विडंबनप्रेम, इत्यादि गुणानीं हा वाङ्मयप्रकार

फोफावण्यास भरपूर साहाय्य होत आहे. वृत्तपत्रांच्या व नियतकालिकांच्या वाढीतून लेखकाना हा वाङ्मयप्रकार लिहिण्याची स्फूर्ति एकसारखी पुरवली जात आहे. वि. ल. बरवे, रा. रा. नातू, कमल फडके, य. गो. जोशी, व्यं. रा. वनमाली, शंकर साठे, ना. मा. सत, स. वि. देशपांडे, ग. ल. ठोकळ इत्यादींचे उल्लेख अवश्य केले पाहिजेत. एखाद्या मोठ्या शिल्पमंदिराची रचना होण्यासाठीं अनेक शिल्पसंजीवकानीं अहमहमिकेने झटावें तसा प्रकार चालू आहे. महाराष्ट्रातले इतर लेखकहि या मार्गाकडे वळतील तर याचा आकार भरघोस होऊन त्याच्या प्रमाणबद्धतेचें आकर्षकत्वहि वाढल्याशिवाय राहणार नाहीं. विशेषतः प्र. के. अत्रे, प्र. श्री. कोल्हटकर आणि शामराव ओक यासारखे विडबंनकुशल आणि उपहासचतुर लेखक आपल्या चोखंदळ सहानभूतीसकट या प्रकाराला हात घालतील तर लालित्य आणि व्याप्ति या दोन्ही दृष्टींनीं त्यात जिवंतपणाची भर पडेल.

लेखक कलाप्रेमी, रसिक, कल्पक, नावीन्यप्रचारक झाले आहेत तसे वाचकहि चाणाक्ष आणि चोखंदळ बनले आहेत. सर्वांचें सर्व लेखन जरी ते डोळ्याखालून घालीत असले तरी डोक्यात काय ठेवावें आणि हृदयात काय साठवावें या बाबतींत त्याचा मगदूर आतां उपेक्षणीय राहिला नाहीं. लेखक-वाचकाच्या या चुरशींतून झाला तर वाङ्मयप्रकाराचा फायदाच होणार आहे. या फायद्यातला अंश' नियतकालिकाचे चालक चाणाक्षपणें आधींच पदरांत पाडून घेतील हें वेगळें सागावयास नको.

● ● ●

: ५ :

# मराठी टीकाशास्त्र

प्रा. डॉ. के. ना. वाटवे

## त्रिस्थळी यात्रा का त्रिवेणी–संगम ?

'मराठीचें टीकाशास्त्र' हें एक अगदीं मूलभूत स्वतःसिद्ध व स्वतंत्र असें शास्त्र नाहीं. म्हणजे ते पूर्वीं तसें नव्हतें व आजहि बहुतांशीं नाहीं. हा दोष मानावयाचा असलाच तर तो मराठी भाषेचा किंवा तिच्यांतील लेखकाचा नव्हे. तिचा उगम व विकास ज्या विशिष्ट परिस्थितींत पूर्वीं झाला व तिचा नवा संसारहि ज्या परिस्थितींत थाटलेला आज दिसत आहे त्या परिस्थितीचाच तो दोष होय. तत्पूर्व प्राकृत भाषाचा झिरप्याझिरप्यातून मराठी जन्मली आणि संस्कृतसारख्या अतिसमृद्ध भाषेच्या दुधावर ती पोसली. त्यामुळें तिच्या बालपणीं तिचे असें निराळें काय असणार ! म्हटलें तर काहीं नाहीं आणि म्हटलें तर सर्व काहीं तिच्याच मालकीचें ! ! पुढे तिच्या तारुण्यातहि तिच्या संसाराची नवी मांडामांड होऊन तिला अस्सल विलायती वळण गेलें शतकभर लागत आहे. त्यामुळें मराठी टीकाशास्त्र म्हणजे संस्कृत साहित्यशास्त्र, मराठी संतांचीं काव्यविषयक काहीं धार्मिक मतें व विलायती टीकावाङ्मय अशी त्रिस्थळी यात्रा आहे. किंवा मूळच्या मराठी सरस्वतीला संस्कृत गंगा व पाश्चात्य वाङ्मय यमुना मिळून त्या तिघींचा झालेला हा त्रिवेणीसंगम आहे असें म्हणावे हवे तर.

## मूळचा संस्कृत प्रवाह

महानुभावापासून पेशवाईअखेरच्या आठशें वर्षांतल्या प्राचीन वाङ्मयाच्या निर्मितीला व तिच्यात मधूनमधून दिसणाऱ्या प्रसंगप्राप्त टीकाशास्त्रीय

विचाराना मूळ आधार व प्रेरणा संस्कृताची आहे. नाहीं म्हणावयास मराठी संत कवींनीं आपले काव्यप्रयोजन, काव्यविषय, कवीची योग्यता व अधिकार यांविषयीं संस्कृत साहित्यशास्त्रकारांहून थोडी वेगळी विचारसरणी प्रसंगोपात्त प्रगट केली आहे. कारण त्याना लोकास परमार्थाची व विशेषतः निवृत्तीची शिकवण द्यावयाची होती. जुन्या मराठींतील कलाकवींनीं मात्र भक्तीची बैठक कायम ठेवून संस्कृत साहित्यशास्त्राचा मागोवा घेत घेतच आपली रचना केली. जुन्या काळीं संस्कृतसाहित्य शास्त्रीय नियमाबरोबर, ‘ प्रासादिक ’ काव्य लिहिण्याचे व ओळखण्याचे ‘ घृतपक्व ’, ‘ तैलपक्व ’ इत्यादि शब्दानी दर्शित काहीं अलिखित संकेतहि रूढ होते. पेशवाई नष्ट होऊन इंग्रजी अमदानींत मराठीला अर्वाचीनत्व येऊं लागले व तिची नवी घडण बनू लागली. त्या वेळीं तिचें टीकाशास्त्र म्हणजे प्रथम सस्कृत साहित्य-शास्त्र व त्याचे जोडीला ‘ संत आणि पंत ’ वाङ्मयानें रूढ केलेले कांहीं नवे सकेत एवढेंच होतें.

## त्याला इंग्रजीनें दिलेलें वळण

इंग्रजी राज्यामुळें व त्याच्याच बरोबर आलेल्या पाश्चात्य संस्कृतीमुळें सगळें महाराष्ट्रीय जीवनच बदलले. त्यामुळें वाङ्मय–निर्मितीचें व वङ्मय-मूल्यमापनाचे सुकाणूं त्या रोखाने पालटत चाललें. माऊंट स्टुअर्ट एल्-फिन्स्टनच्या प्रोत्साहनाने इ. स. १८२० पासून इकडील शिक्षणाबरोबरच इंग्रजी शिक्षणहि एतद्देशीयास हळूहळू मिळू लागलें व या इंग्रजीच्या अध्ययनाने आमच्या इथल्या संस्कृत व मराठी विद्यांच्या अभ्यासाला नवें स्फुरण मिळून एक नवीन वळण लागलें. १८५४ सालात सरकारी विद्या-खात्याची व १८५७ त मुंबई विद्यापीठाची स्थापना झाली व इंग्रजी वाङ्मयाचा वाढता परिचय होऊं लागला. छत्र्यांच्या ‘ बाळमित्रा ’पासून ( १८२८ ) फ्रेंच, इंग्रजी वगैरे ग्रंथांची भाषान्तरें मराठींत होऊं लागलीं. हरि केशवजी याचें ‘ यात्रिक क्रमण ’ ( १८४१ ), अरेबिअन् नाईटस् ( १८६१ ), कोल्हटकराचें अथेल्लो ( १८६७ ), रॉबिन्सन् क्रूसो ( १८७१ ), रासेलस ( १८७३ ), स्कॉटचे ‘ आयव्हॅन ’ ( १८७४ ) इत्यादि भाषान्तरें व रूपान्तरे होऊन इग्रजी पद्धतीची ही निर्मिति व तिच्या रचनेचे नवे विशेष

लोकांच्या नजरेस येऊ लागले. हळूहळू पाश्चात्य टीकाशास्त्राचा प्रवाह मराठी टीकाशास्त्राच्या मूळच्या दोन प्रवाहात मिसळूं लागला आणि त्यानें संस्कृत व जुनें मराठी याच्या अभ्यासाला नवें वळण दिलें व अर्वाचीन मराठीचा संसार माडण्यास सुरुवात केली.

## पुन्हा एकदां संस्कृत

संस्कृत साहित्यशास्त्र स्वभावतःच जुन्या मराठीच्या आरंभस्थानीं होतें, तसेंच तें पुन्हां एकदा–पण जास्त प्रमाणात व जाणिवेनें–मराठीच्या नव्या संसाराच्या आरभीं मिरवूं लागलें. कारण नवें मराठी निर्माण करणाऱ्या नव्या दमाच्या विद्वानात बरेच संस्कृत शास्त्री होते. काहीं अगदीं षट्शास्त्री नसले तरी चागले व्युत्पन्न होते. त्यामुळें त्याचे मनावर सस्कृत साहित्यशास्त्राची छाप असल्यानें त्यानीं त्यातील नियामान्वयेंच मराठी निर्मिति व परीक्षण चालू केले. इ. स. १८५१ पासून अलकार, रस इत्यादि संस्कृत साहित्य-शास्त्राच्या अगोपागावर मराठींत भाषान्तररूप व रूपान्तरित रचना होऊं लागली. कृष्णशास्त्री राजवाडे याचा 'अलंकारविवेक' (१८५३), कृष्णशास्त्री चिपळोणकराच्या 'अनेकविद्यामूलतत्त्व सग्रहा'तील 'वाक्यातले अलंकार' हा निबंध, दाजी जिवाजी प्रधानाचा 'रसमाधव' (१८६८), गणेशशास्त्री लेले याचें साहित्यशास्त्र (१८७२) इत्यादि अनेक ग्रंथ हीं आरंभींचीं थोडीं उदाहरणें होत. संस्कृताश्रय टीकाशास्त्राचा जरूर तेथें अवलंब करून त्याचा व मराठी टीकाशास्त्राचा मूळचा संबंध कायम राखण्याची ही जुनी प्रथा आजतागायत चालू आहे.

## प्राचीन मराठी प्रवाहाचें पुनरुज्जीवन : सन्तवाङ्मय

अर्वाचीन मराठीच्या पहिल्या विकासावस्थेंत जशीं सस्कृत व इग्रजी ग्रंथाचीं भाषान्तरे दिसतात, तशीच जुन्या काव्यग्रंथाचें मुद्रण व पठण ही एक प्रवृत्ति ठळकपणें दिसते. जुन्या संत आणि पंत काव्याच्या मुद्रणाला आरंभ पावस्करशास्त्री यानीं इ. स. १८४० त 'ज्ञानचंद्रोदय' मासिकाच्या द्वारे केला. जुन्या काव्याला मोठी लोकप्रियता मिळवून देण्याचें काम फार रसिकतेनें परशुरामपत तात्या गोडबोले यानीं आपल्या प्रसिद्ध 'नवनीता'-च्या प्रकाशानानें केलें (१८५४). जुन्या काव्यांचे मुद्रण व पद्धतशीर अभ्यास

यांचा हा पायंडा जो एकदां पडला तो आजतागायत चालू आहे. संत-काव्याच्या अभ्यासामुळें कांहीं अभ्यासकांनीं संतकाव्याचीं वाङ्मयमूल्यें आधुनिक मराठीला लावण्याचा प्रयत्न केला असल्यानें या जुन्या वाङ्मयाच्या अभ्यासाचा उल्लेख येथें मुद्दाम केला आहे. माधव चंद्रोबाचा 'सर्वसंग्रह' (१८६०), काव्येतिहाससंग्रह, काव्यसंग्रह इत्यादि मालांतून व मोरोपंत, तुकाराम आदिकरून विशिष्ट कवींच्या काव्यप्रकाशनद्वारें हा संप्रदाय आजहि चालू आहे. दादोबा पांडुरंग (केकावलीवरील 'यशोदापांडुरंगी' टीका १८६५), परशुरामपंत तात्या गोडबोले (केकादर्श १८६७), न्यायमूर्ति मा. गो. रानडे, विष्णुशास्त्री चिपळोणकर (निबंधमाला—मोरोपंत), प्रो. राजारामशास्त्री भागवत, वि. कों. ओक, शं. पा. पंडित, साने, बा. म. हंस, वि. ल. भावे, बा. अ. भिडे, वि. का. राजवाडे, ल. रा. पांगारकर, शं. श्री. देव, प्रो. शि. वि. परांजपे, प्रो. बनहट्टी, डॉ. शं. दा. पेंडसे, आजगावकर, अशी ही प्राचीन वाङ्मयाभ्यासकांची थोर परंपरा आजतागायत अखंडितपणें चालू आहे.

## महानुभाव व शाहीर

संतवाङ्मयाहून जुनें पण अर्वाचीन अभ्यासकाच्या चिकित्सेला अगदी अलीकडे उपलब्ध झालेलें महानुभावी मराठी वाङ्मय हेंहि याच दृष्टीनें लक्षणीय आहे. १९०७ सालापासून या गूढ लिपींत छापलेल्या प्राचीन मराठीकडे संशोधकाचें लक्ष वेधलें गेलें. राजवाडे व भावे यांनीं तें संशोधून उजेडात आणिलें (१९१४–१५). नंतर य. खु. देशपांडे (१९२५), ह. ना. नेने, प्रो. कोलते वगैरे मंडळींच्या परिश्रमानें तो एक अर्वाचीन अभ्यासाचा व चिकित्सेचा विषय झालेला आहे. बहुतेक आद्य महानुभावी ग्रंथकार संस्कृत पंडित व बहुश्रुत विद्वान् असल्यानें त्या वाङ्मयाच्या निर्मितीवर संस्कृत साहित्यशास्त्राचीच छाप आहे. जुन्या मराठींपैकीं एक लौकिक शाखा म्हणजे शाहिरी वाङ्मय. याच्याकडेहि नव्या विद्वानाचें लक्ष १८६९ पासून गेलेलें दिसतें. 'विविधज्ञानविस्तारा'तून प्रथम पोवाडे छापण्यास सुरुवात झाली. १८६९ नंतर निबंधमालाकारानीं त्या वाङ्मय-प्रकारास उत्तेजन दिलें. पुढें आकर्थ व शं. तु. शाळिग्राम यांनीं एक पोवाड्याचें

पुस्तक छापिलें ( १८९१ ). गो. ब. शितूत यानीं आणखी कांहीं पोवाडे प्रसिद्ध केले ( १९०३ ). या वाङ्मयाला प्रतिष्ठा देऊन तो चर्चेचा विस्तृत विषय करण्याचें श्रेय वि. ल. भावे यास दिलें पाहिजे. ( महाराष्ट्र सारस्वत ) पण त्याचा अधिक अभ्यास य. न. केळकर यानीं करून त्यास वाङ्मय-दृष्टया आस्वाद्य बनविलें ( १९२८ ). श्री. म. वर्दे ( १९२९ ) याचेहि या बाबतींत परिश्रम लक्षणीय होत. प्रसिद्ध कवि गडकरी यांनीं शाहिरी वळणाची भाषा प्रयोगपूत केली व स्वातंत्र्यवीर सावरकर यानीं तर आपलें अन्तरग याच वाङ्मयप्रकारानें प्रथम व्यक्त केलें. कवि गोविंद, खाडिलकर इत्यादिकानीं ही पद्धत उचलली व आज हा प्रकार भाषापद्धति, विचारसरणी भावनाविष्कार इत्यादि दृष्टींनीं टीकाकाराच्या अभ्यासाचा चागलाच विषय होऊन राहिला आहे.

### पाश्चात्य प्रवाहाचा वरचष्मा

प्रारंभीं हे मराठी टीकाशास्त्राचे तीन प्रवाह होते. त्यात प्रथम तरी संस्कृत साहित्यशास्त्राचा प्रवाह बलवान् होता. पण पुढें या बलवान् प्रवाहावर दोन्हीहि प्रवाहाकडून हळूहळू आक्रमण होऊ लागलें. जुन्या मराठीचे अभिमानी सतकाव्याचा पक्ष उचलून धरून संस्कृताचा पाणउतारा करूं लागले. याची थोडी चाहूल ' यशोदा पाडुरंगी ' च्या प्रस्तावनेंत ( पृ. ४१ ) लागत असली तरी प्रो. रा. रा. भागवत याच्या ' अलंकारमीमासेंत ( १८९३ ) या प्रवृत्तीचें कडक स्वरूप दिसून येतें. भक्तिरस न मानण्याबद्दल, शृंगार व श्लेष याच्या अतिरेकाबद्दल व ' रिकामटेकडे 'पणाबद्दल संस्कृत कवींची शास्त्रीबोवांनीं हजेरी घेतली आहे. संतकाव्याच्या अभिनिवेशानें संस्कृताला हीन लेखण्याची प्रथा अद्यापहि पाहावयास सापडते. इग्रजी विद्येनें दिपून जाऊन ' लोकहितवादीं 'नीं सस्कृतला धुतकारून टाकिली. पण हा एकातिक अपवाद सोडला तरीहि संस्कृत साहित्यशास्त्राच्या गुणवत्तेबद्दल योग्य तो आदर बाळगून सुद्धा त्याच्या उणीवा दाखवून देण्याचें कामहि दुसरीकडून हळूहळू चालूं झालें. इग्रजींतील किंवा इतर पाश्चात्य देशातील टीकाशास्त्राच्या दृष्टीने पाहिल्यास संस्कृत साहित्यशास्त्रातील कांहीं व्यगें स्पष्ट होतात हें खोटें नाहीं. व अशी तक्रार खुद्द ' निबंध-मालाकारा 'नीं आपल्या

'कविपंचक' या निबधाच्या प्रस्तावनेत केली आहे. ही कुरबूर सारखी चालू असून 'काव्यचर्चा' ( १९२६ ) या टीकालेखाच्या संग्रहात समाविष्ट केलेल्या प्रो. म. म. जोशी याच्या 'काव्य व संस्कृत साहित्यशास्त्र' या लेखापर्यंत ती स्पष्ट दिसून येते. सस्कृत साहित्यशास्त्राच्या वाढींतील मूलभूत एकागीपणा, त्याचा जिवंत काव्यव्यवहाराशीं झालेला विश्लेष व पाश्चात्य वाङ्मयाच्या धर्तीवर द्रुतगतीनें चाललेली मराठी निर्मिति व तसलेंच मूल्य-मापन यामुळे सस्कृत टीकाशास्त्र झपाट्यानें मागें पडूं लागलें. सतकाव्यातील मूल्यांची स्थिति याहीपेक्षा वाईट झाली व तेहि मागें रेटले गेले. व या दोन प्रवाहांस काखोटीस लावून पाश्चात्य टीकाशास्त्र मराठीवर एकटेंच हळूहळू प्रभुत्व गाजवू लागलें.

## तीन प्रवाहांचा प्रीतिसगम

वर सांगितल्याप्रमाणें मराठी टीकाशास्त्राचे इतर दोन प्रवाह मागें पडून पाश्चात्य वाङ्मय टीकाशास्त्राचें प्रभुत्व स्थापित होण्यापूर्वीं मध्यंतरीं बराच काळ गेला. ठोकळ मानानें कालखड पाडूनच सागावयाचे झाल्यास १८२० ते १८७० पर्यंत सस्कृत साहित्यशास्त्र पूर्णपणे प्रभावी होतें. या कालखंडा तील वाङ्मयपरीक्षण करणाऱ्या टीकाकारापुढे संस्कृत नियम होते. रा. ब. दादोबा पाडुरग यानीं मोरोपंताच्या केकावलीवर लिहिलेली टीका मल्लिनाथाच्या टीकेसारखी अमरादि कोश, व्याकरण, अलंकार, रस इत्यादि परिभाषेनें मंडित असून अर्थविवरणात्मक आहे. इ. स. १८७० पासून मात्र त्यात इग्रजी टीकाशास्त्रीय व सन्तवाङ्मयीन दृष्टिकोण मिसळूं लागले. रावबहादुर रानडे याचा त्याच 'केकावली'—वरचा अभिप्राय व त्यावर निबधमालाकारानीं दिलेले उत्तर हीं दोन्ही या स्थित्यतराचीं निदर्शक आहेत. काव्यातील निव्वळ शब्दार्थाच्या बाहेर पडून कवीचा काल, त्याचें व्यक्तिमत्त्व, काव्यविषयाचे औचित्यानौचित्य याचा विचार ग्रथपरीक्षणात व्हावा लागतो, या गोष्टीची जाणीव ही पाश्चात्य दृष्टिकोणाची निदर्शक असून धर्मप्रवण जुना कवि म्हणून त्याबद्दलचा अभिमान हा सन्तवाङ्मयीन दृष्टि-कोण दाखवणारा आहे. उत्तरोत्तर या तीन प्रवाहाचें मधुर मिश्रण होऊन तें ग्रंथपरत्वें व टीकाकारवृत्तिपरत्वे कमी-अधिक प्रमाणात एकत्र नादूं लागलें.

त्याच ‘ केकावली ’चें पुनः एकवार उदाहरण द्यावयाचे तर प्रो. श्री. वि. पराजपे यांनीं १८९७ सालीं लिहिलेली ‘ केकावली ’वरील अतिप्रचंड टीका ( पुढील आवृत्त्यातून सुमारें ९०० पानाची ) म्हणजे सस्कृत, जुने, मराठी व इग्रजी या तीन भाषातील काव्यशास्त्रीय विचाराची एक मातबर उतारपेठच होय. हा टीकाप्रवाहाच्या संमिश्रणाचा काल १८७० ते सरासरीने १९२० पर्यंत मानता येईल. या कालखडाला ठोकळ मानाने ‘ निबधमाला-युग ’ म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. ‘ सस्कृत कविपचक ’ ( १८७२–७४ ), ‘ ग्रंथावरील टीका ’, ‘ विद्वत्त्व व कवित्व ’, ‘ भाषापद्धति ’, ‘ मोरोपताची कविता ’ इत्यादि ‘ निबधमाले ’तील टीकालेखानीं व काहीं ग्रथाच्या प्रत्यक्ष परीक्षणानी शास्त्रीबोवानीं या मराठी समिश्र टीकापद्धतीच्या तत्त्वाचा व व्यवहाराचा भक्कम पायाच घातला असे म्हटल्यानें अतिशयोक्ति होणार नाहीं.

## तेव्हांच्या टीकेचें भांडवल

या कालांतील टीकाकारापुढे रामदास–तुकारामादि संतांनीं घातलेले काव्याविषयक दंडक, मम्मट, विश्वनाथ, पडित जगन्नाथादि सस्कृत काव्य-मीमासक व त्या त्या काळच्या विश्वविद्यालयीन अध्ययनात येणारे पाश्चात्य लेखक व टीकाकार याचे नियम असत. पाश्चात्य टीकाकारापैकीं ‘ पोएटिक्स् ’-चा प्रसिद्ध आद्यलेखक ग्रीक तत्त्ववेत्ता ॲरिस्टॉटल, व्हर्जिल आणि ड्रायडन्, जॉनसन्, कोलेरिज् वगैरे शेक्स्पिअरचे टीकाकार, मॅथ्यू ॲर्नोल्ड, ॲडिसन्, पोप व वर्ड्स्वर्थ, रस्किन्, ब्रॅडर मॅथ्यूज व मेकॉले ही मंडळी टीकालेखनाला प्रामुख्याने प्रेरक दिसतात.

या काळातील वाङ्मयनिर्मितीला प्रेरक असणारे पाश्चात्य लेखक पुढील-प्रमाणे––होमर, डाटे, मिल्टन्, शेक्स्पियर, शेरिडन्, मोलिअर, स्कॉट्, ड्यूमा, बायरन्, शेले, कीट्स्, वर्ड्स्वर्थ, ब्राऊनिंग, टेनिसन्, वगैरे. कोठलाहि टीकालेख सजवावयाचा म्हणजे वर दिलेल्या पाश्चात्य लेखकाचा नामोच्चार त्यात हटकून व्हावयाचाच हा त्या कालखडाचा विशेष आहे. व्यास, कालिदास, भवभूति, होमर, डाटे, ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम हे कवि व मेकॉले, जॉनसन् वगैरे टीकाकार आलटूनपालटून कोठें ना कोठें तरी अवतरणरूपाने सापडावयाचेच. याचा उत्तम नमुना म्हणजे रा. सा.

गो. वा. कानिटकर यानीं १९०९ मध्यें रे. टिळकाच्या ‘ वनवासी फूल ’ या छोट्या काव्याला लिहिलेली इंग्रजी शिफारस व प्रो. श्री. नी. चापेकर याची कोणतीहि प्रस्तावना !

## प्रीतिसंगमावरील टीकाकार

इ. स. १८७० ते १९२० या कालातील समिश्र टीकापद्धतीच्या अन्तःप्रवाहाची घटना, त्याची अन्योन्यावरील क्रियाप्रतिक्रिया व त्याचें सापेक्ष बलाबल याची कल्पना देण्यासाठी त्या काळच्या टीकाकाराचा नामनिर्देश वर्गवारीनें करतों. सदर काळात संस्कृत शास्त्रीमंडळींची संख्या बरीच घटली होती. तरीहि या कालखंडाच्या उत्तर भागामध्ये पारखीशास्त्री, पंडित रंगाचार्य रड्डीशास्त्री, लक्ष्मणशास्त्री लेले, हुपेरकरशास्त्री इत्यादि संस्कृत पंडित आहेत. पागारकर, भारदे, भिंगारकर, गं. श्री. देव, आंजगांवकर इत्यादि संतवाङ्मयभक्त आहेत व प्रो. वा. बा. केळकर, प्रो. वा. ब. पटवर्धन, प्रो. रा. कृ. लागू वगैरे इंग्रजी वाङ्मयाचे प्राध्यापकहि मधूनमधून विरलपणानें का होईना—दिसत आहेत. इतिहाससंशोधनाच्या अभिनिवेशानें प्रेरित झालेले वि. का. राजवाडे, भावे, पोतदार, प्रो. न. र. फाटक, सामाजिक सुधारणेच्या तळमळीनें जुने नवे मराठी अभ्यासिणारे डॉ. केतकर, प्रा. माटे, प्रो. शेजवलकर, संस्कृति व अध्यात्मशास्त्र या दृष्टीनें प्रेरित झालेले डॉ. पेंडसे व प्रो. रा. द. रानडे, राजकारणातील एकजुटीच्या दृष्टीनें मराठी भाषा व जुन्या नव्या महाराष्ट्रवाङ्मयांचीं मूल्ये याचा प्रसंगोपात्त विचार करणारे लोकमान्य टिळक, प्रो. शि. म. परांजपे, खाडिलकर, अ. ब. कोल्हटकर इत्यादि मंडळी चमकत आहेत. याशिवाय या किंवा इतर वृत्ति व कल ज्याच्यामध्यें कमीअधिक प्रमाणात निगूढ किंवा प्रकटपणें वसत आहेत, व म्हणून ज्याना चतुरस्त्र रसिक व निर्भेळ वाङ्मयीन दृष्टीनें मराठी टीकाशास्त्र-प्रांगणांत उतरलेले समतोल टीकाकार असें म्हणता येईल असे विद्वान् तर बहुसंख्य आहेतः—गुंजीकर, वि. मो. महाजनी, चिं. वि. वैद्य, मा. व्यं. लेले, ( संस्कृत नाटके—‘ सार व विचार ’ याचे लेखक. ) ग. ज. आगाशे, न. चिं. केळकर, श्री. कृ. कोल्हटकर, ह. ना. आपटे, खा. म. जोशी, वा. गो. आपटे, श्री. नी. चापेकर, कृ. ना. आठल्ये,

दा. ना. आपटे, ना. गो. चाफेकर, ग. मो. गोरे, पा. वा. काणे, वा. अ. भिडे, मा. ह. मोडक, वि. वा. भिडे, रा. भि. जोशी, ना. कृ. गद्रे, डॉ. पा. दा. गुणे इत्यादि.

## संगमापूर्वीची खळबळ

या काळच्या काहीं टीकाकारांमधील अभिनिवेशानें म्हणा किंवा प्रामाणिक मतप्रदर्शनाच्या कठोरपणानें म्हणा, या तीनहि प्रवासाच्या वाङ्मयमूल्याबद्दल तीव्र स्वरूपाच्या क्रिया व प्रतिक्रिया झाल्या आहेत. कोणी संतवाङ्मयास टाळकुटयाचें नेभळट वाङ्मय म्हणावें (राजवाडे), तर त्यालाच कोणी 'परभृत' किंवा 'परपुष्ट' म्हणून हिणवावें (प्रो. वा. ब. पटवर्धन), कोणी संस्कृताला जुनाट, एकांगी, कृत्रिम, नटवे व शृंगारी म्हणून कमी लेखावें, तर कोणी अर्वाचीन मराठीला पोरकट, लौकिक व थिल्लर म्हणून धिःकारावें तर कोणी इंग्रजीला बाटगी, परकी, जडवादी किंवा आधिभौतिक आणि बाह्यागलक्ष्यी म्हणून दूर लोटावें असे चाललें होतें. असे हे एकान्तिक अधिक्षेप वगळले तर प्रत्येक प्रवाहातील चांगलेपणाचा आदर करून त्याचा पुरस्कार कृतीनें करणाऱ्या समतोल टीकाकाराचा वर्ग फार मोठा होता. जुने मराठी, संस्कृत व इंग्रजी यातून नव्या मराठीच्या परिपोषाला आवश्यक तीं तत्त्वें उचलून आपला वाङ्मयीन व्यवहार चालवावा ही समजुतदारपणाची दृष्टीच या कालात प्रामुख्यानें दिसते व तीच या कालातील मराठी टीकावाङ्मयाच्या संपन्नतेला व वर्धिष्णुत्वाला कारणीभूत झाली आहे.

## पहिल्या टीकायुगाचे आदर्श ग्रंथ

मात्र या कालातील संमिश्र टीकापद्धतीला साजेल असें मराठी टीकावाङ्मय स्वतंत्र टीकाग्रंथाच्या रूपानें फारसें झालें नाहीं. जे ग्रंथ झाले ते केवळ संस्कृत साहित्यशास्त्रावरील अलकार–रस–दोष इत्यादि अंगोपागावरच. उदाहरणार्थ—माकोडे याचा 'रस-प्रबोध' (१८९२), केमकराचा 'अलंकारविकास' (१८९६), लक्ष्मणशास्त्री लेले याचा 'अलंकारप्रकाश' (१९०५), ग. म. गोरे याची 'काव्य–दोष–दीपिका' व अलंकारचंद्रिका' (१९०८) वगैरे. नाहीं म्हणावयास न. चिं. केळकर यानीं 'सुभाषित आणि विनोद' हा एक छोटासा हास्य–विनोदमीमांसा-

विषयक ग्रंथ १९०४ मध्यें लिहिला. त्यांत त्यांनीं पाश्चात्य व पौरस्त्य म्हणजे संस्कृत व नवें-जुनें मराठी वाङ्मय यातील हास्यरसाच्या कल्पनाचा परामर्ष घेऊन स्वतंत्र बुद्धीनें मार्मिक विवेचन केले आहे. पागारकराचें 'मोरोपंताचें चरित्र आणि काव्यविवेचन' (१९०८) हा या कालातील एका जुन्या मराठी श्रेष्ठ कवीवर हृदयंगम व चतुरस्त्र वृत्तीने लिहिलेला आदर्श टीकाग्रंथ आहे. 'भाषांतर युग' संपून—इंग्रजी वाङ्मयाच्या प्रेरणेनेंच का होईना पण—पाश्चात्य बाह्यांगाची व मराठी अंतरंगाची स्वतंत्र रचना मराठींत ठळकपणें १८७५ पासून होऊं लागली. तिचा क्रम असा:—

निबंध (१८७४), चरित्रें (१८७६), नाटकें (१८८०), कादंबरी (१८८५), लघुकथा (१८९१), काव्य (१८९२), विनोद (१९०२), नाट्यछटा (१९११), लघुनिबंध (१९३०), स्वभावचित्रें (१९३४).

## तेव्हांची टीकाकारत्रयी

तथापि या विविध वाङ्मयप्रकाराची तंत्रविषयक चर्चा करणारी सागोपाग व स्वतंत्र टीकापुस्तकें या कालात निर्माण झालीं नाहींत. तसेंच ललित वाङ्मयाच्या मूलभूत तत्त्वाची सर्वव्यापी टीकाहि या काळीं स्वतंत्रपणें झाली नाहीं. नाहीं म्हणावयास का. बा. मराठे यानीं 'नॉवल व नाटकें' यावर एक छोटा पण उद्बोधक प्रबंध १८७२ सालीं लिहिला. त्यांत इंग्रजी व संस्कृत टीकापद्धतीचा तुलनात्मक विचार थोडाबहुत आहे. वि. का. राजवाडे यानीं 'कादंबरी' या प्रकारावर एक व्यापक आणि ऐतिहासिक पर्यालोचनात्मक निबंध लिहिलेला आढळतो (१९२८). ह. ना. आपटे याची 'विदग्ध वाङ्मय' चर्चाहि मार्मिकपणाची आहे (१९१२); पण याचा अर्थ वरील पद्धतीच्या टीका अगदींच होत नव्हत्या असें नव्हे. त्या स्वतंत्र ग्रंथरूपानें होत नसल्या तरी प्रसंगवशात् स्फुटरूपानें होत असत. आणि हे प्रसंग म्हणजे ग्रंथसमीक्षणें व प्रस्तावना. शिवाय साहित्यसंमेलनें, नाट्यसमेलनें व इतर वाङ्मयविषयक समारंभ (पुण्यतिथ्या, उत्सव वगैरे) यांच्या अध्यक्षाचीं भाषणें, प्रासंगिक वादविवाद, इत्यादींच्या निमित्तानें

पुष्कळच टीकावाङ्मय या काळात निर्माण झालें. न. चिं. केळकर, श्री. कृ. कोल्हटकर, बा. अ. भिडे हे तीन विद्वान् व सव्यसाची साहित्यसेवक या काळांतले प्रमुख टीकाकार होत. एकट्या केळकरांनीं १९३२ पावेतों ४२ प्रस्तावना लिहिल्या असून, पुस्तकपरीक्षणें व वाङ्मयविषयक टीकालेख अनेक लिहिले आहेत. त्याचीं अध्यक्षीय व स्वागताध्यक्षीय भाषणेंहि अशींच गाजलीं आहेत. ' केसरी 'सारख्या प्रमुख पत्राच्या संपादकत्वाचें फार मोठें अधिष्ठान त्याना लाभलें व ते त्याच्या वाङ्मयसेवेला प्रेरक व पोषकहि झालें. हा लाभ श्री. कृ. कोल्हटकराना व बा. अ. भिडे याना नसला तरी त्यांनीं घातलेली टीकावाङ्मयातील भर ( कोल्हटकर लेखनसग्रह १९३२ ), विस्तार व गुणवत्ता या दृष्टींनीं त्याच तोलाची आहे.

## मासिकें व टीका

या व इतर टीकाकाराचीं बरींच परीक्षणें मासिक पुस्तकातून प्रगट होत. ' विविधज्ञानविस्तार ' ( १८६७ ) हें ज्येष्ठ, भारदस्त व पंडितप्रिय मासिक या मराठी टीकावाङ्मयाचें अधिष्ठान होय. याच्या जोडीला मित्राचें मासिक मनोरंजन ( १८९५ ), नवयुग ( १९१३ ), लोकशिक्षण ( १९१२ ), रत्नाकर ( १९२५ ), करमणूक ( १८९० ), चित्रमय जगत्, ( १९१० ) इत्यादि मासिकानीं या कामीं चागलाच हातभार लाविला आहे. त्या काळचे बहुतेक सर्व टीकाशास्त्रीय वाङ्मय असें प्रासंगिक व विखुरलेले आहे. त्याला स्वतंत्र ग्रंथाचें स्वरूप न येण्याचें कारण मराठी टीकावाङ्मय हे स्वतत्र शास्त्र म्हणून प्रतिष्ठित मानलें जात नसावें, किंवा असा स्वतंत्र ग्रंथ छापण्याला लेखक किंवा प्रकाशक धजले नसावेत किंवा इतरहि काहीं कारण झालें असावें. स्वतंत्र ग्रंथनिर्मिति झाली नाहीं येवढी गोष्ट खरी. वास्तविक कोल्हटकरानीं केलेलें ' तोतयाच्या बंडाचें ' परीक्षण ( १९१४ ) हें नाट्यरचनेवरील पुस्तक व्हावयाचा योग्यतेचें; पण परीक्षण-रूपात तें पडून राहिलें.

## जुन्या युगाचा अपुरेपणा

आता मराठी टीकाशास्त्राच्या नव्या युगाचें ( १९२० ते १९४४ ) समालोचन करावयाचें. येथवर जुन्या युगाबद्दल ( १८७० ते १९२० )

बोलताना त्यातील तीन प्रवाह, त्याचे मीलन–मिश्रण, त्याच्या एकमेकां-वरील क्रिया–प्रतिक्रिया व त्याचे प्रातिनिधिक टीकाकार इत्यादींचा त्रोटक उल्लेख केला. तो नुसता धावता ऐतिहासिक आढावा होता. आता नव्या युगाला प्रारंभ करण्यापूर्वी जुन्या युगातील काही उणिवा व अपुरेपणा दाखवितो. संस्कृत साहित्यशास्त्रानेंच प्रत्यक्ष किंवा परंपरया मराठी टीका-शास्त्राला आपल्या कुशींतून जन्म दिला. या संस्कृत साहित्यशास्त्रांत काव्य-नाटकादि ललितवाङ्मयाचें अन्तरंग व बाह्यांग यांची नियामक अशीं सर्व सामान्य तत्त्वें सांगितलेलीं असतात. ( उदाहरणार्थ— रस, ध्वनि, वक्रोक्ति इत्यादि काव्याच्या अन्तरंगाची प्राणभूत तत्त्वे व अलंकार, गुण, रीति, दोष इत्यादि बाह्यांगाचीं तत्त्व ) हीं तत्त्वे विवरून सांगताना त्या त्या तत्त्वापुरतीं सुटीं उदाहरणें दिलेलीं असतात. हा झाला तात्त्विक भाग. या भागाचे टीकाकार अभिनवगुप्त, आनंदवर्धन, वामन, धनंजय, मम्मट, विश्वनाथ, जगन्नाथादि अनेक आहेत. आता साहित्यशास्त्राचा व्यावहारिक भाग म्हणजे वरील तत्त्वें कवींच्या समग्र कृतींना लावून दाखविणें. हे काम करणारे संस्कृत टीकाकार म्हणजे दक्षिणावर्त, मल्लिनाथ, राघवभट्ट, काटयवेम, नीलकंठ, स्थिरदेव, नरहरि, सीताराम इत्यादि होत.

## टीका म्हणजे अर्थविवरण

हे दुसऱ्या प्रकारचे टीकाकार काव्यगत श्लोकाचें किंवा नाटक-कादंबरी-चम्पू वगैरे कृतींतील काठिण्य दूर करून त्याचा अर्थ विशद करणें हेच आपलें मुख्य काम समजतात. व ते करतांना व्याकरण, कोश, अलकार इत्यादि शास्त्राचें व राजनीति, अर्थशास्त्र, धर्मशास्त्र, पुराणेतिहास याचें साहाय्य घेतात. या पद्धतीला नुसती अर्थविवरणात्मकपद्धति ( Explanatory method ) म्हणता येईल. हीच पद्धति मराठींतील जुन्या व नव्या टीकाकारापुढें होती. जुन्या टीकाकारानीं म्हणजे मुकुंदराज, ज्ञानदेव, एक-नाथ, वामनादि मंडळींनीं त्या टीकेला कधीं भाष्याचे, कधीं व्याख्यानाचें तर कधीं प्रवचनाचें विस्तृत स्वरूप दिलें. स्वाभिप्राय प्रकटनार्थ उपमा-दृष्टान्त वापरले, व मूळचा अर्थ खुलविला व फुलविला. अर्वाचीन मराठी युगात खुद्द मराठी ग्रंथावर मराठी टीका करताना सुद्धां मल्लिनाथ पद्धतीचाच

अवलंब केला गेला. ( उदा. ‘ केकावली ’ वरील दादोबा पांडुरंगी ). नव्या मराठींत संस्कृत साहित्यशास्त्राच्या तात्त्विक भागाचें भाषांतर किंवा रूपांतर करताना मराठी संस्कार असा कोणता केला गेला म्हणाल, तर काहींनीं संस्कृत लक्षणांचीं उदाहरणें मराठी काव्यांतील दिलीं एवढेंच. अगदीं थोड्यांनीं स्वतंत्र विचार सांगितले आहेत. ( उदाहरणार्थ, राजारामशास्त्री भागवत, मार्कोंडे इत्यादि, संस्कृतांतून आलेल्या या दोन्ही प्रकारच्या टीका अर्वाचीन दृष्टीनें अर्थातच अपुऱ्या वाटूं लागल्या हें साहजिकच झालें.

## टीकाशास्त्र वाङ्मयानुसारी पाहिजे

संस्कृत टीकाकारानीं—मग ते काव्यतत्त्वमीमांसक असोत किंवा काव्यार्थ-विवरणकार असोत—काव्य किंवा नाटक ही एक समग्र, संघटित व एकजीव वस्तु क्वचितच मानलेली दिसते. शिवाय कवीला त्या समग्र वस्तूतून सांगावयाचें किंवा सुचवावयाचें तत्त्वज्ञान, त्याचा विशिष्ट दृष्टिकोन, त्याचें व्यक्तिमत्त्व, त्याच्या काळची परिस्थिति, व तिचे त्याच्या कृतीवर झालेले परिणाम, त्या कवीवर पडलेली पूर्वकवींची छाप, त्याच्याच निरनिराळ्या कृतींतून झालेला विकास इत्यादि अनेक महत्त्वाच्या गोष्टी या टीकाकाराच्या नजरेतून अजिबात निसटल्या आहेत. नाटकांतील स्वभावपरिपोष, विशिष्ट संविधानक रचना, कवीकवींतील तारतम्य विचार इत्यादि भागहि व्हावा तसा त्याचे हातून वठला नाहीं. ग्रीक कवींच्या व नाटककाराच्या नमुनेदार कृतींतून निघणारे कलाविषयक सामान्य नियम हेच सर्वथा अनुकरणीय असल्याने पुढील सर्व कलाकृती त्या नमुन्याबरहुकूम तपासून पाहावयाच्या हा जसा पाश्चात्य टीकाशास्त्राचा एक मोठा संप्रदाय काहीं काळ होता, तसाच तो संस्कृतात नेहमींचाच होता. भरतमुनीचे नाट्यनियम, महाकवींचे व आदर्श नाटककाराचे नमुने नजरेसमोर ठेवून शास्त्रे रचावयाची व त्या शास्त्रानुसार काव्यनाटकावर मते द्यावयाचीं अशी न्यायनिवाड्याची म्हणजे ‘ Judicial ’ पद्धत संस्कृतात होती. पण वाङ्मय हें हरघडीं बदलणाऱ्या मानवी जीवनाचें प्रतिबिंब असल्यानें व टीकाशास्त्र हें वाङ्मयानुसारी असल्यानें एका जुन्या काळची अभिरुचि अखडपणे पुढील कालखंडावर लादणें म्हणजे जीवनाचे

व वाङ्मयाचे गतिमत्त्व न ओळखणे होय. अर्थात् जीवनप्रवाहाची गतिमत्ता न ओळखणाऱ्या शास्त्राला जीवनहि जुमानीत नाहीं हे ओघानेंच आलें व हीच स्थिति संस्कृत साहित्याची झाली.

## वाङ्मय पाश्चात्य तर टीकाहि पाश्चात्यच

महाराष्ट्राच्या स्तंभित जीवनाला इंग्रजी राज्याने जी नवीन गतिमत्ता आली ती तर क्रांतिकारकच ठरली. या क्रांतीच्या काळात नवे विचार व नवें वाङ्मय झपाट्यानें निघू लागलें. त्यामुळें नवीन टीकाशास्त्राची आवश्यकता भासूं लागली. ती भागवणे संस्कृतावलंबी टीकाशास्त्राला शक्य नव्हतें. नाटकें, लघुकथा, कादंबऱ्या, काव्य, निबंध, नाट्यछटा इत्यादि सर्वच वाङ्मयप्रकार जर पाश्चात्य वळणाचे तर त्याचीं नियामक तत्त्वें पाश्चात्य हें क्रमप्राप्त झाले. त्यामुळें संस्कृत व जुने मराठी यातील बाह्यांगविषयक ( Formal ) टीका निरुपयोगी ठरली. अन्तरंगविषयक टीका वर सांगितल्याप्रमाणें अगदीं निरुपयोगी नसली तरी अपुरी पडू लागली. व म्हणून पाश्चात्य पद्धतीचीं टीकातत्त्वेच मराठी टीकाशास्त्रात सामील होऊन आजचे मराठी टीकाशास्त्र म्हणजे पाश्चात्य पद्धतिप्रधान टीकाशास्त्र होऊन बसलें आहे. १८८५ पासून पुढे दर दशकादशकात ही प्रवृत्ति एकसारखी वाढत चाललेली दिसते.

१८८५ पासून १९१५ पर्यंत पाश्चात्य टीकाशास्त्राची वाढती छाप मराठीवर जरी पडत होती तरी तिच्यामध्यें आधुनिक युगाची व्याप्ति, खोली, चतुरस्रता व सर्वांगीणता आलेली नव्हती. या युगात टीकेला प्रायः विध्वंसक स्वरूप होतें. त्या वेळचा टीकाकार म्हणजे जणू काहीं साहित्य-क्षेत्रातील एक Public Prosecutor होता. त्या वेळच्या टीकेला विधायकता फार कमी होती. शिवाय वाङ्मयटीका ही एक स्वतंत्र कला-निर्मिति मानली जात नसे. तिसरा दोष म्हणजे वाङ्मयीन कसोटी हेंच त्या वेळच्या टीकाकाराचे भांडवल होतें. काव्याशीं सामाजिक जीवनाचा संबंध जोडून त्याचें परीक्षण करण्यात येत नसे.

## नव्या युगाच्या वाढत्या अपेक्षा

१९१४–१५ पासून विश्वविद्यालयीन अभ्यासक्रमात एकाच विषयाचा

अधिक व सांगोपांग अभ्यास व्हावा यासाठीं बी. ए. परीक्षेंत सन्मानशाखा ( Honours Course ) निर्माण करण्यांत आल्यानें भाषाविषयांत टीकाशास्त्र असेंच. पण पुढें इंग्रजीच्या अभ्यासक्रमांत एम्. ए. परीक्षेला पाश्चात्य टीकाशास्त्र हा एक स्वतंत्र अभ्यासाचा विषय म्हणून नेमण्यांत आला आणि मराठी सन्मानशाखा निघून तिच्यामध्यें टीकाशास्त्र नेमलें गेलें. त्यामुळें विश्वविद्यालयीन विद्वानाचें टीकाशास्त्रविषयक ज्ञान सखोल व व्यापक झालें. वाङ्मय निर्माण करणारे साहित्यिकहि पाश्चात्य टीकेच्या तत्त्वांचे व तंत्राचे अभ्यासक बनले. त्यामुळें टीकाकारांनाहि टीकाशास्त्राचा पायाशुद्ध अभ्यास आवश्यक झाला. या कारणानें टीकाशास्त्राचें स्वरूप, त्याचें प्रयोजन, त्याची व्याप्ति, टीकाशास्त्राचे भिन्नभिन्न संप्रदाय, नवीं नवीं मतें, या सर्वांचें व्यापक अध्ययन सुशिक्षितांत होऊं लागलें व मराठींत टीकाशास्त्राची लांबी, रुंदी व उंची पूर्वींपेक्षा कितीतरी पट वाढली.

१९२० ते १९४४ या कालांत मराठी टीकाशास्त्राला असा हा घाट आलेला दिसतो. शिवाय मराठींत मानसशास्त्र, इतिहास, राजशास्त्र, तत्त्वज्ञान, अर्थशास्त्र, सौंदर्यमीमांसा, समाजशास्त्र, तर्कशास्त्र इत्यादि शास्त्रांचा अभ्यास वाढला असल्यानें वाङ्मयनिर्मितीला थोडें अधिक रेखीव व शास्त्रीय वळण लागलें आहे. व म्हणूनच आजच्या टीकाकाराला वरील शास्त्रांची थोडी तरी ओळख करून घेणें आवश्यक झालें आहे. कारण त्याजबद्दलच्या अपेक्षाच आज वाढल्या आहेत. एका टीकाशास्त्राशीं इतर अनेक शास्त्रांचा संबंध आज कसा येतो याचें एक फ्रेंच उदाहरण सांगण्यासारखें आहे. अनातोल फ्रान्स हा प्रसिद्ध टीकाशास्त्रज्ञ एम्. क्युव्हिलिअर फ्ल्यूरी या टीकाकाराकडे एकदा गेला असतां त्यानें आपल्या यजमानाची लायब्ररी सहज पाहिली तों तेथें त्याला इतिहास, तत्त्वज्ञान, वक्तृत्वशास्त्र, अर्थशास्त्र, मानसशास्त्र इत्यादि शास्त्रांवरील ग्रंथच आढळून आले ! टीकाशास्त्रावरचा ग्रंथ तर तेथें दिसेना. म्हणून अनातोल फ्रान्सनें आपल्या यजमानास आश्चर्यानें विचारलें, ' कां हो ! येथें टीकाशास्त्राचा एकहि ग्रंथ नाहीं हें कसें ? यावर फ्ल्यूरी म्हणाला, ' टीकाशास्त्रीय ग्रंथांत निराळें असें याव्यतिरिक्त काय असतें ? '

## आजच्या टीकेची व्याप्ति

तात्पर्य, आजच्या युगांत इतर शास्त्राच्या वाढीमुळें टीकाशास्त्राच्या व्याप्तीचीहि तशीच वाढ झालेली दिसते. बाह्य जगांतील एखाद्या वेधक प्रसंगाचें ज्ञान ( Perception ) ज्ञानेंद्रियद्वारां कवीला झाल्यानंतर त्याच्या विशिष्ट घटनेच्या मनावर त्या प्रसंगाची भावनात्मक प्रतिक्रिया कशी होते ? पाहिलेलीं दृश्यें व त्याचे परस्परसंबंध यावर कवीच्या कल्पनेचे, बुद्धीचे व भावनांचे कोणते संस्कार होतात ? त्यामुळे मूळ दृश्य किती व कसे पालटतें ? या दृश्यामुळे हललेलें कविहृदय शब्दात व्यक्त कसें व का होते ? त्याला कोणता व कसला आकार ( Form ) येतो ? या शब्दमय व विशिष्ट आकारयुक्त कविहृदयाकडे ( म्हणजे ललितकृतीकडे ) रसिक का वळतो ? ललितकृतीचे परिशीलन चालू असता काव्यगत भावना रसिकाच्या मनात कशा संक्रान्त होतात ? व त्याचे ठिकाणीं रस कसा निर्माण होतो ? इत्यादि अनेक प्रश्न—म्हणजे कवीचे मनोगत रसिकापर्यंत येऊन पोहोचेपर्यंतच्या सर्व मानसिक प्रक्रिया व त्याचीं आतर व बाह्य कारणे—हा सर्व आजच्या टीका-शास्त्राचा विषय आहे. यात जसे ललितवाङ्मयाचें स्वरूप, प्रयोजन व कार्य याबद्दलचे तात्त्विक प्रश्न येतात, तसेंच काव्य, नाटक, कथा, कादंबरी, इत्यादि वाङ्मयप्रकाराच्या तंत्राचे व्यावहारिक प्रश्नहि येतात. प्रतिभा, कल्पना, भावना, प्रज्ञा, व्यक्तिमत्त्व ( Personality ) इत्यादि कवि आणि रसिक याच्या अतरगाची चर्चा यात जशी समाविष्ट होते, त्याच-प्रमाणें ही कवीचीं आणि रसिकाचीं विशिष्ट अतरगें घडविणाऱ्या बाह्य परिस्थितीची—गत व वर्तमान सामाजिक, धार्मिक, राजकीय इत्यादि परि-स्थितीची—चर्चाहि त्यात अतर्भूत होते. सर्जन ( Creation ) आणि परीक्षण ( Criticism ) या दोन्हीहि क्रिया कलावंताच्या मनात जरी समकालच व अबोधपूर्व चाललेल्या असतात, तरी कलाकृतीच्या आस्वादकालीं जाणिवेनें शब्दमय व चिकित्सक अभिप्रायाचें रूप घेऊन बाहेर पडणाऱ्या परीक्षणालाच ‘ टीका ’ म्हणतात. अशी टीकाबुद्धि मानवात का उत्पन्न व्हावी येथपासून टीकाशास्त्राला आरंभ होतो. व पुढें त्याला अनेक शाखा फुटतात.

## टीकाकारांचे वर्ग

ललितकृतीवर बोलतांना आपलेच मनोगत व्यक्त करण्याचें एक निमित्त मिळतें म्हणून टीकानिर्मितीला प्रवृत्त होणारे, केवळ शास्त्रीय जिज्ञासेनें टीकेला प्रवृत्त झालेले व व्यावहारिक वर्ग उपयुक्ततेच्या दृष्टीनें प्रेरिलेले असे टीकाकाराचे वर्ग दिसतात. कोणी कवीशीं समरस होऊन कवीच्या निर्मितीची पुनर्निर्मिति करणारे, तर कोणी तटस्थ राहून शास्त्रनियमाच्या भाषेंत बोलणारे, कवीच्या गुणावगुणाची चर्चा करणारे, त्याला दोन गोष्टी सहानुभूतीनें सांगणारे किंवा त्याची कडक शब्दानीं निंदा करणारे असतात. कोणी काव्यापासून शब्दसंपत्तींत भर पडते, बुद्धीला वळण लागते, संस्कृति, धर्म, नीति याचा परिपोष होतो—म्हणून काव्यावर टीका करण्याला प्रवृत्त होतात. तात्पर्य, उच्च दर्जाचा कलानंद भोगल्याचें मानसिक समाधान मिळविणें व ते उच्चारून दाखविणे या प्रेरक निमित्तापासून तो व्यावहारिक उपयुक्ततेच्या निमित्तापर्यंत सर्व तऱ्हेचे टीकाकार असतात. या तऱ्हावरूनच टीकाशास्त्रात भिन्न भिन्न टीकासंप्रदाय उत्पन्न झालेले आहेत. आज मराठी लेखकासमोर जे पाश्चात्य टीकाशास्त्र आहे त्यात विशेषतः ही टीकाविषयक कल्पना, व हे टीकाकार आहेत. त्याचे विशेषतः पुढील संप्रदाय ठळकपणें मराठी टीकाकाराच्या टीकानिर्मितीला सामुदायिकपणें प्रेरक झाले आहेत. त्याचे स्वरूप संक्षेपतः सागतों.

## पाश्चात्य टीकेंतील कांहीं संप्रदाय— ऐतिहासिक

ॲरिस्टॉटल् हा ग्रीक तत्त्ववेत्ता पाश्चात्य टीकाशास्त्राचा आद्यजनक आहे. तो नुसता आद्य आहे असेंच नव्हे तर तो चिरंतनहि आहे, व त्याच्या टीकाविषयक तत्त्वाना जुनेपणा अद्यापहि आला नाहीं असें हल्लींहि क्वचित् मानण्यात येतें. ‘ जुनें तें सोनें ’ काय उत्तम व्हावयाचें ते पूर्वीं होऊन गेले, नव्यानीं फक्त जुन्या नमुन्याबरहुकूम चालावयाचे ’ या मताचे पुरस्कर्ते १९ व्या शतकापर्यंत पाश्चात्य देशात होते. म्हणून ग्रीक तत्त्वें व ग्रीक कवि याना नजरेसमोर ठेवून त्याच्या तुलनेनें, त्याच्या मापानें पुढील कवित्वाचें मूल्यमापन करणाऱ्या या टीकाकारांना ‘ अभियुक्त ( Classic ) टीकाकार ’ म्हणतात. संस्कृत साहित्यशास्त्रानुसारी टीकाकार अगदीं असेच होते. अभि-

युक्त टीकाकाराच्या या मताला हळूहळू मागें सारून नवीन युगाच्या प्रवृत्तींना अवसर देणारे बेकन, ड्रायडन्, अॅडिसन् वगैरे टीकाकार झाले. पण या स्वातंत्र्यप्रीतीची खरी परिपूर्ति ज्याला ' Romantic ' युग म्हणतात त्यांत झाली. या नव्या युगांतील टीकाकाराना ' Romantic ' टीकाकार म्हणतात. या प्रवृत्तींतून पुढें भिन्नभिन्न सप्रदाय झाले. सर्व काळची काव्यें सर्वसामान्य अशा एका ठराविक नियमाच्या चौकटींत बसविण्याचा हट्टाहास न धरतां परिस्थित्यनुसार व युगायुगानुरोधाने पडणारा फरक ध्यानात घ्यावा व प्रत्येक कवीचें वैशिष्ट्य स्वमतानुसार पारखावें ही या नव्या युगाची प्रमुख प्रवृत्ति होती. व प्रवृत्तींतून कवींचा तुलनात्मक ( Comparative ) व ऐतिहासिक ( Historical ) अभ्यास व्हावा असें म्हणणारा संप्रदाय निघाला. कवीचें मन हें त्याच्या भोंवतालच्या परिस्थितीचा परिपाक होय असें प्रतिपादणारे टेन् ( Taine ) सारखे टीकाकार हे या सप्रदायाचे होत.

## आत्मचरित्रवादी–गूढवादी–परंपरावादी

कवीच्या व्यक्तिमत्त्वाचाच आविष्कार त्याच्या कलाकृतींत होत असल्यानें कवीचें व्यक्तिमत्त्व समजावून घेतल्याने त्याचे काव्य समजेल असे म्हणणारा सॅन् बव्ह ( Sainte Beuve ) याचा एक आत्मचरित्रवादी पथ आहे. कलानिर्मिति किंवा कवित्व ही दैवी देणगी असल्यानें त्याच्या विवेचनांत निगूढता आणणारे गूढवादी ( Mystic ) तर कविव्यापार अध्यात्म प्रांतात नेऊन त्याचे आध्यात्मिक विवेचन करणारे ( Philosophical ) अध्यात्मवादी टीकासप्रदाय आहेत. या पथात कान्ट, डॉ. बोझॅंकेट, व्हर्नान् ली, क्लाइव्ह बेल्ह, प्रो. नाइट, व्हिक्टर कुझिन्, इत्यादि सौंदर्यमीमांसक व कोलेरिजसारखे टीकाकार येतात. कवीची दृष्टि ही त्याच्या ऐतिहासिक वाङ्मयीन परपरेंतून जन्म पावत असल्यानें त्याच्या काव्याचें विवेचन तो ज्या पूर्वसुरींच्या प्रभावळींत बसलेला असतो त्या प्रभावळीसह–साम्य विरोध-दर्शवून केलें पाहिजे असें म्हणणारे टी. एस्. ईलियटसारखे परंपरावादी ( Traditionalists ) तर आय्. ए. रिचर्डससारखे मानसशास्त्राधारें कवि व रसिक याच्या मनाचें विश्लेषण करणारे, फ्राइडच्या अन्तर्मनाच्या ( Sub-Conscious ) स्वरूपावरून निघणाऱ्या सिद्धान्तान्वयें काव्यचर्चा

करणारे मनोविश्लेषणवादी ( Psycho-Analysts ) दुसरे टीकाकार आहेत. कवीचा दृष्टिकोण समजावून देणारे व त्याचें तत्त्वज्ञान विशद करणारे ( Interpretative ) कोणी आहेत, तर कवींशीं समरस होऊन कविनिर्मित वातावरण पुन्हा निर्माण करणारे व अशा तऱ्हेनें त्याचें काव्यसौंदर्य पटवून देणारे 'Creative' किंवा 'Recreative' टीकाकार दिसतात. कोणी 'Impressionists' तर कोणी 'Expressionists' आहेत. असे बरेच संप्रदाय पाश्चात्य टीकाशास्त्रांत आहेत. कार्ल मार्क्सच्या तत्त्वानुरोधाने वाङ्मयाकडे पाहणारा एंजल्स, ट्रॉट्स्की, मॅक्सईस्टमन्, एडवर्ड अप्वर्ड इत्यादींचा एक नवीन पथ हल्लीं निघाला आहे. हा झाला टीकाशास्त्राच्या तात्त्विक भागातील संप्रदायाचा विचार. याशिवाय कथा, काव्य, कादंबरी, नाटक इत्यादिकांच्या तंत्राबद्दलचा प्रश्न. याबाबत तर अक्षरशः शेकडो पाश्चात्य टीकाकार मराठी अभ्यासकाचे मार्गदर्शक असून ते मराठी निर्मितीला व टीकालेखनालाहि प्रेरक झाले आहेत व होत आहेत.

## अनुकरण का स्वतंत्रनिर्मिति ?

आजच्या मराठी टीकावाङ्मयावर वरील सर्व संप्रदायाची व मतमतांतराची क्वचित् वेगवेगळी तर क्वचित् समुच्चयात्मक अशी घनदाट छाया पडलेली आहे. आज मराठी वाङ्मयनिर्मितीची व टीकेची मुख्य प्रेरणा ही आहे. याच मतप्रणालीबरहुकूम वाङ्मयाचे मूल्यमापन बहुधा करण्यात येतें. या अनुकरणात्मक टीकापद्धतींत स्वतंत्रता कोठे दिसलीच तर ती पाश्चात्य टीकातत्त्वें आपल्या इकडच्या परिस्थितीला लावून उदाहरणांनीं सिद्ध करून देण्यातच दिसतें. सर्वच पाश्चात्य टीकातत्त्वें आपल्या महाराष्ट्रीय विद्वानाच्या बुद्धीला न तोलण्याइतकीं गहन असतात असें नाहीं, किंवा असलीं तत्त्वे स्वतंत्र तऱ्हेने निर्माण करण्याची कुवत इकडे कोणासच नाहीं हेंहि खरें नव्हे. पण तिकडील टीकावाङ्मयाची पूर्वता ( Priority ) वैपुल्य, व प्रसिद्धिसाधने इतकीं प्रचंड आहेत कीं, त्याच्या माऱ्यापुढें आमची स्वतंत्र बुद्धि गुदमरून गेल्यासारखी झाली आहे. भोजराजाच्या सभेंत नवीन श्लोकरचना त्याच्या सभापंडिताच्या एकपाठीपणामुळें अशक्य झाली होती असें सांगतात. आज आमची टीकाविषयक नवनिर्मिति पाश्चात्य सभापंडिताच्या

नुसत्या दबदब्यानेंच हतबल झाली आहे! असो. अशाहि परिस्थितींत आधुनिक मराठी युगात (१९२० ते १९४४) जी स्पृहणीय टीका-निर्मिति झाली आहे तिचें स्वरूप आता सागतों.

## पहिली प्रेरणा : ऐतिहासिक दृष्टि

पाश्चात्य टीकाशास्त्रानें मराठीला पहिली प्रेरणा दिली ती ऐतिहासिक दृष्टीची. तिचा लाभ प्रथम संस्कृतला मिळाला व मग ती देशी भाषाच्या वाट्यास आली. खुद्द मराठी वाङ्मयातील ऐतिहासिक दृष्टीच्या उणीवेची जाणीव दिवसेंदिवस अधिक अधिक तीव्र होत होती. याचा परिणाम असा झाला कीं, हल्लींच्या युगात चिकित्सक ऐतिहासिक दृष्टि वाङ्मयाच्या हरएक दालनात मान्यता पावली आहे. सुसंगतपणें व चिकित्सा बुद्धीने लिहिलेला वाङ्मयाचा इतिहास हा त्या वाङ्मयाच्या टीकाशास्त्राचा आधार होय. मराठी वाङ्मयाचा असा इतिहास लिहिण्याचें काम पूर्वीं भावे आदिकरून मंडळींनीं सुरू केलेच होतें. ते या युगात अधिक प्रगट झालेले दिसतें. पागारकर याचा 'मराठी वाङ्मयाचा इतिहास' (१९३२ खड १ ला व १९३५ खड दुसरा), बा. अ. भिडे यांच्या 'मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास' (१९३३), य. खु. देशपाडे याचा 'महानुभावीय वाङ्मयावरील ग्रंथ (१९२५), य. न. केळकर याचें मराठी शाहिरावरील ऐतिहासिक व चरित्रात्मक विवेचन (१९२८ व १९४४) इत्यादि ऐतिहासिक ग्रथ जुन्या वाङ्मयासबंधीं या कालात झाले. याव्यतिरिक्त ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम, रामदास या संतावरील चरित्रपर विवेचन पागारकर, आजगावकर, स. खं. अळतेकर, प्रो. शं. वा. दाडेकर. डॉ. रा. ग. हर्षे, शं. श्री. देव इत्यादि अधिकारी विद्वानाकडून ऐतिहासिक दृष्टीने झालेलें आहे. हें झाले जुन्या वाङ्मयाबद्दल.

## ऐतिहासिक समालोचनें

अर्वाचीन वाङ्मयावरहि याच प्रकारची विपुल रचना याच कालात झालेली दिसते. प्रो. पोतदार याचा 'मराठी गद्याचा इंग्रजी अवतार' (१९२२), ग. र. दडवते यांचें 'अर्वाचीन मराठी वाङ्मय' (१९२४), प्रो. गं. बा. सरदार यांची 'अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका'

( १९३७ ), हे १८०० ते १८७४ पर्यंतच्या अर्वाचीन मराठी गद्याचे इतिहासपर ग्रंथ असून 'मराठवाङ्मयांतील अर्वाचीन मराठी वाङ्मय' हा प्रो. चिं. नी. जोशी याचा मराठी पद्याचा ऐतिहासिक ग्रंथ आहे ( १९३९ ). शिवाय रा. नेने यानीं संपादिलेलें 'अर्वाचीन मराठी साहित्य' १८७५–१९३५ ( १९३५ ) व सरवटे याचें 'मराठी साहित्यसमालोचन' १८१८–१९३४ ( १९३७ ) हीं दोन ऐतिहासिक समालोचने होत. शिवाय ग. दे. खानोलकर यानीं सपादित केलेला 'अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक' ( खड १, १९३१ व खंड २, १९३८ ) ग्रथ म्हणजे वरील ऐतिहासिक वाङ्मयविवेचनाची पूरणिकाच होय.

## चरित्रें आणि वाङ्मयविवेचनें

याव्यतिरिक्त अण्णासाहेब किर्लोस्कर, विष्णुशास्त्री, आगरकर, हरिभाऊ आपटे, केशवसुत, कोल्हटकर, केळकर, गडकरी, खाडीलकर, शि. म. परांजपे, वा. म. जोशी, नाट्यछटाकार दिवाकर, प्रो. फडके, खाडेकर, अत्रे इत्यादि ठळक साहित्यसेवकाचीं चरित्रें व वाङ्मयसमीक्षा ही या युगातील ऐतिहासिक वाङ्मयसमीक्षा प्रातातील भरीव कामगिरी होय. ऐतिहासिक दृष्टीचा हा लाभ जसा मराठींतील जुन्या-नव्या साहित्य-सेवकाच्या कृतींना झाला, तसाच तो सर्वांच्या आरंभस्थानीं असलेल्या सस्कृत साहित्यशास्त्रालाहि झाला आहे. पा. वा. काणे यानीं 'संस्कृत साहित्यशास्त्राचा इतिहास' प्रथम १९१० मध्ये इग्रजींत लिहिलेला असला तरी त्याचा मराठींत संक्षिप्तपणे अवतार प्रथम १९२१ मध्ये ( विविधज्ञानविस्तार—वाढदिवस व ग्रथ ) व साकल्यानें १९३१ मध्यें ( संस्कृत साहित्यशास्त्राचा इतिहास, अनुवादक ओगले ) झाला. पा. वा. काणे व इतर विद्वान् याच्या चिकित्सक दृष्टीचा लाभ करून घेऊन प्रो. जोग ( अभिनव काव्यप्रकाश १९३० ) व डॉ. वाटवे ( रसविमर्श १९४२ ) यानीं हें संस्कृत साहित्यशास्त्राचें ऐतिहासिक विवेचन पुढे चालविलें आहे.

## नव्या दृष्टींतून जुनें

पाश्चात्य टीकापद्धत इकडे रूढ होऊन चागली रुजल्यावर तिची अंमल-बजावणी जशी नवीन मराठी वाङ्मयावर होऊं लागली तशीच ती जुनें

मराठी व संस्कृत वाङ्मयावरहि होत आहे. याचीं पुढील उदाहरणें होत. प्रो. बनहट्टी याचें 'मयूरकाव्यविवेचन' (१९२६), अ. का. प्रियोळकराचे 'दमयंती स्वयंवर' (१९३५), डॉ. केतकरांचें 'महाराष्ट्रीयाचें काव्य-परीक्षण' (१९२८), डॉ. ग्रामोपाध्ये याचें 'संतकाव्य-समालोचन' (१९३९). संतकवींनीं प्रसंगोपात्त व्यक्त केलेल्या काव्यविषयक विचाराचें संस्कृत आणि इंग्रजी टीकापद्धतीच्या दृष्टीने शास्त्र बनविण्याचा प्रयत्न डॉ. मा. गो. देशमुख यानीं 'मराठीचें साहित्यशास्त्र' (१९४१) लिहून केला आहे. संस्कृत वाङ्मय आणि संस्कृत साहित्यशास्त्र याचा अभ्यासहि याच चिकित्सापद्धतीनें होत असलेला दिसत आहे. प्रो. आठवले याचें 'प्राचीन साहित्य' (१९३४), प्रो. मिराशी (कालिदास १९३४), प्रो. आळतेकर याचें 'कालिदासाची सृष्टि' (१९३७), रहाळकराचे 'शाकुन्तल-सौदर्य' ही याचीं ठकळ उदाहरणें होत. संस्कृत नाट्यशास्त्र यावर पुढील रचना झालेली दिसते. गोदावरी केतकराचें 'भारतीय नाट्यशास्त्र'(१९२८) बाळूताई खरे याची 'अलंकारमंजूषा' (१९३१), वि. वा. भिडे याची 'साहित्यकौमुदी' (१९२२), प्रो. जोग याचा 'अभिनव काव्यप्रकाश' (१९३०), द. के. केळकर याचें 'काव्यालोचन' (१९३१), प्रो. य. र. आगाशे याचें 'सारस्वतसमीक्षा' (१९३४), डॉ. के. ना. वाटवे याचा 'रसविमर्श' (१९४२). वरीलपैकीं शेवटच्या चार ग्रथात संस्कृत साहित्य-शास्त्रातील तत्त्वाचे पाश्चात्य टीकापद्धतीनें आलोचन केलेले असून विशेषतः 'रसविमर्श' संस्कृतातील जुनी रस—व्यवस्था मानसशास्त्राधारें परीक्षिली आहे. आणि पाश्चात्य टीकाशास्त्राची जरूर तेथें मदत घेऊन मराठी टीका-शास्त्र संस्कृत साहित्यशास्त्राच्या पायावर रचण्याची कल्पना माडलेली आहे.

## सौंदर्यमीमांसा

पाश्चात्य टीकाशास्त्राचा विचार 'सौदर्यमीमांसा' (Aesthetics) या अधिक व्यापक शास्त्राचा दृष्टिकोणातून झालेला आहे. कारण काव्य-सौदर्य व त्यापासून होणारा आनद हा इतर कलासौदर्यें व तज्जन्य आनंद याचा एक विशिष्ट प्रकारच होय. या सौदर्यशास्त्रावर तिकडे एस्. अलेक्झांडर ई. जॉर्डन्, प्रो. नाइट, टॉलस्टॉय, बमगार्टन, बेल्, बोसाक्वेट इत्यादि ग्रंथकार

आहेत. तदनुषगाने मराठींतहि या विषयाची चर्चा झाली असून वा. गो. आपटे यांचे 'सौंदर्य आणि ललितकला' (१९२२), प्रि. भाटे याची 'लसितकलामीमासा' (१९२५) रा. मर्ढेकर यांचें 'Arts and Man' (१९३७). मराठी अनुवाद, व प्रो. रा. श्री. जोग याचे 'सौंदर्यशोध व आनंद बोध' (१९४३) इत्यादि ग्रंथ आज त्या विषयावर लिहिले गेले आहेत. पैकीं प्रो. जोगाच्या ग्रथात सौंदर्यशास्त्र व काव्यानंद याची सागड अधिक जाणिवेनें घालण्याचा प्रयत्न दिसतो.

### आजचे टीकाकार व टीकाप्रकार

निव्वळ वाङ्मयटीकाशास्त्रावरील या युगातल्या टीकाकाराचा व टीकेचा विचार आता करू. या युगात नाणावलेले असे प्रो. फडके, खाडेकर, माडखोलकर, वा. ना. देशपाडे, क्षीरसागर, प्रो. मा. का. देशपाडे, प्रो. वि. पां. दाडेकर, वि. ह. कुलकर्णी, प्रभाकर पाध्ये, आचार्य जावडेकर, रा. अत्रे, प्रो. अ म. जोशी, प्रो. माचवे, पु. य. देशपाडे, वा. ल. कुलकर्णी, वा रा. ढवळे इत्यादि टीकाकार आहेत. त्यापैकीं बरेचसे उच्च दर्जाचे कलावतहि असल्याने त्यांच्या वाङ्मयटीकेला आत्मप्रतीतीचा उजाळा दिसतो. टी. एस्. ईलियट, जे. बी. प्रिस्टले, हर्बर्ट रीड, क्रिलर कूच, ई. एम्. फॉर्स्टर, व्हर्जीनिया वूल्फ इत्यादि पाश्चात्य कलावतानीं लिहिलेल्या टीकेंत जो स्वानुभूतीचा जिव्हाळा व मताचा ठामपणा दिसतो तोच प्रो. फडके कादबरीच्या किंवा लघुकथेच्या तंत्राबद्दल लिहूं लागले अथवा खाडेकर 'जीवनासाठीं कला' या तत्त्वाचा सावेश पुरस्कार करू लागले किंवा अत्रे पुरोगामी वाङ्मयाची चर्चा करूं लागले किंवा वा. ना. देशपाडे 'गूढवाद' विवरू लागले म्हणजे दिसतो असे म्हणणें उचित होईल. आजकालच्या मराठी टीकेत (१) तात्त्विक चर्चा, (२) तात्रिक (Formal) चर्चा व (३) तात्कालिक ग्रथनिरीक्षण असे तीन प्रकार ठोकळ मानानें येतात. जुन्या युगातहि असे प्रकार असत; पण नव्या युगात युद्धोत्तर विचारसरणी प्रभावी झाल्याने तात्त्विक चर्चेला पुष्कळ नवे नवे विषय उपलब्ध झाले; नवीन वाङ्मयप्रकार रूढ झाल्यानें नवी तंत्रचर्चा सुरू झाली व नवीन ग्रंथनिर्मिति वेगानें होऊ लागल्यानें ग्रंथसमीक्षण हा मासिकें, वृत्तपत्रें व

साप्ताहिकें याचा एक नित्याचा व्यवसायच होऊन बसला. ग्रंथसमीक्षणाला आरंभ करणारा हल्लींचा होतकरू टीकाकार क्रमाक्रमाने तात्रिक व तात्त्विक टीकेचे टप्पे चढून वर जाताना दिसतो.

## १. तात्त्विक चर्चा : चर्चाविषय

( १ ) श्रमजीवी व दलितवर्गाबद्दलची वाढती सहानुभूति व त्याबरोबरच येणारा ऐतखाऊ श्रीमंत भांडवलवाले व वरिष्ठवर्गीय लोक याबद्दलचा तिटकारा, स्वप्नरंजन किंवा काल्पनिक सृष्टि यापेक्षा वास्तवाकडील ओढा, बुद्धिप्रामाण्य, त्याच्याच पोटी येणारा जडवाद, व या सर्वांतून निघालेली साम्यवाद, नवमत-वाद किंवा पुरोगामित्व वगैरे मतें याचे वाढतें दडपण महाराष्ट्रीय जीवनावर पडत आहे पूर्वी बुद्धिप्रामाण्य किंवा जडवाद नास्तिक्यात सामील करून त्याची नागी सहज मोडता येत असे. पण आजच्या यंत्रयुगातला जडवाद किंवा बुद्धिवाद याना स्वतंत्र दर्शनाचे महत्त्व आले आहे. या सर्व प्रवृत्ति आजच्या जीवनात, जीवनातून ललितवाङ्मयात व वाङ्मयातून अखेर टीकाशास्त्रात प्रविष्ट झाल्या आहेत. त्यामुळें हल्लींचे तात्त्विक चर्चेचे विषय पूर्वीप्रमाणे नुसते वाङ्मयीन नाहींत. त्याना राजकीय, सामाजिक व क्वचित् धार्मिकहि अंग आहे. एकट्या पुरोगामी वाङ्मयाच्या चर्चेंत वरील सर्व अंगें व पाहिजे असल्यास अध्यात्म सुद्धा येतें ( आचार्य जावडेकर—पुरोगामी साहित्य १९४१ ). श्री. लालजी पेंडसे याच्या ' साहित्य आणि समाजजीवन ' या टीकाग्रंथात ( १९३५ ) कलानिर्मितीच्या बुडाशीं तत्कालीन ' विशिष्ट भौतिक परिस्थिति ' असते असा सिद्धान्त मांडण्यात आला आहे.

## कलेसाठीं कला—मनोविश्लेषण

तसेंच वाङ्मयनिर्मितीचें प्रयोजन केवळ आनंद का बोध ? करमणूक का मतप्रचार ? म्हणजेच कला ही कलेसाठीं का जीवनासाठीं ? हा प्रश्न आज फार कसोशीनें चर्चिला जात आहे. तिकडे व्हिस्लर, ऑस्कर वाइल्ड, ए. सी. ब्रॅडले ( Oxford lectures on Poetry ) यानीं एका विशिष्ट दृष्टीनें चर्चिलेल्या या विषयाला महाराष्ट्रातील नव्या जागृतीमुळें एक नवें रूप आलें आहे. आणखी एक-दोन अंगभूत विषय म्हणजे ' पावित्र्य-विडंबन ', ' अश्लीलता ' व एकंदरींत संस्कृति-रक्षण हे होत. शिवाय

वास्तववाद व ध्येयवाद, लेखकाचें व्यक्तिमत्त्व, प्रणय व आर्थिक परिस्थिति, जीवन व वाङ्मय, अक्षरवाङ्मय, काव्यानंद, कादम्बऱ्या व राजकारण, वाङ्मय-चौर्य, लेखनतन्त्राची आवश्यकता, मनोविश्लेषण ( Psycho-analysis ) इत्यादि काहीं केवळ वाङ्मयीन तर काहीं इतर व्यापक जीवनाचे प्रश्न चर्चिले जात आहेत. यातील बहुतेक प्रश्न टीकेच्या तात्त्विक भागांत यापूर्वीं तिकडे चर्चिले गेले आहेत व त्या चर्चेचा मागोवा घेत घेत मराठी टीकाकार हे प्रश्न हल्लीं सोडवीत आहेत. एका देशातील विशिष्ट विचार-सरणीचे बीज दुसऱ्या देशाच्या भूमींत पेरले गेलें तरी त्याला पानें-फुले तींच व त्याच क्रमाने येणें हे स्वाभाविकच आहे.

## नवमतवाद विरुद्ध संस्कृति-संरक्षण

आजच्या युगातील प्रभावी टीकाकाराचा वर्ग ‘ पुरोगामी ’ या नावाने ओळखला जातो. ‘ पुरोगामी ’ म्हणविणाऱ्यामध्ये बारकेसारके मतभेद नाहीत असें नाहीं; तथापि, पुढील टीकाकाराचा समावेश या वर्गात करण्यास हरकत दिसत नाहीं. प्रो. फडके, खाडेकर, वरेरकर, के. ना. काळे, प्रभाकर पाध्ये, लालजी पेंडसे, अत्रे, अनंत काणेकर, माडखोलकर, पु. य. देशपांडे, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी. या नवविचारसरणीला आपल्या टीकालेखांनी प्रत्युत्तर देणाऱ्यामध्ये आचार्य जावडेकर ( पुरोगामी साहित्य, १९४१—जावडेकर-फडके वाद ) रा. क्षीरसागर ( प्रतिभा वाङ्मयात डोकावणारा जडवाद--१९३६ व सह्याद्रि १९३७ ), रा. भा. रा. तांबे, आचार्य भागवत इत्यादि अध्यात्मवादी—गूढवादी लेखक आहेत. शिवाय सतवाङ्मयाचें रा. पागारकरासारखे ( पुणें शारदोपासक संमेलन-भाषण सतवाङ्मय हेच पुरोगामी वाङ्मय—१९३७ ), खदे अभ्यासक साधुदास कवींसारखे प्राचीन काव्यपरपरावादी ( द. म. साहित्य समेलन-भाषण. कराड, १९४१ ) इत्यादि लोक या पुरोगामी सरणीचे विरोधक होत प्रो. फडके यांचें ‘ प्रतिभासाधन ’ ( १९३१ ), साहित्य आणि संसार ( १९३७ ), वाङ्मयविहार ( १९३३ ), या टीकाग्रंथात वरील काहीं प्रश्नाची सुगम चर्चा केली आहे. रा. खाडेकराच्या ‘ सहा भाषणांत ’ ( १९४१ ), वरीलपैकीं काहीं प्रश्नाचें विवेचन आहे. ‘ कलेसाठी कला ’

व ' जीवनासाठीं कला ' या वादात प्रो. फडके व खांडेकर एकमेकाचे प्रतिपक्षी आहेत. ' कला व नीति ' या वादांतील पुरोगामी विचारसरणीचें रा. ग. वा. कवीश्वर यानीं आपल्या ' नीति व कलोपासना ' ( १९३४ ) या ग्रंथात चागलें परीक्षण केले आहे. सदर चर्चेत जुन्या युगाचे प्रतिनिधि पण विचाराने कधींहि मागें न पडणारे प्रो. वा. म. जोशी व न. चिं. केळकर यानींहि भाग घेतला आहे. ( केळकर–तिरंगी नवमतवाद–१९३६ ), पावित्र्यविडंबन, अश्लीलता इत्यादि प्रश्नावर पुरोगामी लेखकाविरुद्ध स्वतंत्र आघाडी लढविण्याचें सर्व श्रेय रा. कृष्णराव मराठे या निरलस, खंबीर व चिकाटीच्या संस्कृतिप्रेमी गृहस्थास दिलें पाहिजे. रा. मराठे याचे प्रत्यक्ष टीका-लेख फारसे उपलब्ध नसले तरी त्यानीं अनेक समेलन-प्रसगीं जीं भाषणे जो मतप्रचार ज्या गाठीभेटी व चर्चा केल्या व जी जागृति घडवून आणली तोच त्याचा टीकाग्रंथ होय. रा. गो. म. जोशी या व्यासंगी विद्वानाचाहि या प्रकरणीं उल्लेख अवश्य केला पाहिजे.

## वास्तववाद व गूढवाद

वाङ्मयातील वास्तवता या विषयावर प्रो. फडके, खाडेकर, प्रभाकर पाध्ये ( कलेचीं क्षितिजें, १९४२ ) व रा. अत्रे ( बडोदे साहित्य–संमेलन-अध्यक्षीय भाषण, १९३६ ), श्री. माडखोलकर ( आह्वान १९४१ ) इत्यादि-कानीं चर्चा केली आहे. काहीं निव्वळ वाङ्मयीन प्रश्नाची छाननी रा. वा. ना. देशपाडे ( विचारसमीक्षा–१९४० ) गूढवाद ( Mysticism ), डॉ. रा. ग. हर्षे ( टीका आणि अभ्यास–१९४२ प्रतिभा, कल्पना याचें स्वरूप) प्रो. माटे ( साहित्यधारा–नायक कोणास म्हणावें ? १९४३ ), प्रो. द. के. केळकर ( साहित्य–विहार–रसचर्चा–१९४४ ), रा. नारखेडे ( काव्यकलेचें अन्तरंग १९४३ ) इत्यादींनीं केली आहे.

## मानसशास्त्र आणि काव्यानंद

कलावंत व रसिक याच्या अंतरंगाची चर्चा मानसशास्त्राधारे करणें हा एक आजच्या तात्त्विक टीकेचा महत्त्वाचा प्रकार होय. कलानिर्माणकालीं रसिकाच्या अंतरंगातील घडामोड प्रा. फडके (प्रतिभासाधन १९३१),

श्री. प्रभाकर पाध्ये ( कलेच्चीं क्षितिजें १९४२ ), श्री. बा. सी. मर्ढेकर ( ' कलेच्चीं क्षितिजे '–प्रस्तावना ), श्री. वा. म जोशी ( वाङ्मयीन महात्मता '–प्रस्तावना ) यानीं दिग्दर्शित केली आहे. ' काव्यानंद ' या अत्यंत बिकट प्रश्नाच्या चर्चेत रसिकाच्या रसास्वादकालीन अतरगाची चर्चा येते. या चर्चेत श्री. न. चिं. केळकर, प्रा. द. के. केळकर, प्रा. रा. श्री. जोग, श्री. दा. ना. आपटे, डॉ. के. ना. वाटवे, प्रा. कृ. पा. कुलकर्णी, प्रा. फडके, वगैरे टीकाकारानीं भाग घेतला आहे. ' गेयता हेच काव्याचें व्यवच्छेदक लक्षण होय ' अशी काव्याची नवीन व्याख्या करण्याचा प्रयत्न प्रा. श्री. म. माटे यानीं ( रसवंतीची जन्मकथा, १९४३ ) केला आहे. ' विचारसौंदर्या 'तील ( १९४० ) वामनरावाची तत्त्वचर्चा खराखरच सुंदर आहे.

कवीचें व्यक्तिमत्त्व–काव्यकला

हास्यविनोदाची शास्त्रशुद्ध व तात्त्विक चर्चा श्री. न. चि. केळकरानीं ' हास्यविनोदमीमांसा ' ( १९३७ ) या ग्रथात केली आहे. ललितवाङ्मयातील स्वभावलेखनाचे महत्त्व डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे यानीं आपल्या ' स्वभावलेखन ' ( १९३९ ) मध्ये निवेदिलें आहे. कवीचें व्यक्तिमत्त्व व त्याची महनीयता यासंबधीचा तात्त्विक विचार श्री. बा. सी. मर्ढेकराच्या ' वाङ्मयीन महात्मता ' या ग्रथात आढळतो. काव्य व इतर ललितकला एतद्विषयक काहीं विचार श्री. बा. मा. दाभाडे ( शशाङ्क ) यानीं ' कलातरंग ' ( १९३८ ) मध्यें व्यक्त केले आहेत. नवी लैंगिक नीति व मनोविश्लेषण हेहि आधुनिक टीकेचे नवे विषय होत. त्यापैकीं पहिल्या विषयावर श्री. माडखोलकर यानीं विस्तृत आणि उद्बोधक चर्चा केली असून ' स्वैरविचार ' ( १९३८ ) दुसऱ्याची चर्चा श्री. वामनराव जोशी व ' प्रतिभा ' पाक्षिकातील काहीं लेखकानीं केली आहे. प्रा. फडक्यानीं या विषयाची शास्त्रीय चर्चा ' मानसमंदिर ' ( १९३५ ) मध्ये केली आहे. शिवाय ' रविकिरणमंडळा 'च्या विद्वान् सदस्यानीं ' काव्यविचार ' ( १९२४ ) इत्यादि पुस्तकाच्या द्वारें या चर्चेत भर घातली आहे. 'काव्यचर्चा' ( १९२६ ), ' शारदाविहार ' ( १९४० ) इत्यादि ग्रंथात अनेक टीका-

काराच्या तात्त्विक विचाराचा संग्रह आहे. कविश्रेष्ठ भास्करराव तांबे यांचे टीकालेख म्हणजे काव्य, कला व सौंदर्य यावरील आत्मप्रत्ययी टीकेचा सुंदर नमुना होय. ('तांबे-व्यक्ति आणि कला'-खंड २ रा. १९३५). रा. वरेरकरांनी आपल्या अध्यक्षीय भाषणांतून व लेखांतून (आघात, १९३६) कांहीं तात्त्विक चर्चा सडेतोडपणे केली आहे.

## २. तांत्रिक चर्चा : कथा-कादंबऱ्या-नाटकें

अर्वाचीन मराठीचे निरनिराळे वाङ्मयप्रकार जरी पूर्वयुगातच सुरू झाले होते तरी त्याना खरी तंत्रशुद्धता या युगातच लाभली. हरिभाऊंनीं कथावाङ्मयाची सुरुवात १८९१ मध्ये केली असली तरी तंत्रशुद्ध लघुकथा या युगातच लिहिल्या जाऊं लागल्या. तंत्रशुद्ध लघुकथेचा काळ १९१५ पासून पुढे मानावयास हरकत नाहीं. यानतर दिवाकर कृष्ण, फडके, खाडेकर, दौंडकर, य. गो. जोशी इत्यादिकांच्या तंत्रशुद्ध लघुकथा चमकू लागल्याने लघुकथेच्या तंत्राची शास्त्रशुद्ध चर्चा आवश्यक झाली. अशी चर्चा प्रा. फडके यांच्या प्रतिभासाधनात (१९३१) सोदाहरण झालेली दृष्टीस पडते. यानंतर प्रा. लागू (आवडत्या गोष्टी-प्रस्तावना १९३५), वा. कृ. गलगली, शं. ह. देशपांडे (१९४२) इत्यादि लेखकांनीं लघुकथेच्या तत्राची चर्चा केलेली आहे. 'लघुतमकथा' या नवीन वाङ्मयप्रकाराची ओळख वा. ना. देशपांडे (विचारसमीक्षा १९४०), प्रा. भा. म. गोरे यांनीं केली आहे. रा. वा. गो. आपटे यांच्या 'लेखनकलें'त (१९२६) कांहीं तात्त्विक व तांत्रिक प्रश्नांची सविस्तर व सुगम चर्चा आली आहे.

मराठी कादंबरीचा तंत्रविचार प्रा. बापट व प्रा. गोडबोले यांनीं केला आहे. [मराठी कादंबरी-तंत्र आणि विकास (१९३८)] प्रा. वि. बा. आंबेकर, वेणूबाई पानसे, वाग्भट ना. देशपांडे इत्यादि लेखकांनीं यावर आपले विचार प्रगट केले आहेत.

मराठी नाट्यतंत्राचा विचार प्रा. फडके यांनीं 'प्रतिभासाधना'त केला असून एतद्विषयक स्फुट विचार पुढील ग्रंथांत दिसून येतात. (१) खाडिलकर यांची नाट्यसृष्टि (वा. ह. घारपुरे १९३०), (२) केळकरांची

सहा नाटकें ( वि. पां. दाडेकर १९३२ ), ( ३ ) महाराष्ट्रीय नाटककार—गडकरी व किर्लोस्कर ( स. वा. जोशी व के. वा. साठे—१९२४ ).

## नाट्यछटा, विडंबनें व लघुनिबंध

नाट्यछटा या आधुनिक वाङ्मयप्रकारावर प्रा. शं. के. कानेटकर ( मराठी नाट्यछटा १९३७ ) व प्रा. रा. कृ. लागू ( ' दिवाकरांच्या नाट्यछटा 'ची प्रस्तावना १९३९ ) यांनीं विस्तृत चर्चा केलेली आहे. याशिवाय के. ना. काळे, दि. वि. अमोणकर, प्रा. पारसनीस इत्यादि टीकाकारांनीं या विवेचनास हातभर लाविला आहे. ग्वाल्हेर येथें प्रसिद्ध झालेला ' नाटयचर्चा ' ( १९४३ ) हा ग्रंथहि येथें उल्लेखनीय होय. काव्याच्या निरनिराळ्या प्रकाराची चर्चा पुढील गृहस्थांनीं केलेली आढळते. डॉ. हर्षे ( टीका व अभ्यास—भावगीत १९३२. ) श्री. पु. मं. लाड ( मधुपर्क—कवितासंग्रहांतील " मुक्तक व भागवीत "— हा विवेचनात्मक निबंध १९४३ ). यापूर्वी ' काव्यचर्चा ' ( १९२६ ) व रविकिरणमंडळातर्फे प्रसिद्ध झालेल्या ' काव्य-विचार ' या टीकाग्रंथात नाट्यगीत, सुनीत, भागवीत इत्यादि प्रकाराचा ऊहापोह केला आहे. ' विलापिके 'च्या तंत्राचा विचार श्री. ग. त्र्यं. माडखोलकर यांनीं स्वतंत्र केला आहे. ( ' विलापिका ' १९२७ ), ' विडंबन ' ( Parody ) ही विनोदी काव्याची एक नवी शाखा हल्लीं फोफावली आहे. तिची तंत्रचर्चा रा. अत्रे, ( ' उपहासिनी '—प्रस्तावना १९३६ ), डॉ. के. ना. वाटवे ( 'केसरी' १९३३ ), चिपळूणचे रा. वि. ल. बर्वे इत्यादींनीं केलेली दिसते. उज्जैनीचे प्रा. माचवे व प्रा. अ. म. जोशी यानीं आपल्या ' चरित्र, आत्मचरित्र व टीका ' ( १९४२ ) या पुस्तकात चरित्र, आत्मचरित्र व टीकावाङ्मय यावर उद्बोधक चर्चा केलेली आहे· ' लघुनिबंध या नुकत्याच सुरू झालेल्या वाङ्मयप्रकाराच्या तंत्राची चर्चा प्रा. वि. ह. कुलकर्णी, प्रा. मा. का. देशपांडे, प्रा. भावे यांनीं केलेली आहे.

याप्रमाणें तात्त्विक व यांत्रिक प्रकारचे टीकावाङ्मय पूर्वयुगातील तसल्या वाङ्मयापेक्षां विपुल आहे. तें बरेंचसें स्वतंत्र ग्रंथरूपातहि आहे. पण विखुर-लेली चर्चा त्यात अद्याप बहुत आहे. तिचें ग्रंथरूपानें व समन्वयपूर्वक एकी-

करण आवश्यक आहे. तसेंच ज्या पाश्चात्य टीकावाङ्मयाच्या प्रेरणेनें आमचें मराठी टीकाशास्त्र जोगवलें आहे त्या टीकावाङ्मयाच्या इतिहासावर व त्यातील तत्त्वे व संप्रदाय यांवर साद्यन्त व सर्वांगपरिपूर्ण ग्रंथ मराठींत अद्याप नाहीं. खरें म्हटलें तर ही कामगिरी त्यातल्या त्यांत मराठींत लिहूं शकणाऱ्या एखाद्या इंग्रजीच्या प्राध्यापकानें केली पाहिजे. असे विद्वान् प्राध्यापक महाराष्ट्रांत काहीं कमी आहेत असें नाहीं.

## ( ३ ) तात्कालिक ग्रंथसमीक्षण—कांहीं टीकासंग्रह

मागे सांगितल्याप्रमाणें दैनिकें—साप्ताहिकें—मासिकें याचा ग्रंथसमीक्षण हा एक नित्याचाच व्यवसाय होऊन बसला आहे. यातून येणारीं बरींचशीं ग्रंथ-परीक्षणे केवळ जुजबीं परिचयात्मक असतात. अशीं परीक्षणें सोडलीं तरी ज्याना कायमचें टीकाशास्त्रीय महत्त्व आहे अशाची संख्या यामध्यें कमी असते असें नाहीं. कांहीं टीकाकारानीं अशा आपल्या टीकाचे व परीक्षणाचे स्वतंत्र संग्रहच प्रसिद्ध केलेले हल्लीं आढळतात. यांपैकीं काहीं संग्रहांचा नामनिर्देश पुढे केला आहे. श्री. ना. गो. चापेकराचे ‘ साहित्यसमीक्षण ’ ( १९३५ ), प्रा. वि. बा. अंबेकराचे ‘ परामर्ष ’ ( १९३८ ), श्री. दा. न. शिखरे याचे ‘ आजकालचे साहित्यिक ’ ( १९३९ ), श्री. श्री. के. क्षीरसागर याचे ‘ व्यक्ति व वाङ्मय ’ ( १९३७ ), श्री. वि. स. खांडेकराचें ‘ वनभोजन ’ ( १९३५ ) व ‘ धुंधुर्मास ’ ( १९४० ), श्री. रा. ग. हर्षे ‘ टीका व अभ्यास ’ ( १९४२ ), प्रा. फडके याचें ‘ टाकीचे घाव ’ ( १९३७ ), श्री. द. सी. पंगु यांची ‘ आस्वाद ’ ( १९४२ ) व ‘ तुषार ’ ( १९४३ ) व श्री. मायदेव-संपादित ‘ सावरकर-काव्य समालोचन ’ ( १९४३ ), रा. माडखोलकराचा ‘ परामर्ष ’ ( १९४३ ), वाङ्मयविलास ( १९३७ ), प्रो. शेजवलकराचे लेख ( १९४० ), इत्यादि ग्रंथ समीक्षणप्रधान टीकसंग्रह आहेत. यातील कांहींत तात्त्विक चर्चाहि आहे.

## आजची टीकाकारत्रयी

असलें उद्बोधक समीक्षण-वाङ्मय फुटकळ स्वरूपांत पुढील नियत-कालिकातून किती तरी पटींनीं पडून राहिलेलें आहे. म. सा. पत्रिका, सह्याद्रि,

मनोहर, समीक्षक, यशवंत, प्रतिभा, केसरी, झंकार, विविध वृत्त, इत्यादि इत्यादि. याशिवाय किती तरी प्रस्तावना, लिखित भाषणें, समालोचनें अद्याप संग्रहरूपानें अभ्यासकाना उपलब्ध व्हावयाचीं आहेत. मागील युगातल्या केळकर, कोल्हटकर या ज्येष्ठ टीकाकाराचा प्रस्तावनालेखनाचा शिरस्ता आज त्याच्याच परंपरेंतल्या रा. माडखोलकर, खाडेकर इत्यादि टीकाकारानीं तितक्याच जोमानें पुढें चालविला आहे. टीकालेखनातील वैपुल्य, विविधता, विद्वत्ता व वैदग्ध्य या दृष्टीनें आजच्या टीकाकाराच्या आघाडीवर रा. माडखोलकर, खाडेकर व प्रो. फडके ही त्रयी चमकताना दिसते. माडखोल-कराच्या शैलीचें अभिजात लालित्य ( Classical grace ), खाडेकराची कल्पकता व फडक्याचा मोहक आत्मप्रत्यय या गुणानीं मराठी टीका-वाङ्मयाला स्वतंत्र ललितसाहित्यनिर्मितीची योग्यता आणली आहे.

## रसिक, न्यायाधीश व निंदक

मराठी टीकाशास्त्राच्या वरील तीनहि प्रकारातून टीकाकारांचे अनेक वर्ग दिसून येतील. त्यात सहृदय गुणग्राहक आहेत. शास्त्रीय दृष्टीचे गुणदोष-विवेचक व मूल्यमापक आहेत, न्यायाधीश आहेत, वकील आहेत, शास्ते आहेत, निंदक आहेत, केवळ कलातर्निविष्ट ( Artistic ) व नीति, जागृति, संस्कृतिवर्धन, राष्ट्रहित इत्यादि कलाबाह्य ( Non-artistic ) मूल्यानीं कलेकडे पाहणारे आहेत. आमच्या टीकाकाराच्या निर्मळ सहृदय गुणग्राहक-तेचा लाभ बहुतेक पाश्चात्य लेखक, संस्कृत कवि व क्वचित् मराठी लेखक यांना मिळतो. ( प्रो. फडके याची 'मनोहरची आकाशवाणी', 'वेंचलेलीं मोतीं', प्रो. शिवरामपंताचे भास, कालिदास यावरील गुणग्रहणपर लेख व रा. माडखोलकर याचे 'माझे आवडते लेखक व कवि' ही लेखमाला, प्रो. मा. का. देशपाडे याची प्रो. फडके याच्या कादंबऱ्यावरील गुणग्रहणपर टीका पहा. ) गुणदोषविवेचक न्यायी टीका प्रायः बऱ्याच लेखकाच्या वाट्याला येते. माडखोलकर, खाडेकर, प्रो. वा. म. जोशी, वा. ना. देशपाडे वगैरे समतोल टीकाकार न्यायाधीशवर्गात येतील. वकील, शास्ता व निंदक हा टीकाकार-वर्ग बराच मोठा असून याच्या विशिष्ट गुणाचा लाभ किंवा प्रसाद त्याचें मित्र, शत्रु व सज्जन यांना मिळतो. मराठींतील या शेवटच्या टीकापद्धतीचा

उल्लेख खुद्द कोल्हटकरांनीं १९२१ सालीं ( विविधज्ञानविस्तार ज्युबिली ग्रंथात ) पुढीलप्रमाणें केला आहे. " आपल्यामधील टीकावाङ्मय जितकें निर्दोष असावयास पाहिजे तितकें अजून झालें नाहीं. त्यामध्यें मत्सर, दुराग्रह, एकांगीपणा यांचें प्राबल्य दिसून येतें." ( पृ. १४४ ) कोल्हटकरांच्या वेळची ही स्थिति पुढील २३ वर्षांत सुधारलेली आहे असें मुळींच म्हणता येणार नाहीं. जोंपर्यंत टीकेंतील शास्त्रचर्चेपेक्षा तिच्यामध्यें टीकाकारानें केलेली लेखकाची कुचाळी व मर्मभेद वाचकांना अधिक गोड लागत राहील तोंपर्यंत हें असेंच चालावयाचें.

## उपसंहार

असो. गेल्या शे-दीडशें वर्षांतील मराठी टीकावाङ्मयाच्या विकासाचा हा असा त्रोटक आढावा आहे. त्यावरून मराठी टीकाशास्त्राचें पाऊल उत्तरोत्तर पुढे पडत असून त्याचें भविष्य उज्ज्वल असल्याचीं चिन्हें स्पष्ट दिसत आहेत. मराठीमध्यें हिंदुधर्माप्रमाणें एक विशिष्ट चिवटपणा आहे. ती वाकते पण मोडत नाहीं. मराठीनें संस्कृतला मस्तकीं धरूनच आपल्यात मुरवून टाकिलें आहे. त्याचप्रमाणें पाश्चात्य टीकापद्धतीला काहीं काळ डोक्यावर धरता धरता ती तिला आत्मसात् करून टाकील यात शंका नाहीं. पाश्चात्य टीका ही मराठीचा कायाकल्प करणारी वनस्पति आहे. मराठीच्या मूळच्या शरीराचा जोम वाढला कीं, ती मूळ शरीरात मुरून जाईल. मराठीची स्वाभाविक सर्जनक्षमता आपल्या तेजाने तळपूं लागल्यावर तिच्या कपाळीं लागलेला ' परपुष्ट 'तेचा डाग धुऊन जाण्यास कितीसा काळ लागणार आहे !

● ● ●

: ६ :

# मराठी अर्थशास्त्र

प्रा. रा. वि. ओतुरकर

'अर्थशास्त्राच्या प्रांतांत हिंदुस्थानांत अद्याप एखादा बोस किंवा रामन् उदयास आलेला नाहीं.'

गेल्या २५ वर्षांतील काळ म्हणजे आंतरराष्ट्रीय राजकारणाच्या दृष्टीनें दोन महायुद्धाच्या दरम्यानचा काळ, राष्ट्रीय दृष्ट्या भावी स्वराज्याच्या भोगवटयात हिस्सेरशीने भागीदारी मागणाऱ्या पक्षोपपक्षाच्या भांडणाचा काळ, औद्योगिक दृष्ट्या कांटेतोल संरक्षक धोरणाच्या साह्यानें कांहीं नवे धंदे उदयास येण्याचा काळ, जपानी मालाच्या चढाओढीचा व ब्रिटिश व्यापाऱ्यांनीं हिंदुस्थानची बाजारपेठ आपल्या ताब्यात ठेवण्यासाठीं धडपड करण्याचा काळ, म. गांधींच्या आश्रयानें खादी व ग्रामोद्योग यांच्या उत्तेजनाचा काळ, सरकारी तंत्रानें चालणारी सहकारी चळवळ व जनतेंत उदय पावलेली ग्रामसंघटना यांच्या समांतर विकासाचा काळ; शेती, कारखान्यांतील मजूरवर्ग, बँका, चलनविषयक प्रश्न, वाहतूक वगैरे आर्थिक प्रश्नासंबंधीं चौकशीमंडळें नेमून त्या प्रश्नाचें स्वरूप समजून घेण्याचा काळ, इ. स. १९३७ सालीं प्रांतिक स्वराज्य प्राप्त झाल्यावर शेतकीकर्जे, जमीनदार कुळें, वतनदारी, जमिनीचा सारा, कारखान्यांतील संप, धनकोनियंत्रण, छोट्या उद्योगधंद्यास उत्तेजन इत्यादि प्रश्न हाताळून त्यासंबंधींच्या सुधारणा अमलांत आणण्याचा काळ, अशा जुजबी उपाययोजनेनें संतुष्ट न पावलेल्या समाजसत्तावादी व साम्यवादी तरुणाकडून झालेल्या मार्क्सवादाच्या पुरस्काराचा काळ, मार्क्सवादाचीं तत्त्वें हिंदुस्थानास लागू कशीं होऊं शकतात

या मुद्द्यावर त्या पक्षात उत्पन्न झालेल्या मतमतांतरांचा काळ, दुसऱ्या महायुद्धात मोठमोठ्या कारखान्यांच्या उपयुक्ततेची पुनः एक वार तीव्रतर जाणीव होऊन हिंदुस्थानांत त्यांची स्थापना कशी होईल यासंबंधीं युद्धोत्तर नियोजनांच्या आंखणीचा काळ, अशा प्रकारचें या काळाचें त्रोटक समालोचनपर वर्णन करता येईल.

महाराष्ट्रापुरतें आर्थिक दृष्ट्या समालोचन करावयाचें तर, या काळातील धुळें, पुणें, किर्लोस्करवाडी, कऱ्हाड, सांगली, सोलापूर, वालचंदनगर, फलटण, कोल्हापूर, बेलापूर वगैरे ठिकाणीं सुरू झालेले उद्योगधंदे; मुंबई, पुणें, इत्यादि ठिकाणीं स्थापन झालेल्या नवीन बँका, त्याच ठिकाणच्या महाराष्ट्र चेंबर व मराठा चेंबर ऑफ कॉमर्स अशासारख्या व्यापारमंडळ्या, ' अर्थ ', ' उद्यम ', प्रावीण्य ', ' व्यापारी महाराष्ट्र ' वगैरेसारखीं या विषयासंबंधीं विचार करणारीं नियतकालिकें, रे इडस्ट्रियल म्यूझियमसारख्या संस्थाच्या विद्यमानें भरणारीं प्रदर्शनें, मधूनमधून होणारीं कारखानदाराचीं संमेलनें. शेतीच्या अर्थशास्त्रज्ञाच्या परिषदेचीं दोन अधिवेशनें, गोखले इन्स्टिटयूटमार्फत पुणें, सोलापूर, वाई येथे झालेले आर्थिक संशोधन, सातारा व कऱ्हाड येथे श्री. पु. पा. गोखले यांनीं केलेली आर्थिक पहाणी, पदवीपरीक्षेसाठीं आर्थिक संशोधनाचा विषय घेऊन तन्निमित्त झालेली एखाद्या खेडेगावाची किंवा तालुक्याची पहाणी किवा केवळ हौसेनें कुणी केलेली विणकर-धंद्याची पहाणी, श्री. पडित यानीं केलेलें महाराष्ट्र व कर्नाटक प्राताच्या आर्थिक परिस्थितीचें धावतें समालोचन, सहकारी संस्था किंवा शेतकीखातें याच्या मार्फत शेती अधिक किफायतशीर करून पहाण्याचे प्रयोग, लहानमोठे ग्रामसंघटनेचे यत्न या सर्वांचा आढावा विचारात घ्यावा लागेल. येथें ' आर्थिक दृष्ट्या ' हा शब्द अगदीं शास्त्रीय अर्थानें वापरलेला नाहीं. ' औद्योगिक उन्नतीच्या दृष्टी'नें असा स्थूल अर्थ त्या ठिकाणीं अभिप्रेत आहे. तसेंच वर केलेलें परिगणन हें काहीं सर्वंकष नाहीं. लिहिताना आठवली त्याप्रमाणें निरनिराळ्या घडामोडींची, चळवळींची व उद्योगांची नोंद कांहींशी दिग्दर्शनापुरती केली आहे.

पण आपणास आर्थिक घडामोडींचे समालोचन येथे कर्तव्य नाहीं. त्या

निमित्तानें मराठींत प्रसिद्ध झालेल्या वाङ्मयाचें व महाराष्ट्रात उदय पावलेल्या विचारप्रवाहाचे समालोचन हा प्रस्तुतचा विषय आहे.

मराठींतील आर्थिक वाङ्मय ( १ ) स्वतंत्र पुस्तकें, ( २ ) मासिकांतील लेख, ( ३ ) वर्तमानपत्री लेख यामध्यें विखुरलेले आहे. पैकीं वर्तमानपत्री लेखाची जंत्री करणें प्रायः अशक्य. कदाचित् अनावश्यकहि म्हणून ते सोडून देतों. मासिकातून प्रसिद्ध झालेल्या महत्त्वाच्या लेखाची व लेखमालाची नोद करणें मात्र आवश्यक आहे. पण तूर्त तें सोडून देतों.

इ. स. १९३७ अखेर प्रसिद्ध झालेल्या पुस्तकाची वर्गीकृत नोद श्री. शंकर गणेश दाते यानीं प्रसिद्ध केलेल्या ' मराठी ग्रंथसूचि ' नामक प्रचंड ग्रंथात व्यवस्थित रीतीनें केलेली कोणासहि पहावयास मिळेल. ( मराठी ग्रंथसूचि, पृ. २५७–६५ पहा ).

इ. स. १९३७ नंतर प्रसिद्ध झालेल्या आर्थिक विषयावरील पुस्तकाची याद सोबत अखेरीस देत आहे. प्रस्तुत नोंद करण्याचा प्रश्न बाजूस ठेवून प्रसिद्ध वाङ्मयाचें मूल्यमापन करण्याकडे वळतों.

आपल्या मनातील विचारांची खळबळ व्यक्त करण्यासाठीं केलेल्या धडपडींत वाङ्मयाचा जन्म होतो. तसेच अमुक एक दुसऱ्याचा विचार परकीय भाषेंत लिहिलेला आहे तो आपणास समजला आहे तसा आपणाप्रमाणेंच इतरेजनानाहि कळावा म्हणूनहि तो विचार भाषांतररूपानें किंवा स्वतः पचवून स्वतःच्या शब्दात लिहिला जातो तेंव्हाहि वाङ्मय उत्पन्न होतें. या दोन प्रकारापैकीं पहिल्या प्रकारचें वाङ्मय अर्थातच उच्च दर्जाचें ठरतें. प्रचलित आर्थिक परिस्थितीसंबंधीं विचार करून स्वतःस सुचलेले सिद्धान्त आवेशानें माडणे, इतराच्या विचाराचें खंडन करणे, स्वतःस इष्ट वाटणाऱ्या विधायक योजनाचा पुरस्कार करणें हें महत्त्वाचें काम आहे. अशा कामातहि अधिक बारकावा काढला तर सूक्ष्म वर्गवारी करतां येईल. काहीं विशिष्ट सुधारणा महत्त्वाची वाटून तिचा पुरस्कार करणें, उदाहरणार्थ, सहकाराची किवा ग्रामसंघटनेची, खादीची, किवा सुवर्णमूल्यमापन उपयोगांत आणण्याची चळवळ हातीं घेऊन तिचा विचार करीत असता, तसेंच सरकारी बऱ्या-वाईट उपाययोजनावर विधायक विध्वंसक टीका करीत असता सहजच

बऱ्या दर्जाचें आर्थिक वाङ्मय पैदा होत असतें. पण त्याहीपेक्षां महत्त्वाचें वाङ्मय म्हणजे व्यापक विचार व्यक्त करणारे वाङ्मय होय. म्हणजे असे कीं, कोणताहि विषय प्रतिपादीत असता सर्व हिंदी समाजाची आर्थिक रचना नजरेसमोर ठेवून विचार करीत असलेल्या प्रश्नाचें त्या रचनेंत सापेक्ष स्थान कोणते हें लक्षांत घेऊन तो विचार त्या रचनेशीं एकजीव होऊ शकेल अशा रीतीनें व्यक्त करणें हे महत्त्वाचें आहे. आर्थिक रचनेचीं विविध अंगें असलीं तरी त्याचा परस्पराशीं निकट संबंध असतो व आर्थिक रचना ही ऐनजिनसी असते. उदाहरणार्थ, सध्या शेतीच्या जमिनींचे लहान लहान तुकडे झाले आहेत व त्यामुळें जमिनीची मशागत किफायतशीर होऊं शकत नाहीं यावर उपाययोजना सुचविताना केवळ ती तेवढ्यापुरतीच न ठेवता आर्थिक रचनेंत उत्पन्न झालेला दोष हा समाजाच्या इतर अंगांशीं संबद्ध आहे हे लक्षात घेणें व एकंदर समाजाच्या आर्थिक रचनेचें ध्येय कोणतें असावे यासंबंधीं स्वतःच्या मनाशीं आपली कल्पना निश्चित करून त्या अंतिम ध्येयाशीं जुळणारी उपाययोजना सुचविणें हें अर्थातच व्यापक स्वरूपाचें म्हणून अधिक महत्त्वाचें आहे. याहूनहि आणखी उच्च दर्जाचे असें कार्य म्हणजे अर्थशास्त्राच्या प्रस्थापित सिद्धान्ताची मूळ भूमिका कितपत बरोबर आहे, सर्वसामान्य वाटणारे सिद्धान्त खरोखरीच सर्वसाधारण आहेत कीं काय याचा विचार करणें व अशा रीतीनें खुद्द त्या शास्त्राच्या विकासास स्वतःच्या विचाराचा हातभार लावून साह्य करणें होय. कारण हा विचार मूलग्राही स्वरूपाचा आहे. साराश, आपल्या मनांतील विचारांची खळबळ व्यक्त करणाऱ्या धडपडींत ज्या वाङ्मयाचा जन्म होतो तें समाजांतील जिवंत वाङ्मय होय. त्या वाङ्मयाचें त्रिविध स्वरूप एकागीं निरीक्षणात्मक व्यापक निरीक्षणात्मक व मूलग्राही असें वर स्पष्ट केलें आहे.

मराठींत अशा प्रकारचें त्रिविध वाङ्मय आहे काय? या प्रश्नास अगदींच नकारार्थी उत्तर देण्याचें कारण नाहीं. पण अर्थशास्त्राच्या विद्यमान जागतिक विचारात आपल्या विचाराची भर टाकणारे मूलग्राही वाङ्मय मराठींत अजून प्रसिद्ध झालेलें नाहीं. याचा अर्थ असा कीं, अर्थशास्त्राचा कोणताहि पूर्वीं न सुचलेला नवा सिद्धान्त पुढे माडणें किंवा असलेला चुकीचा ठरविणें किंवा त्या विचाराची अजून माहीत नसलेली बाजू पुढें

मांडणें अशा प्रकारचें लेखन मराठींत अद्याप झालेलें नाहीं. किंबहुना नामांकित जागतिक अर्थशास्त्रज्ञांच्या पंक्तीला जाऊन बसण्याची ज्याची योग्यता, आहे ज्याचें ग्रथ हिंदुस्थानातच काय, पण जगांत इतरत्रहि वाचले गेले नाहींत तर तेथील लोकांचें अर्थशास्त्राचे ज्ञान तेवढ्यापुरतें अपुरें राहील अशा उंचीचा नामांकित अर्थशास्त्रज्ञ महाराष्ट्रात वा हिंदुस्थानात अद्यापि जन्मावयाचा आहे. साराश, अर्थशास्त्राच्या प्रांतांत अजून हिंदुस्थानात बोस किंवा रामन् उदयास आलेला नाहीं असें म्हणणें प्राप्त आहे.*

पण याहून अंमळ खालच्या पायरीवर येऊन अर्थशास्त्राचे प्रस्थापित सिद्धान्त कित्येक पाश्चिमात्य विद्वानानीं मानले त्याप्रमाणें सर्वसामान्य नाहींत हें सांगून हिंदी परिस्थितीत अर्थशास्त्राची माडणी काहीं निराळ्याच गृहीत गोष्टीवर करावी लागेल असा इषारा देण्याचें कार्य न्या. मू. रानडे यांनीं बऱ्याच वर्षांपूर्वीं केले व त्यासाठीं त्याना अर्वाचीन हिंदी अर्थशास्त्राचे प्रणेते असें आदरानें म्हणतात तें बरोबर आहे. हिंदी अर्थशास्त्र म्हणजे नुसतें पाश्चिमात्य अर्थशास्त्रीय सिद्धान्ताच्या अनुरोधानें केलेलें हिंदी आर्थिक स्थितीचें सटीक निरीक्षण परीक्षण नव्हे. हिंदी आर्थिक रचनेच्या बुडाशीं कोणत्या गोष्टी आहेत त्याचा तपशील सांगणे हे काम न्या. मू. रानडे यानीं केलें.

इ. स. १९४१ सालीं न्या. मू. रानडे याच्या जन्मास १०० वर्षें पुरीं झालीं तन्निमित्त मुंबईस भरलेल्या अर्थशास्त्रज्ञाच्या परिषदेंत न्या. रानडे यांच्या

* ( कदाचित् प्रा. राधाकमल मुकर्जी किंवा प्रा. विनयकुमार सरकार या विधानास अपवाद म्हणून दाखविता येतील. पाश्चिमात्य ग्रंथकारांनीं हिंदी अर्थशास्त्रज्ञांच्या स्वतत्र शोधास मान्यता दिल्याचें एक उदाहरण आहे. मिसेस् जोन रॉबिन्सन यानीं आपल्या ‘ इंपरफेक्ट कॉंपिटिशन ’ या ग्रंथाच्या प्रस्तावना पृ. ६ वर असें म्हटलें आहे कीं, त्यांनीं माडलेलें इंपरफेक्ट कॉंपिटिशनचें स्वरूप त्यांच्या पूर्वीं प्रा. मेहेता व इतर युरोपियन अर्थशास्त्रज्ञांस सुचलें होतें. युरोपियन ग्रंथकारांनीं हिंदी अर्थशास्त्रज्ञांच्या केलेल्या उल्लेखाची अशी नोंद करणें मनोरंजक होईल यांत शंका नाहीं. )

या विचारास प्रा. अंजारिया यानीं उजळा दिला. त्याच्या आधल्या वर्षी प्रा. गाडगीळ यानीं बगलूर येथें झालेल्या अर्थशास्त्रपरिषदेच्या अध्यक्षीय भाषणात इंग्रजाची अर्थशास्त्रीय विचारसरणी संक्रमणकालातील हिंदी परिस्थितीस लागू केल्यानें कोणते दुष्ट परिणाम होत आहेत हें सागितलें आहे. त्याप्रमाणें हिंदी कारखान्यातील मजुरीचे दर व त्याचे नियमन हिक्स यानीं तत्संबंधीं प्रतिपादलेल्या सिद्धान्ताहून कसे भिन्न प्रकाराचें होतें, व ते सिद्धान्त सर्वसाधारण लागू होण्याजोगे आहेत असे मानण्यात प्रा. हिक्स कसे चुकले आहेत तें प्रा. धनंजयराव गाडगीळ यानीं आपल्या पाटणा येथील इ. स. १९३९-४० च्या बनाइलि व्याख्यानमालेत दाखविले आहे. ही व्याख्यानमाला पुस्तकरूपाने इ. स. १९४३ सालीं प्रसिद्ध झाली. प्रा. गाडगीळ याच्या ग्रथाखेरीज प्रसिद्ध महाराष्ट्रीय अर्थशास्त्रज्ञ प्रा. भा. पु. आडारकर यानी ( Indian Fiscal Policy ) या नावाचा एक प्रचंड ग्रंथ इग्रजींत लिहिलेला आहे. त्यात लेखकानें काहीं पाश्चिमात्य लेखकानीं बहुधा अद्याप न माडलेल्या अशा काहीं नवीन विचाराची माडणी केलेली आहे. हिंदी उद्योगधद्यास सरकारनें इ. स. १९२२ सालच्या फिस्कल कमिशनच्या शिफारसीप्रमाणे दिलेलें संरक्षण अपुरें आहे हा मुद्दा अनेकांनीं प्रतिपादलेला आहे. कित्येक बाल्यावस्थेत असलेल्या धंद्यास संरक्षण दिलें म्हणजेच ते सवर्धित होतात, हाहि विचार नवीन नाहीं. परंतु जागतिक आर्थिक चढाओढींत काहीं देश पुढारलेले तर काहीं देश बाल्यावस्थेंत असतात व त्याच्या औद्योगिक उन्नतीच्या विचार करतांना केवळ एखाद्या धंद्यास सरक्षण हवें कीं नको एवढा मर्यादित विचार करून भागणार नाहीं, असा ‘ आर्थिक बाल्यावस्थेतील राष्ट्रा ’चा सिद्धान्त प्रा. आडारकरांनीं या ग्रंथात सयुक्तिक रीतीनें माडला आहे. पण या उभयविद्वानाचे हे पहिल्या दर्जाचें लेखन इंग्रजींत आहे. किंबहुना या ठिकाणीं असेहि विधान करण्यास हरकत नाहीं कीं, आर्थिक वाङ्मय व विचार या दोहोंपैकीं आर्थिक विचारात आजतागायतपणा राखण्याचे कामीं आमचे महाराष्ट्रीय अर्थशास्त्रज्ञ कोणत्याहि प्रकारें मागसलेले नाहींत. एक काळ असा होता कीं, पाश्चिमात्य देशात चर्चा होऊन शिळे झालेले विचार हिंदुस्थानांतील प्राध्यापक पाडित्यपूर्ण पद्धतीनें शिकवीत असावयाचे. मार्क्सचा उदय

होऊन पन्नास वर्षे लोटल्यावर येथें त्याच्या विचारसणीचा विद्वान् म्हणविणारासहि गंध नव्हता. आज ही स्थिति पालटली आहे. युरोपात चर्चिले जात असलेले अर्थशास्त्रीय नवे नवे प्रश्न हिंदी शास्त्रज्ञाच्या सभासंमेलनातून चर्चेचे विषय होऊं शकतात. पण हे सर्व विद्वान् तितक्याच तत्परतेनें सामान्यजनाच्या बोधभाषेंत ते लिहून आपल्या ज्ञानाचा फायदा मात्र करून देत नाहींत.

आर्थिक विचाराचा मुद्दा घटकाभर सोडून देऊन मराठी वाङ्मयाकडे वळलें तर श्री. गो. म. जोशी यानीं लिहिलेला 'हिंदूंचें अर्थशास्त्र' हा ग्रथ मराठींत अर्थशास्त्रविषयक वाङ्मयात वरच्या दर्जाचा आहे यात शंका नाहीं. कारण त्यात पाश्चिमात्य अर्थशास्त्रीय सिद्धान्त हिंदी परिस्थितीच्या निकषावर घासून ते कसे चुकीचे आहेत हे दाखविण्याचा बराच यशस्वी असा प्रयत्न आहे. लेखकानें पाश्चिमात्य अर्थशास्त्राचे पुरतें ज्ञान करून न घेतल्यानें व माडावयाच्या सिद्धान्तापेक्षा त्याचा आविर्भाव बराच मोठा असा प्रकार झाल्यानें आपले मूल्यवान् विचार अस्पष्ट म्हणून दुर्बोध करून ठेवले आहेत. पण मराठींत अव्वल दर्जाचे अर्थशास्त्रविषयावरील वाङ्मय म्हणून या ग्रंथाकडे निःसंशय बोट दाखवावे लागेल. वानगीदाखल या ग्रथातील एकच उतारा वाचकास सादर करतोः—

"सर्व जगत् अन्नमय असून विवक्षित गट विवक्षित अन्नच का निवडतात याचा काहीं तरी खुलासा व्हावयास पाहिजे. आर्थिक उत्पादनाचीं साधनें बदलल्यामुळें असा फरक पडण्याचा आधुनिक दृष्टीने सभव आहे. परंतु मला हें मत पटत नाहीं. पूर्वीं मांस मिळत असे व आता मास मिळत नाहीं असाहि प्रकार काहीं नाहीं. तरी देखील पचद्राविड ब्राह्मण जाती निवृत्तमास का राहिल्या याचा खुलासा व्हावयास पाहिजे. सागण्याचा अर्थ असा कीं, निव्वळ भूक हीच स्थिति घेतली तरी तिच्या समाधानात कल्पनाचा फारच मोठा भाग येतो. पैसा आणि वेळ वाचविण्याकरिता सामुदायिक स्वयपाकगृहें स्थापन करावींत याचा अर्थ एकूण एक सर्व माणसाची अभिरुचि एकरूप व्हावी असा असतो. हा एकच विषय घेतला तर आर्थिक घटनेनें चालीरीतींत फरक पडतात हें म्हणणें बरोबर नाहीं असे सहज दाखवितां

येईल. आज पंचद्राविडात जी तुरळक मासाहाराची प्रवृत्ति दिसते ती आर्थिक घटनेमुळें उत्पन्न झाली नसून सामाजिक कल्पनाच्या बदलामुळें झालेली आहे... म्हणून असे म्हणता येईल कीं, जगांत सर्व ठिकाणीं अन्नग्रहणामध्ये कल्पना (Ideology) हीच प्रधान असते" (पृ. १४६-४७). या ग्रंथात दिसून येणारी आब्यता, आविर्भाव बोजडपणा हीं लक्षात घेऊनहि असे म्हणावेंसें वाटतें कीं, इंग्रजींत भाषांतर झालें पाहिजे अशा या योग्यतेचा हा ग्रंथ आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं.

आर्थिक दृष्टया हिंदुस्थान आज संक्रमणावस्थेंत आहे. भावी काळात हिंदी समाजाची आर्थिक रचना खासगी मालमत्तेवर उभारलेल्या पण काहींशा उदार तत्त्वावर अधिष्ठित भांडवलशाही स्वरूपाची असणार, कीं समाजवादी वा साम्यवादी असणार, कीं म. गांधीच्या विचारसरणीच्या अनुरोधानें यंत्रयुगाकडे पाठ करून हस्तव्यवसायावर भर देऊन साधी रहाणी, किमान गरजा, उच्च विचार या तत्त्वज्ञानाचा अवलंब करणार, कीं यापेक्षा आणखी एकादा नवा चौथा प्रकार अस्तित्वांत येणार किंवा येणें इष्ट आहे याची कल्पना विचारांत घेऊन त्या दिशेनें निरनिराळ्या आर्थिक व सामाजिक प्रश्नांवर काहीं थोड्या नामांकित लेखकांनीं आपले विचार मराठींत प्रसिद्ध केले आहेत. अशा लेखकात श्री. शंकरराव जावडेकर यांच्या लेखनास उच्च स्थान द्यावें लागेल. उदाहरणार्थ, त्यांचा 'आधुनिक भारत' हा ग्रंथ पाहा. राजकारणाप्रमाणे अर्थकारणातहि गांधीवादाची फोड करण्यात श्री. जावडेकराइतकें कौशल्य क्वचितच कुणास लाभले असेल. भांडवलशाहीप्रमाणें वर्गविग्रहाच्या तत्त्वज्ञानासहि त्याचा जो विरोध आहे तो त्यानीं मोठ्या आवेशानें आपल्या लेखनात व्यक्त केला आहे. नुसत्या हिंदी परिस्थितीसंबंधींच नव्हे तर तात्त्विक अर्थशास्त्राच्या स्वरूपासंबधींहि काही मूलग्राही स्वरूपाचे विवेचन श्री. जावडेकर यानीं केलेलें त्याच्या 'अर्थशास्त्र कीं अनर्थशास्त्र' या पुस्तकात सापडेल. हे पुस्तक रस्किनच्या 'Unto this last' या पुस्तकाचें भाषांतर असून त्यास श्री. जावडेकर याची प्रस्तावना आहे. भाषांतर ९५ पृष्ठे व प्रस्तावना ४५ पृष्ठाची आहे व तो अर्थशास्त्रावरील त्याचा एक निबंधच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. अर्थशास्त्र हें सामाजिक शास्त्र आहे व कोणत्याहि सामाजिक शास्त्राला ध्येयदर्शनापासून

अलिप्त राहतां येत नाहीं. अशी श्री. जावडेकराची विचारसरणी आहे. प्रस्तावनेच्या पृ. ४४ वर ते म्हणतातः—

‘ अत्यंत भौतिक सुखासक्ति ही जशी नीतिमत्तेला मारक होते तशी ती विद्यावृद्धि वै कलावृद्धि यांनाहि मारक बनते याची जाणीव समाजांत सुधारणा किंवा क्राति करूं इच्छिणारांना झाली पाहिजे व याच जाणिवेनें अर्थशास्त्राचीहि मांडणी केली पाहिजे. ’ अर्थशास्त्राची मांडणी ध्येय प्रधान असावी हा श्री. जावडेकर यांचा विचार मतभेदातीत किंवा नवीन नसला, तरी तो मराठींत आग्रहपूर्वक व सयुक्तिक रीतीनें त्यानींच प्रथम मांडला आहे यात शंका नाहीं.

हिंदी अर्थरचनेचें भावी ध्येय आपापल्या कल्पनेप्रमाणें मनात ठेवून मराठींत लेखन करणारे आणखी एक लेखक वर उल्लेखिलेले प्रा. धनंजय-राव गाडगीळ हे होत. मात्र हें भावी ध्येय त्यांच्या लेखात श्री. जावडे-कराप्रमाणें स्पष्ट शब्दात आलेलें नाहीं. ‘ हिंदुस्थानचा आर्थिक इतिहास ’ या पुस्तकाखेरीज त्याचे लेख मासिकांतून विशेषतः लोकशिक्षणातून इ. स. १९२८–३९ या दहा-अकरा वर्षांत प्रसिद्ध झालेले आहेत. नाना विषयावर लिहिलेल्या त्याच्या स्फुट लेखनावर राष्ट्रीय विचाराचा उमटलेला ठसा कोणासहि स्पष्ट दिसेल. अशाच प्रकारें स्वतःच्या स्फुट लेखांतून आपल्या ध्येयविषयक कल्पनेची पार्श्वभूमि कायम ठेवलेलें लेखन प्रि. कोल्हटकर यांच्या लोकशिक्षणातील कृषिविषयक लेखातून दिसून येईल. श्री. जावडेकर, प्रि. गाडगीळ व प्रि. कोल्हटकर याचेखेरीज ज्याना भाई अशी सज्ञा देण्यांत येते, त्याचें लेखनहि—विशेषतः त्याच्यातील श्री. डागे व श्री. सरदे-साई यांचें लेखन व्यापक दृष्टि ठेवून केलेलें असतें. कुणास त्याची विचार-सरणी पटो वा न पटो, त्यांनीं लिहिलेल्या लेखनात नुसती भावनापूर्ण शब्दात केलेली मार्क्सवादाची उसनवारी नाहीं, एवढें सागणें प्राप्त आहे.

अर्थशास्त्रविषयक लेखन करणारांत प्रचलित आर्थिक प्रश्नांची सोप्या भाषेत सटीक फोड करून सांगणारा वर्ग फार मोठा आहे. चलन, हुंडणावळ संरक्षक जकाती, ओटावा करार, स्टर्लिंग कर्ज, मॅनेजिंग एजन्सीची पद्धत वगैरे अनेक प्रचलित प्रश्नांचें मासिकांतून विवेचन करण्यांत प्रि. गाडगीळ

प्रि. कर्वे, प्रा. पाळंदे, प्रा. नातु, प्रा. महाबळ, श्री. आ. रा. भट. वगैरे-सारख्यांनीं पुढाकार घेतला आहे.

अर्थशास्त्रविषयक मराठी वाङ्मयांत महत्त्वाची भर टाकणारात श्री. पा. वा. गाडगीळ याना महत्त्वाचें स्थान आहे. त्याचा मार्क्सच्या कॅपिटलचा सारग्रंथ, समाजवादाचा ओनामा व सुलभ समाजवाद हीं पुस्तकें मराठी वाचकास कम्युनिस्ट मतप्रणालीचा परिचय करून देतील, पण त्यांच्या लेखनातून, विशेषतः पहिल्या ग्रंथात सुबोधता किंवा पुरेसा तेवढा स्पष्टपणा आलेला आहे असें म्हणवत नाहीं. मार्क्सवादाचें स्वरूप मराठींत स्पष्ट करून सागण्याची कामगिरी श्री. सुंठणकर यानींहि बऱ्याप्रकारें केलेली आहे. मार्क्सवादाखेरीज अर्थशास्त्रासंबंधींचे दुसरे विषय सोप्या भाषेंत समजून सागणारे ग्रंथ महाराष्ट्रातील नामांकित अर्थशास्त्रज्ञ प्रा. काळे यानीं लिहिलेले आहेत. त्याची हिंदुस्थानची रिझर्व्ह बँक, बँका व त्याचे व्यवहार व व्यापारी घडामोडी हीं पुस्तकें तो तो विषय मराठींत स्पष्ट करून सागणारीं आहेत. तसेच श्री. न. वि. गाडगीळ यानीं हिंदी अदाजपत्रकें व ग्यानबाचें अर्थशास्त्र हीं पुस्तकें लिहून अर्थशास्त्रीय विषयाचा मराठी वाचकास परिचय करून दिला आहे. पण या ग्रंथात इंग्रजींतील अद्ययावत् अर्थशास्त्रज्ञाच्या विचारसरणीचा मराठी वाचकासाठीं परिचय करून दिलेला आहे असें मात्र म्हणता येणार नाहीं. किंबहुना त्यानींहि तसें ग्रंथलेखनाच्या उद्देशात म्हटलेलें नाहीं.

खास अर्थविषयक प्रश्नाची चर्चा करणारीं व माहिती देणारीं जीं नियत-कालिकें महाराष्ट्रात आहेत त्यात श्री. काळे पितापुत्रानीं संपादिलेले ‘ अर्थ ’, श्री. घारे यानीं संपादिलेलें ‘ व्यापारी महाराष्ट्र ’, नागपूरचा ‘ उद्यम ’ याचा उल्लेख केला पाहिजे. त्यात ‘ अर्थ ’ प्रचलित हिंदी आर्थिक प्रश्नाची शास्त्रीय चर्चा करतें व माहिती देते. ‘ व्यापारी महाराष्ट्र ’ हें महाराष्ट्रातील व्यापारीवर्गास उपयुक्त होईल अशा माहितीचा प्रसार करतें व ‘ उद्यम ’ हें उपयुक्त उद्योगधंद्याची माहिती करून देत असतें. या तीन नियतकालिकाखेरीज अर्थ-शास्त्रीय प्रश्नांवर महाराष्ट्रात पहिल्या प्रतीचें लेखन प्रकाशित करण्याचा मान ‘ लोकशिक्षण ’ या बंद पडलेल्या मासिकास विशेषतः त्याचे सपादक

श्री. जाभेकर यांचा आहे. 'लोकशिक्षणा'नंतर 'सह्याद्रि' व 'किर्लोस्कर' या मासिकातून आर्थिक प्रश्नाचा बऱ्या स्वरूपाचा ऊहापोह केव्हा केव्हा होतो ही त्यातल्या त्यात समाधानाची गोष्ट आहे.

मराठींतील आर्थिक वाङ्मय व विचार याचें हें त्रोटक समालोचन वाचणारास या विषयावरील वाङ्मयाची उणीव स्पष्टपणे नजरेसमोर येईल. ही उणीव का पडते व ती कशी दूर होईल याचा ऊहापोह प्रस्तुत लेखकानें 'अर्वाचीन मराठी साहित्य' या इ. स. १९३५ सालीं प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांतील निबंधात केलेला आहे. मराठींत उद्योगधंद्याच्या प्रश्नाचा विचार करणारीं नियतकालिके आहेत, पण त्याना गुजराथी 'मुंबई समाचाराची' सर येत नाहीं. कारण महाराष्ट्रात उद्योगधंदा करणारा मोठा वर्ग अद्यापीहि गुजराथी व मारवाडी आहे व त्याची बोधभाषा गुजराथी आहे. जे दक्षिणी अलीकडे धंद्यात शिरतात त्याना गुजराथी भाषेचे ज्ञान करून घेणे अवश्य झालें आहे. पंचवीस वर्षांपूर्वी महाराष्ट्रातील व्यापार गुजराथ्यांनीं चालवावा व गुजराथेतील शिक्षण-संस्था महाराष्ट्रीयांनीं चालवाव्या अशी देवघेव असे. आता सर्वत्र स्वहितजागृति झाली आहे व तिला प्रांतिक मत्सराचे स्वरूप येऊं पहात आहे. हा धोका टाळला पाहिजे व जातिवत मराठींतून व्यवहार करणारे व मोठ्या प्रमाणावर उद्योगधंदा करणारे महाराष्ट्रीय पुढे आले पाहिजेत.

महाराष्ट्रात एक प्रा. काळे व दुसरे गाडगीळ हे अपवाद म्हणून वगळले, तर पहिल्या दर्जाचे अर्थशास्त्रविषयक लेखन मुख्यतः मुंबई विद्यापीठाबाहेरील लेखकांनीं केलें आहे हें लक्षात ठेवले पाहिजे. याचे एक कारण विद्यापीठास जोडलेल्या कॉलेजातून शिकविणाऱ्या प्राध्यापकावर नाहीं म्हटलें तरी बंधनें आहेत. रशिया युद्धात पडल्यापासून आमच्या राज्यकर्त्यांचा कम्युनिझमकडे पाहाण्याचा दृष्टिकोन काहींसा बदलला म्हणून थोडेफार स्पष्टपणाने कम्युनिस्ट मतास पसती दाखविणारे वाङ्मय अशा लेखकास लिहू म्हटलें तर शक्य आहे. दहा वर्षांपूर्वी कम्युनिस्ट अर्थशास्त्रविषयक वाङ्मय चोरून वाचणेंच सुरक्षितपणाचें वाटावें अशी स्थिति होती. आज या स्थितींत झालेला बदल कायमचा आहे व आमच्या राजकर्त्यांचा दृष्टिकोन असाच राहील, हें कोणी सागावें ! अशा स्थितींत स्वतःची 'साम्यवादी' (कम्युनिस्ट) विचारसरणी

आडवळणाने व्यक्त करावी किंवा त्याचा संबंध नसलेल्या अशा दुसऱ्या विषयावर लेखन करावें अशा कोंडमाऱ्यांत कांहीं लेखक आहेत.

मराठींत अर्थशास्त्रविषयक लेखनास प्राध्यापकवर्ग पुढें न येण्याचें आणखी एक कारण इंग्रजींतून अध्ययन– अध्यपनाची अवश्यकता हें होय. ही परिस्थिति असताहि सामान्य जनतेसाठीं वाङ्मय प्रकाशित करणाऱ्या प्रकाशकार्नी आग्रह धरल्यास हातून काहीं लिहून होते. उदाहरणार्थ, ' लोकशिक्षण 'कार जाभेकर हे प्राध्यापकास लिहावयास लावीत. ' महाराष्ट्र सावत्सरिका 'चे संपादकहि अर्थशास्त्राच्या अभ्यासकास दरसाल लिहावयास लावीत असत, पण महाराष्ट्र सावत्सरिकाची दर वार्षिक आवृत्ति प्रकाशनाचा यत्न आर्थिक दृष्टया अंगावर येऊन तें बंद करणें भाग पडले. उत्कृष्ट वाङ्मयाच्या निर्मितीस लेखकाइतकेंच समजदार प्रकाशकाचें सहकार्य अतिशय आवश्यक आहे. प्रकाशक हा नुसता धंद्याकडे दृष्टि देणारा असता कामा नये; तसेंच तो नुसता त्यागवृत्तीनें सार्वजनिक कार्यास प्रवृत्त झालेला असून चालणारा नाहीं. मराठी वाचकांस काय हवें याची कल्पना असणारा व प्रकाशित होत असलेल्या वाङ्मयाचें स्वरूप निदान ढोबळपणाने तरी समजणारा असा प्रकाशक असल्यास त्यास हें काम साधेल. या दृष्टीनें श्री. य. गो. जोशी यांनीं वादविवेचन मालेमार्फत प्रसिद्ध केलेल्या पुस्तकाचा उल्लेख करणे जरूर आहे.

महाराष्ट्रात उद्योगधंद्यात पुढें आलेलीं जीं माणसें आहेत त्याचे दोन वर्ग पडतात. एक वर्ग सुशिक्षित आहे, पण त्याला लेखनाची आवड व संवय नाहीं. दुसरा अशिक्षित आहे. या वर्गातील लोकाना लक्षावधि रुपयाचा व्यवहार कसा करावा हें कळतें, परंतु लिहिणें वाचणें बेतापुरतेंच माहीत असतें; यामुळे व्यापारी जगत् व तत्संबंधींचें वाङ्मय यांचा संबंध दुरावलेला आहे. केव्हा केव्हां धंद्यात पुढें आलेल्या गृहस्थांच्या मुलाखती- ' किर्लोस्कर ' सारख्या मासिकातून येतात. परंतु त्यात व्यापारी ज्ञानापेक्षां वाङ्मयाची सजावट अधिक असते. व्यापारी जगत् व वाङ्मय यांची ज्याप्रमाणें फारकत आहे त्याचप्रमाणें अर्थशास्त्राचा पुस्तकी व शास्त्रीय अभ्यास करणारे व प्रत्यक्ष व्यापार उद्योगधंद्यांत पडलेले यांचीहि

फारकत आहे. खरोखर उद्योगधंद्यात पडलेल्यानीं अर्थशास्त्रज्ञांचें साह्य घेतल्यास त्याना त्या त्या धंद्यांतील आतरराष्ट्रीय घडामोडींची माहिती व आर्थिक संशोधनाच्या साह्याने धंद्याची पद्धतशीर माडणी व वाढ या गोष्टी साध्य करून घेता येतील व अर्थशास्त्रज्ञांना प्रत्यक्ष व्यवहाराचा परिचय झाल्यास त्यांच्या पुस्तकी ज्ञानाची मर्यादा व महत्त्व त्यांच्या प्रत्ययास येऊन त्याच्या अध्यापनास जिवंतपणा येईल. पण विश्वविद्यालयातील प्राध्यापकांस राजकारणाप्रमाणेंच व्यवहाराचाहि विटाळ होऊं नये असा पायंडा पडलेला दिसतो. यास थोडेबहुत अपवाद असतील; परतु आज महायुद्धोत्तर आर्थिक पुनर्घटनेची एवढी चर्चा योजना चालू असता त्या पुनर्घटनेच्या पूर्वतयारीस आवश्यक असे जें सशोधन व माहिती जमा करणें, या कामात विश्वविद्या-लयांतील किती प्राध्यापक गुंतविले गेले आहेत हे पाहिलें तर निराशा पदरीं पडेल. प्राध्यापकांची राजकारणापासून झालेल्या फारकतीस राजकीय परिस्थिति ही सबब तरी सांगता येण्यासारखी आहे. तशा कोणत्या सबबीनें प्रत्यक्ष व्यवहारापासून झालेल्या फारकतीचें समर्थन करता येईल कोण जाणे ? असो.

मराठींतील अर्थशास्त्रविषयक वाङ्मयाच्या मागसलेपणाची मीमासा वर सांगितल्याप्रमाणें अनेक प्रकारानीं करता येईल. तरी वाङ्मयाच्या इतर शाखां-प्रमाणें याहि शाखेंत निःसंशय पाऊल पुढें पडत आहे हे पहिल्या महायुद्धा-अखेरीपूर्वींच्या व नंतरच्या पंचवीस वर्षांतील मराठी वाङ्मयाची तुलना केल्यास कळून येईल. इंग्रजी राज्य सुरू होण्यापूर्वीं महाराष्ट्रांत व्यापारी व पेढ्याचे व्यवहार कोट्यवधि रुपयांचे होत. जमाखर्च ठेवला जाई, पत्रव्यवहार होई, हुंड्या दिल्या-घेतल्या जात व धंद्याच्या तेजीमंदीची चर्चा होई. तत्कालीन अशा प्रकारच्या व्यवहारांचें ज्ञान करून घेतल्यास अस्सल मराठींतील अर्थशास्त्राची परिभाषा आपोआप तयार होईल व मराठेकालीन उद्योगधंद्याची ओळख पटल्यास त्या व्यवहाराच्या बुडाशीं असलेल्या समजुती व गृहीत सिद्धान्त लक्षात येतील. हिंदी समाजाच्या आर्थिक रचनेस पाश्चिमात्य देशात वाढीस लाग-लेल्या अर्थशास्त्राचे सिद्धान्त लागूं पडत नाहींत असें कै. रानडे यानीं जें प्रतिपादिलें त्यास प्रत्यक्ष पुराव्यापेक्षां त्याच्या प्रतिभावान कल्पनाशक्तीचाच

विशेष आधार होता. त्यानीं त्याच्या मराठी सत्तेचा उत्कर्ष ( Rise of the of Maratha Power ) या प्रसिद्ध ग्रंथांत आपल्या प्रतिभाशक्तीच्या साह्यानें काहीं सिद्धान्त मांडले. त्यांच्या नंतरच्या काळात झालेल्या इतिहास-संशोधनानें त्यांच्या सिद्धान्तास बळकटी आली. हा इतिहासाच्या प्रांतात झालेला प्रकार अजून अर्थशास्त्रात झालेला नाहीं. वैद्य, तुळशीबागवाले, दीक्षित—पटवर्धन याच्या दप्तरांचा अभ्यास होऊन त्यावर प्रबंध तयार होऊं लागल्यास मराठी अर्थशास्त्रीय वाङ्मयाचें रोप नुसतें वरवर कलम केल्याप्रमाणें न राहतां जमिनींत मूळ धरील व तें वाङ्मय स्वतःच्या पेहेरावांत चमकूं लागेल.

## परिशिष्ट

## इ. स. १९३७ ते १९४४ या काळांत प्रसिद्ध झालेलीं अर्थशास्त्रावरील पुस्तकें

### अर्थशास्त्र

| | | |
|---|---|---|
| हिंदी लोकसंख्येचा प्रश्न | सौ. चंद्रकला हाटे | १९३९ |
| ग्याबनाचें अर्थशास्त्र | श्री. न. वि. गाडगीळ, पुणें, | १९४३ |
| हिंदी अंदाजपत्रकें | श्री. न. वि. गाडगीळ, पुणें, | १९४१ |

### चलनाविषयक

| | | |
|---|---|---|
| हिंदी चलनपद्धतीचा इतिहास | श्री. वाय्. व्ही. लोहकरे, सोलापूर | १९३८ |

### सहकारी चळवळ

| | | |
|---|---|---|
| सहकारी चळवळीचीं तत्त्वें | श्री. अ. ज. चिताम्बर | १९३८ |
| सहकारी चळवळीचे प्राथमिक पाठ | श्री. य. र. लाळे | १९४२ |

### पेढी

| | | |
|---|---|---|
| बॅकांचे व्यवहार व साधनें | श्री. ग. कृ. भोपटकर | १९३९ |

### कृषीची आर्थिक व्यवस्था

| | | |
|---|---|---|
| शेतीचें अर्थशास्त्र | श्री. स. सी. बर्वे | १९३७ |
| शेतकऱ्याच्या कर्जफेडीचा कायदा | श्री. वि. ग. तिखे | १९४० |

### हिंदी उद्योगधंदे

| | | |
|---|---|---|
| औद्योगिक महाराष्ट्राचे प्रश्न | श्री. ग. र. साठे | १९४१ |
| हिंदी कारखाने | श्री. द. गो. कर्वे | १९४१ |
| दुग्धव्यवसाय | श्री. स. रा. पाळंदे | १९४२ |
| उद्योगातून उत्कर्ष | श्री. विश्वेश्वरअय्या याच्या पुस्तकाचें भाषांतर | १९४३ |

### समाजवाद व समतावाद

| | | |
|---|---|---|
| सुलभ समाजवाद | श्री. पा. वा. गाडगीळ | १९३८ |
| मार्क्सवादाचा प्रयोग | श्री. स. रं. सुंठणकर | १९३८ |
| फाशिझम् अर्थात् संघटित भांडवलशाही | श्री. पा. वा. गाडगीळ | १९३९ |
| फॅसिझम् | श्री. एम्. एन्. रॉय याच्या पुस्तकाचें भाषांतर, भाषांतरकार श्री. गलगली | १९३९ |
| रॉयवाद | श्री. स. रं. सुंठणकर | १९३९ |
| साम्राज्यशाही | श्री. ना. ग. गोरे | १९३९ |
| महायुद्धाचे हिंदुस्थानावर आर्थिक परिणाम | श्री. श्री. अ. डांगे | १९४० |
| अराज्यवाद | श्री. पा. वा. गाडगीळ | १९४० |
| मार्क्सचा भौतिकवाद | श्री. पा. वा. गाडगीळ | १९४० |
| गांधीवाद | श्री. शं. द. जावडेकर | १९४१ |
| विश्वकुटुंबवाद | श्री. ना. ग. गोरे | १९४१ |
| राष्ट्रवाद | श्री. श्री. य. कोल्हटकर | १९४१ |
| हिंदी राष्ट्रवाद : विकास व भवितव्य | श्री. स. रं. सुंठणकर | १९४१ |
| चाळीस कोटी लोकांच्या अन्नाचा प्रश्न | श्री. बी. टी. रणदिवे | १९४३ |
| शास्त्रीय समाजवाद | श्री. शं. द. जावडेकर | १९४३ |

| | | |
|---|---|---|
| अर्थशास्त्र की अनर्थशास्त्र | रस्किनच्या अंटु धिस लास्टचें भाषांतर व प्रस्तावना लेखक श्री. शं. द. जावडेकर | १९४३ |

## आर्थिक इतिहासपर व वर्णनात्मक

| | | |
|---|---|---|
| कम्युनिस्ट पार्टीचा इतिहास | भाषातरकार श्री. एस्. व्ही. देशपांडे | १९४३ |
| सोव्हिएट रशिया | श्री. हिर्लेकर | १९४३ |
| रशियात तीन महिने | श्री. डी. जी. तेंडूलकर | १९४३ |

या यादींतील उपविषयवारीनें केलेले वर्गीकरण ' दाते ग्रंथसूची 'नें स्वीकारलेल्या तत्त्वावर केलेलें आहे. वर दिलेल्या यादींतील कित्येक पुस्तकें खास अर्थशास्त्रविषयक वाङ्मयांत बसवितां येणार नाहींत हें खरें; परंतु ज्यातील वर्णन आर्थिक सिद्धान्तांशीं निगडित आहे असे वाटलें त्यांचा या यादींत समावेश केलेला आहे.

● ● ●

[ टीपः—हा लेख तयार करताना मुंबईच्या पोद्दार व्यापारी कॉलेजचे प्राध्यापक श्री. मो. वि. भाटवडेकर व माझे सहकारी श्री. वसंत गोविंद सहस्रबुद्धे यांचें साह्य झालें. तसेंच वरील ग्रंथांची याद तयार करतांना डेक्कन व्हर्न्याक्युलर ट्रान्स्लेशन सोसायटीच्या कचेरीकडून बहुमोल साह्य झालें. —लेखक. ]

: ७ :

# तत्त्वज्ञान

वि. ह. निजसुरे

सदा विचारयेत्तस्माज्जगज्जीव परात्मनः । पञ्चदशी.

"God is the end of philosophy and the beginning of religion." —Dean Inge

(ईश्वरसिद्धींत तत्त्वज्ञानाचे पर्यवसान होतें व धर्माचरणाला प्रारंभ होतो.)

तत्त्वज्ञान हा सामासिक शब्द आहे. त्यात तत्त्व व ज्ञान अशीं दोन पदें आहेत. तत्त्व हा शब्द तत् सर्वनामाला त्व हा भाववाचक प्रत्यय लागून झाला आहे. तत् हें सर्वनाम आहे म्हणजे तें सर्व वस्तूंचें नांव आहे. संस्कृतमध्यें तत् या शब्दानें सामान्यतः कोणत्याहि वस्तूचा निर्देश करतात. त्व म्हणजे 'पणा' म्हणजेच गुण, धर्म, स्वरूप. तेव्हा तत्त्व म्हणजे सर्व वस्तूंचें मूळ स्वरूप व तत्त्वज्ञान म्हणजे सर्व वस्तूंच्या म्हणजेच जगाच्या स्वरूपाचा म्हणजेच मूळ कारणाचा बोध होय. जगाच्या मूळ स्वरूपाचें ज्ञान करून घेणारा देहात जो कोणी आहे तोच जीव. देहाच्या मूळ कारणाचा शोध घेता घेता जगाच्या द्वारें मूळ कारणाकडे आपण जातों व देहातील जो जाणणारा—त्यालाच आपण आत्मा म्हणतो—त्याच्याहि मूळ कारणाकडे आपण जातों. हीं दोन्ही मूळ कारणें खरोखर एकच होत. त्यासच 'ब्रह्म' अशी संज्ञा आहे. तेव्हा जगाकडून व शरीराकडून मूळ कारणाचे ज्ञान म्हणजे तत्त्वज्ञान. आत्म्याच्या द्वारें तेंच ज्ञान म्हणजे आत्मज्ञान व ब्रह्माकडून जग, देह व आत्मा याचें ज्ञान करून घेणें म्हणजे ब्रह्मज्ञान. तात्पर्य, तत्त्वज्ञान, आत्मज्ञान व ब्रह्मज्ञान ह्या तिन्ही शब्दाच्या अर्थांचें पर्यवसान एकच होय.

आतां कला ही ज्याप्रमाणें कलेसाठींच होय त्याप्रमाणें ज्ञान हेंहि ज्ञानासाठींच होय असा पाश्चात्याचा एक पक्ष आहे. पण पौर्वात्य तत्त्वज्ञांच्या मते ज्ञानाचें प्रयोजन आत्यंतिक दुःखाभाव होय. पण अशा तऱ्हेचें ज्ञान निव्वळ बुद्धीच्या कसरतीने होत नसून, तिला भावना व कृति यांची जोड पाहिजे व म्हणूनच वेद हे त्रिकाडात्मक आहेत. तात्पर्य, कर्मकांड, उपासनाकांड व ज्ञानकांड हे तीनहि तत्त्वज्ञानाचेच विभाग आहेत.

अशा ह्या तत्त्वज्ञानविषयावर इ. स. १९१४ पासून चालू सालपर्यंत झालेल्या मराठी ग्रथाचा अगदीं त्रोटक परामर्श ह्या निबंधांत घ्यावयाचा आहे. सर्व लहान-मोठ्या ग्रथाचा विचार करणे एवढ्याशा अवधींत शक्य नसल्यामुळें प्रसिद्ध लेखकाच्या ठळक कृतींचीच ओळख करून घेतां येईल. देशी भाषांतील तत्त्वज्ञानाच्या अलीकडील अभ्यासाला, इंग्रजी विद्येच्या या देशातील प्रसाराच्या सुरुवातीपासून आरभ झाला. इंग्रजी राज्यकर्ते विद्याप्रिय असल्यामुळें आणि ज्या प्रजेवर राज्य करावयाचे त्या प्रजेच्या चालीरीती, आचारविचार, धर्म व तत्त्वज्ञान याचेंहि ज्ञान प्रजेच्या व्यवहाराच्या ज्ञानाप्रमाणेच राज्यकर्त्यांस अवश्य असल्यामुळें इंग्रज विद्वान् हिंदूंच्या व इतरांच्या तत्त्वज्ञानाचा व धर्माचा अभ्यास करूं लागले. स्वाभाविकपणें हिंदूचे तत्त्वज्ञान व धर्म ग्रीक तत्त्वज्ञान व खिस्ती धर्म यापेक्षा कमी प्रतीचीं आहेत, असा त्याच्या प्रतिपादनाचा रोख झाला. तेव्हा आपल्या लोकांनींहि नवीन पद्धतीने अभ्यास करून आमच्या तत्त्वज्ञानाचें व धर्माचें श्रेष्ठत्व स्थापण्यास सुरुवात केली. ब्रह्मसूत्रे, गीता, उपनिषदें वगैरे तात्त्विक व धार्मिक ग्रथांचीं भाषातरें, सारग्रंथ, रूपांतरें, चर्चा व प्रवचने यानीं मोठी खळबळ व जागृति उडवून दिली. आमचा धर्म, तत्त्वज्ञान, आचारविचार वगैरेंना मानाचे स्थान मिळवून देण्यात आलें. अशा ग्रथांपैकीं लो. टिळकाचे ‘ गीतारहस्य ’ हा या कालखंडाच्या आरंभींचाच अत्यंत महत्त्वाचा ग्रंथ होय.

लोकमान्य टिळकाचे गीतारहस्य—वाल्मीकीनें रामायण रचिले, ही वार्ता त्यांची शिष्या आत्रेयी हिनें, जनस्थानांतील सीतेची सखी वनदेवता वासंती हिला सांगताच, ‘ हन्त तर्हि पण्डितः संसारः ( किंवा मण्डितः संसारः ) असे उद्गार वासंतीने काढले असें ‘ उत्तररामचरित ’ नाटकांत भवभूतीनें वर्णिलें आहे. सन १९१५ सालीं लोकमान्यांचा ‘ गीतारहस्य ’ हा उत्कृष्ट

ग्रंथ जेव्हा प्रथम प्रसिद्ध झाला तेव्हाहि संसाराला शोभा आली. लोक आता पंडित झाले असेच धन्योद्गार निघाले. टिळकांनीं या ग्रंथास ' कर्मयोगशास्त्र' असें नाव दिलें असल्यामुळें हा ग्रंथ ' नीतिशास्त्र ' ( Ethics ) या तत्त्व-ज्ञानाच्या विभागात जरी पडत असला तरी ' संस्कृतातील तत्त्वज्ञानें ' या सदरात येणाऱ्या साख्ययोग, न्याय, मीमासा वगैरेंच्या सिद्धान्तांचें सुबोध निरूपण त्यात असून शिवाय नीतीच्या सिद्धान्तास ज्या अध्यात्मशास्त्राची बैठक लागते त्या अध्यात्माचें शांकर अद्वैतानुरूपहि सुबोध निरूपण आलेलें आहे. लोकमान्यांनीं आचार्यांचें जीवब्रह्मात्मैक्य व मायावाद याचा स्वीकार केलेला आहे, पण स्थितप्रज्ञ हा विधिनिषेधातीत असला तरी त्यानें लोक-संग्रहाकरिता— स्वतःकरिता नव्हे— निष्काम कर्मयोगाचें आचरण करीत राहिलें पाहिजे असा गीतेचा सिद्धान्त असल्याचे त्यांनीं प्रतिपादन केलें आहे. गीतेचे प्रतिपाद्य ज्ञान–मूलक–भक्तिप्रधान कर्मयोग आहे असे टिळकांचे मत आहे. टिळकांनीं आधीं केलें, मग सांगितलें, या न्यायाने खडतर कर्मयोग आचरून दाखविला व मग उपदेशिला असल्यामुळे त्याच्या ग्रंथाचा परिणाम राष्ट्रोद्धारक जनतेवर फार झाला. शंकराचार्य व टिळक याच्या मतात वस्तुतः एका ' च ' काराचाच भेद आहे. आचार्यांच्या मताप्रमाणें स्थितप्रज्ञाच्या हातून लोकसंग्रह घडेल किंवा न घडेल, त्याचें कर्माचरण हें कर्म नव्हेच, तें ब्रह्मरूप आहे. तर टिळकाच्या मते लोकसग्रह हे कर्मयोगाचें महत्त्वाचे स्वरूप आहे व निष्कामकर्म हें बंधनकारक नसल्यानें त्यास भिण्याचें कारण नाहीं. गीता निवृत्तीच्या तयारीकरिता नसून सासारिक कर्मेंच मोक्ष-दृष्ट्या कशीं करावीं हें सागण्यासाठीं आहे. असो. वाङ्मयदृष्ट्या ' गीता-रहस्य ' हा ग्रथ भाषाप्रभुत्व व प्रतिपादनपद्धति या बाबतींत ' लेखन-कौशल्याचा अपूर्व मासला आहे ' असा विष्णु मोरेश्वर महाजनी यांनीं ' विविधज्ञानविस्तारा 'त त्याच वेळीं आपला अभिप्राय प्रकट केलेला आहे. टिळकाच्या लेखनात एरवीं क्वचित् दिसणारा भावनेचा ओलावा ' गीता-रहस्या 'त ठिकठिकाणीं अनुभवास येतो. टिळकाच्या विद्वत्तापूर्ण लेखनानें ज्याप्रमाणें संसार पंडित व मंडित झाला त्याप्रमाणेंच त्याच्या ग्रंथाने गीतेच्या अभ्यासाला जी एक वेगाची चालना दिली व जिच्या योगाने विद्वानांनीं ' गीतारहस्या 'सारखेच पांडित्यपूर्ण ग्रंथ लिहून व त्यांचीं अनेक भाषेंत

भाषांतरें करून गीतावाङ्मयाची खूप समृद्धि केली तीमुळेंहि संसार खरोखर अधिकच पंडित व मंडित झाला आहे.

गीतारहस्यावर झालेल्या खंडनपर ग्रंथात रामदुर्गचे य. व्यं. कोल्हटकर यांचें ' गीताधर्म अथवा रहस्य–खंडन ' ( १९१६ ), प. गो. चिंचाळकर यांचें ' रहस्य–निरीक्षण ' ( १९१७ ), हरि नारायण नेने यांचे ' गीता-रहस्यसिद्धान्तविवेचन ' ( १९१७ ), सोलापूरचे श्री. वा. रा. कोठारी याचा ' परीक्षणात्मक निबंध ' व विष्णु वामन बापटशास्त्री याचे ' गीता-भाष्य ' व त्यातील रहस्यखंडनात्मक टीपारूप ग्रंथसंभार हे ग्रंथ टिकाऊ व महत्त्वाचे होत. ' गीतारहस्या 'चे समर्थन करणारे विद्यावाचस्पति भिडे-शास्त्री यांनीं ' गीतारहस्य–दीपिका ' लिहिली. स्थलसंकोचास्तव या ग्रंथाचा आम्हांस परामर्श घेता येत नाहीं. तसेंच भिडेशास्त्र्यांनीं ' उपनिषद्रत्न-प्रकाश ' यात उपनिषदाचें मायावाद व संन्यास वर्जून प्रवृत्तिपर व कर्म-योगपर स्वतत्रपणें विवेचन केलें आहे त्याचाहि उगम ' गीतारहस्या 'त आहे.

लोकमान्यांच्या ' गीतारहस्या 'ची सिंहगर्जना १९१५ मध्यें झाल्यावर तिच्याविरुद्ध पांडित्यवीराच्या रणगर्जना व हल्ले-प्रतिहल्ले यांची रणधुमाळी चालू असताना सुमारें वर्षानंतर एका नवीनच पंडितप्रकांडानें आपल्या अभिनव गीताभाष्याचा दुंदुभि ठोकला. हा वेळपावेतों अप्रसिद्ध असलेले हे ग्रंथकार म्हणजे रा. शंकर रामचंद्र राजवाडे हे होत. यानीं गीतेच्या खुंटीला आपल्या पौर्वात्य व पाश्चात्य तत्त्वज्ञानाच्या तुलनात्मक विवरणाचें, नाना तऱ्हेचें, तर्ककर्कश विचारसरणीचें रंगढंग असलेलें चक्री पागोटें अडकवून दिलें. प्रचंड विद्वत्ता, भरपूर, भरीव व साक्षेपानें केलेलें विवरण, निर्भय-पणेंच नव्हे तर एक प्रकारच्या उद्दामपणानें माडलेलें स्वतंत्र सिद्धान्त, यामुळें त्याचा ग्रंथ वाचून ' कोट्येष संप्रति नवः पुरुषावतारः । वीरा न पूज्यतम-भाष्यकृतोऽपि यस्य ' असे उद्गार अनिच्छेनें मुखांतून बाहेर पडतात. यांच्या मतें गीता हें कर्मयोगशास्त्रच म्हणजे नीतिशास्त्र व समाजशास्त्र आहे. देही किंवा आत्मा म्हणजे कर्म, व समाज हें ब्रह्म होय; निर्द्वंद्व तत्त्व व निःस्त्रै-गुण्य हा मोक्ष. या पदार्थांचें त्यांचें विवेचन अगदीं अभिनव आहे. त्याच्या तत्त्वज्ञानांत वैराग्य व भाबडी भक्ति यांस थारा नाहीं. सासारिक कर्मे हौसेनें करावयाचीं. यज्ञ हेंच परम साधन व व्यक्तीचें व समाजाचें आत्यंतिक पण

ऐहिकच कल्याण हेंच साध्य होय. अशा तऱ्हेनें त्याचीं मतें प्रचलित वेदात-मताहून फार निराळीं म्हणून धक्का देणारीं वाटतील. ते वैदिक कर्माचे भोक्ते आहेत व यानंतर त्यांनीं घेतलेलें अग्निहोत्र चालू आहे. त्याना काय बुद्धि झाली, त्यानीं हें गीताभाष्य पुरें न करता तिसऱ्या अध्यायाच्या अकराव्या श्लोकावरच अपुरें ठेविलें. त्यामुळें कित्येक महत्त्वाच्या विषयाच्या त्याच्या विवेचनास आसावलेला वाचकवर्ग मुकला. यानंतर जवळजवळ बारा वर्षांनीं ऋग्वेदातील नासदीयसूक्ताच्या खुंटीला त्यांनीं आपली अग्निहोत्र्याची सखलादी कानटोपी अटकवली. याचा पूर्वार्ध १९२७ सालीं व पुढें बारा वर्षांनीं म्हणजे १९३९ सालीं सूक्तावरील भाष्याच्या उत्तरार्धाचा प्रथम खड प्रसिद्ध केला. या खंडात पौर्वात्य व पाश्चात्य असें बहुतेक शास्त्रीय लैंगिक ज्ञान ‘ कामस्तदग्रे समवर्तताधि ’ या पादातील काम शब्दाच्या विवेचनाच्या निमित्तानें आणलें आहे. गीताभाष्य व नासदीयसूक्तभाष्य ह्या ५००—३०० पृष्ठाच्या जाडजूड ग्रंथात त्यांनीं तत्त्वज्ञान, नीति, राज्यशास्त्र वगैरे अनेक शास्त्राच्या तात्त्विक छाननीची खिचडी करून ठेविली आहे. मराठी भाषेवर त्याचें कमालीचें प्रभुत्व आहे. चेस्टरटनच्या विरोधाभासात्मक वाक्याप्रमाणें विरोधात्मक समतोल वाक्यें लिहिण्यांत त्याचा हातखंडा आहे. त्याच्या ज्ञानाचा विस्तार व खोली पाहून ‘ वयं तु केवलं परवंतो विस्मयेन ’ अशा तऱ्हेनें वाचक आश्चर्यात निमग्न होतो. पण त्याच्या प्रसिद्ध झालेल्या— तीन व कोण जाणें होऊं घातलेल्या एक-दोन भागानीं—वाचकाना ‘ झालें समाधान ’ असे उद्गार काढवतील कीं नाहीं याची शंका वाटते. दुःखाची गोष्ट ही कीं पशुमारणकर्मदारुण अशा श्रोत्रियाप्रमाणें ह्या ऋत्विजाचें हृदय विनयमृदुल मुळींच नाहीं. विनय हा शब्द त्याच्या विद्येंत नाहींच; व स्वभावात व वक्तृत्वांतहि नाहीं. सांप्रदायिक आचार्य ‘ अमुक साधन करा ’ असा निश्चित उपदेश साधकास करतात. परंतु याच्या अफाट विचारसागरांतून कर्तव्याचे कण जमवता जमवता नाकीं नव येतात. व्यक्तीनें व समाजानें काय करावें याचा ‘ निश्चयो ’ ते थोडक्यात सागत नाहींत हे ज्ञानपण्य वणिज् तर नाहींत ना ? असा भास होतो. अजूनहि राजवाड्यांनीं आपल्या विस्तृत ज्ञानाच्या व स्वतंत्र बुद्धीच्या बैठकीवर, वैदिक संस्कृतीच्या अभिमानानें एखाद्या आटोपशीर ग्रंथात आपल्या मतानें सामाजिक घटना

( Social Synthesis ) मांडावी म्हणजे त्याच्या वाचकांस हायसें वाटेल. श्रीमध्वाचार्यांच्या ब्रह्मसूत्रभाष्याचें व त्यावरील श्रीजयतीर्थविरचित टीकेचें मराठी भाषान्तर महाराष्ट्रास सुपरिचित असलेले मध्वमताभिमानी पंडित रंगाचार्य रड्डी यांनीं सन १९२० सालीं प्रसिद्ध केलें. महाराष्ट्र हा बुद्धि-प्रधान असल्यामुळें येथे शंकराचार्यांच्या तर्ककर्कश व उपनिषदांवरच आधारलेल्या अद्वैतमताचीच छाप आहे व सहिष्णु अशा महाराष्ट्रसंताच्या अद्वैतप्रधान भक्तिमार्गाचाच जास्त प्रसार आहे. तथापि, इतर मतांच्या मूल ग्रंथांचीहि माहिती असणे इष्ट आहे. त्यामुळें शांकरमताने ब्रह्मसूत्रभाष्याचीं जशीं तीन भाषांतरें मराठींत आहेत त्याप्रमाणे मध्वभाष्याचेंहि मराठींत भाषांतर अवश्य होतें. माध्वभाष्य हें अल्पविस्तर आहे, म्हणून त्यावरील टीकेचेंहि भाषांतर दिलेले आहे. रामानुज व मध्व या आचार्यांचा भर उपनिषदांपेक्षा पुराणवचनांवर जास्त आहे. शंकराचार्य १३–१४ उपनिषदें व महाभारत व मनुस्मृति याहून अन्य स्मृति व पुराणांकडे बघत नाहींत, त्यामुळे त्यांच्या मताचा प्रसार जास्त आहे. मराठी साधुसंतांच्या भक्तिमार्गात ईश्वराची शक्ति मायारूप लक्ष्मी ही ईश्वराधीन व पादसेवनाची अधिकारिणी आहे. परंतु मध्वमतांत तिला फार महत्त्व दिलें आहे, कारण मायारूपी जगताचें तुच्छत्व खोडून जगताला सत्यत्व द्यावयाचें होतें असें दिसते. असो. पं. रंगाचार्यांनीं केलेल्या भाषांतराने मध्वमताच्या अभ्यासाची मराठींत चांगली सोय झाली आहे. 'श्रीमद्‌भागवतादर्श' अथवा 'श्रीमद्‌भागवताचा उपसंहार' चिपळूणकर मंडळीने महाभारत, रामायण, भागवत व योगवासिष्ठ यांचीं सुरस मराठी भाषांतरें अधिकारी विद्वानांकडून करवून ह्या ग्रंथांचें ज्ञान आबालवृद्धांस सुलभ करून दिलें. तथापि, हे ग्रंथ फार विस्तृत असल्याने त्यांचें सार थोडक्यात केंद्रित करून देण्यासाठीं व आधुनिक चिकित्सक दृष्टीनेहि ते ग्रंथ लोकांच्या नजरेस पाडण्यासाठीं त्या त्या ग्रंथाचे उपसंहार लिहवून घेतले. भागवताचा उपसंहार यशवंत व्यंकटेश कोल्हटकर, बी. ए., एल्‌एल्. बी. या गृहस्थानीं लिहिलेला आहे. हे गृहस्थ रामदुर्ग संस्थानांत कारभारी व सांगली संस्थानांत रेव्हिन्यू ऑफिसर होते. यापूर्वीं ते 'गीताधर्म' अथवा टिळकांच्या गीतारहस्याचें खंडन या पुस्तकाचे लेखक म्हणून महाराष्ट्राच्या परिचयाचे झालेले होते. ते पाश्चात्य वाङ्मय व तत्त्वज्ञान यांचे अभ्यासक, कायदेपंडित व

सांप्रदायिक पद्धतीनें वेदान्त पढलेले होते. त्यानीं ' भागवतादर्श ' हा पांचशेहून अधिक पानांचा ग्रंथ लिहिला आहे. त्यांनीं ग्रंथाचे तीन भाग पाडले आहेत. पहिल्या भागाचीं पंधरा, दुसऱ्याचीं दहा व तिसऱ्याचीं दहा अशीं एकंदर पंचवीस प्रकरणें त्यानीं लिहिलीं आहेत. दुसऱ्या दहा प्रकरणात त्यानीं भागवतातील प्रपंच, परमार्थ व विशेषतः भक्तियोगाचे विचार मोठ्या सरस व सुरस भाषेत तन्मयतेनें मांडिले आहेत. शेवटच्या दहा प्रकरणात त्यानीं आधुनिक चिकित्सक पद्धतीनें पुराणाचें स्वरूप, त्याचा श्रुतीशीं संबध, भागवत व देवीभागवताबद्दल वाद, भागवतकालनिर्णय, रासक्रीडेचें स्वरूप, वगैरे विषय मोठ्या कौशल्यानें विवेचिले आहेत. तथापि, कोल्हटकराच्या ग्रंथाचा खरा गाभा म्हणजे पहिल्या भागांतील स्वतंत्रपणे लिहिलेलीं पधरा प्रकरणें होत. प्रथमतःच त्यानीं आधुनिक स्वतंत्र विचारकाला ( Free-thinker ) सुहृद्भावाने हातीं धरून त्याच्याशीं अगदीं मोकळ्या मनाने पण निर्भीडपणाने वाद करण्याची प्रतिज्ञा करून श्रुतिस्मृतींच्या आधारावर न बोलता, पाश्चात्याचे तत्त्वज्ञान व त्याच्या आधिभौतिक शास्त्रातील आधुनिक शोध याच्या साहाय्यानेच आपल्या वेदान्तातील विचारच कसे गळी पडतात हें मोठ्या मार्मिकपणे दाखविले आहे. जगाचे मूलतत्त्व जड कीं अजड-चैतन्य, प्रपच सुखमय कीं दुःखमय, चिकित्साबुद्धि की श्रद्धा, जन्मात पुरुषार्थ कोणता, प्रवृत्ति कीं निवृत्ति, आत्म्याचे अमरत्व व पुनर्जन्म ह्या प्रश्नाची केवळ प्रखर तर्काने मूलग्राही अशी चर्चा करून वेदान्त-सिद्धान्तच अखेरीस सत्य व सुप्रतिष्ठित आहे हे निर्विवाद सिद्ध केले आहे. शेवटीं जोडलेल्या ' विश्वाध्यास ' या स्वतंत्र प्रकरणात मायावादाचेहि अशाच तऱ्हेनें समर्थन केलें आहे. कोल्हटकर मोठे वादकुशल आहेत. तर्कशास्त्रातील सर्व शस्त्रास्त्रे, डावपेंच, युक्त्याप्रयुक्त्या व कोटिक्रम त्याच्यापाशीं सुसज्ज आहेत. विनोद, कोट्या, उपहास, उपमा, दृष्टान्त वगैरे भाषाशैलीचा मालमसाला त्याच्याजवळ भरपूर आहे. त्याची भाषाशैली जोरदार, ओघवती व शब्दसंपत्तीनें भरलेली अशी आहे. विषय गंभीर व गहन असूनहि त्याचे विवेचन कंटाळवाणें होत नाहीं. त्यांच्या विद्वत्तेप्रमाणे त्याचे व्यवहाराचें निरीक्षणहि व्यापक व सूक्ष्म आहे. व्यवहारातील, प्रकाशातील व अंधारातीलहि गोष्टींचें मर्म ते बिनचूक हेरून उघडे करतात. विकासवादाची तर त्यानीं अशी रेवडी उडविली आहे कीं,

त्या वादाच्या चहात्यास त्यांनीं गयावया करावयास भाग पाडलें. त्यांचें लेखन इतकें बिनतोड झालें आहे कीं, टीकाकार त्यावर प्रहार करण्यास धजले नाहींत. प्रत्यक्ष वामन मल्हार जोश्यांनींहि त्यांचा हा विजय प्राजलपणे मान्य केला होता. इतकें असूनहि प्रतिपाद्य विषयाच्या प्रेमानें व प्रतिस्पर्ध्याच्या द्वेषाने प्रेरित होऊन ते विकारवश झालेले नाहींत. सर्व विवेचन त्यांनीं मनाचा तोल जाऊं न देता प्राजलपणे पण सडेतोडपणानें केले आहे. 'गीतारहस्या'चे खंडन जर त्यांनीं अशाच अभिनिवेशरहित बुद्धीने केलें असतें तर त्याचा परिणाम बराच टिकाऊ झाला असता. त्यांच्या ग्रंथाकडे वाचकाचे जितकें लक्ष वेधावयास पाहिजे तितकें वेधलेले नाहीं. तथापि, त्यांनीं प्रतिपाद्य विषय व रम्य भाषाशैली ह्या दोन्हींहि दृष्टींनी मराठी सारस्वताच्या भांडारात फार मोलाची भर घातली आहे हें नाकारतां येणार नाही. म्हणूनच त्याच्या ग्रंथास विश्वविद्यालयाच्या अभ्यासक्रमात मानाचें स्थान प्राप्त झालें पाहिजे.

कँट व शंकराचार्य—विलिंग्डन कॉलेजचे प्रिन्सिपॉल व तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक गोविंद चिमणाजी भाटे यांनीं श्री. बाबासाहेब इचलकरंजीकर याच्या आश्रयाखाली मार्च सन १९२८ सालीं इचलकरंजी येथे एक तुलनात्मक व्याख्यानमाला गुंफली व तीच सन १९३१ मध्यें वरील नावानें पुस्तकरूपानें प्रसिद्ध केली. रा. भाटे हे तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक असल्यामुळें त्याचा कँटच्या तत्त्वज्ञानाचा खास व्यासंग होताच. स्वतःचे विचार स्वतः-लाच सुस्पष्ट असले म्हणजे ते कसे सुबोध व स्पष्ट रीतीने माडतां येतात याचें हें छोटेसे पुस्तक एक चागला नमुना आहे. उपोद्घात व उपसंहार या दोन भागांत अनुक्रमें कँट व शंकराचार्य याचीं चरित्रें थोडक्यात पण चटकदार रीतीनें दिलीं आहेत. मध्ये प्रतिपाद्य विषयावर पाच व्याख्याने आहेत. पहिल्या व्याख्यानात कँटच्या अगोदरच्या युरोपच्या स्थितीचा इतिहास व तत्त्वज्ञाच्या मतांची परिणति याचें विवेचन असून यातूनच कँटचें तत्त्वज्ञान कसें निष्पन्न झालें आहे त्याचे निरूपण आहे. दुसऱ्या व्याख्यानात कँटची ज्ञान-मीमांसा विवेचून त्यांनीं डेकार्ट, लॉक, बर्क्ले व ह्यूम याच्या मताचें कसें खंडन केलें आहे तें दाखविलें आहे व इंद्रियें हीं दिशा, काल व कार्यकारणसंबंध यांनीं मर्यादित वस्तूंचें ज्ञान करून देत असल्यामुळें आत्मा, अमरत्व, परमेश्वर वगैरेवरील तिहींच्या पलीकडे असलेल्या गोष्टीचे ज्ञान करून देण्यास असमर्थ

आहेत. पण इंद्रियद्वारें बुद्धीला न आकलन होणाऱ्या ह्या गोष्टीचा आपल्या इच्छाशक्तीमुळे आपल्याला प्रत्यय येतो. पण ह्या तीन गोष्टी बुद्धीला अज्ञेय व इच्छाशक्तीला ज्ञेय असा जो विरोध येतो तो भावनेनें अनुभविल्या जाणाऱ्या सौंदर्याच्या अनुभवानें दूर करता येतो, असें त्यानीं प्रतिपादिलें आहे. तिसऱ्या व्याख्यानात त्यानीं आपलें नैतिक व धार्मिक विचार मांडले आहेत. आत्म्याचें स्वातंत्र्य व अमरत्व आणि सद्गुणांच्या सुखात होणाऱ्या पर्यवसानानें त्यानें परमात्म्याची सिद्धि आणि धर्म व नीति याची सार्थकता प्रतिपादिली आहे. चवथ्या व्याख्यानात कँट व शंकराचार्य यांच्या तत्त्वज्ञानाची मोठी उद्बोधक तुलना केली आहे व एक बुद्धिवादी व दुसरे शब्दप्रमाणवादी असले तरी त्याचें मुख्य मुख्य सिद्धान्ताविषयीं कसें ऐक्यमत्य आहे हें निदर्शनास आणले आहे. भौतिकशास्त्रे हा इंद्रियानीं होणाऱ्या ज्ञानाचा विषय आहे व धर्मकल्पना हा श्रद्धेचा विषय आहे. व मनुष्याने दोघांकडे दोन भिन्न दृष्टींनीं पाहावें म्हणजे शास्त्रे व धर्म याचा विरोध संपतो. आचार्योनींहि व्यावहारिक सृष्टि व पारमार्थिक सृष्टि असा भेद पुनः पुनः सागितला आहे. त्यामुळें मनुष्याला पारमार्थिक दृष्टि ठेवूनहि व्यवहारांत वागता येते असें सागितलें आहे. दोघानींहि आपापल्या काळच्या धार्मिक व नैतिक कल्पना आपल्या तत्त्वज्ञानानें व विशुद्ध आचरणानें स्वच्छ केल्या व मोठा लोकोपकार केला. ह्या तुलनेनें दोघाचेंहि तत्त्वज्ञान खुलून दिसते. असो. रा. भाट्याचें पुस्तक १५० पानाचे छोटेसेंच असलें तरी लाकडात लपलेल्या विस्तवाप्रमाणें घटपटांच्या कोरड्या चर्चेच्या आत कशीं तेजस्वी व उपयुक्त विचाररत्नें असतात हें प्रत्ययास येते. प्रोफेसरसाहेबाच्या हातून खरोखर एक तत्त्वज्ञानाचा विस्तृत ग्रंथ मराठींत व्हावयास पाहिजे होता, परंतु तसा योग आला नाहीं. त्यांच्या ह्या छोट्याशा पुस्तकानेहि मराठी भाषेत चागली भर घातली आहे.

इंग्रजी विद्येच्या प्रसारामुळें पाश्चात्य तत्त्वज्ञानाच्या अभ्यासानें व आधिभौतिक शास्त्रांतील शोधानें 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या' या शंकराचार्यांच्या वेदान्त-सिद्धान्ताला जोराचे धक्के बसूं लागले. गीतारहस्यानें निष्क्रिय संन्यासमार्गावर जोराचा हल्ला चढविला. तेव्हां शांकरमतानुयायांनीं जोराची प्रतिक्रिया सुरू केली. रा. कोल्हटकरांच्या लेखनाला हेंहि एक निमित्त कारण होतें. मायावादी वेदान्ताचें समर्थन करणारे तीन मोठे सामर्थ्यवान् व साक्षेपी

लेखक म्हणजे वि. वा. बापटशास्त्री, परशराम गोविंद चिंचाळकर किंवा गोविंदसुत व पनवेलचे सदाशिव कृष्ण फडके हे होत. बापटशास्त्र्यांनी आचार्यभक्त हें ब्रीद घेतलें असून ' सुबोध ' ही लेखनमुद्रा त्यानीं आपल्या ग्रंथाच्या नावास जोडली आहे. सन १९१४ च्या अगोदरच त्याचें वेदान्त-ग्रंथाचें भाषातराचें काम सुरू झालेलें होतें. सन १९२४–२५ त त्यांनीं आचार्यांचें ब्रह्मसूत्र–भाष्याचे भाषातर तीन भागात प्रसिद्ध केलें आहे. म. म. अभ्यंकर व का. वा. लेलेशास्त्री याचीं ब्र. सू. भाष्याचीं भाषातरें सलग असून चांगलीं मार्गदर्शक आहेत. बापटशास्त्र्यानीं भाष्याचे विभाग पाडले असले तरी भाष्यखंडाना टीकाकाराच्या अवतरणिकाचेंहि भाषातर जोडलें असल्यामुळें प्रथमच वाचणाराचा गोंधळ होतो. अभ्यंकरानीं पायटीपा दिल्या आहेत. बापटानीं उपनिषद्भाष्यें व ब्रह्मसूत्र याचेंहि भाषातर केलें आहे व सर्वदर्शनसंग्रहांतील आस्तिक दर्शनाचें सार व मतभेद व नास्तिक दर्शनांचें खंडनासह सार प्रसिद्ध केलें आहे. आपल्या ' गीताभाष्य ' ह्या प्रचंड ग्रंथात त्यानीं आचार्यभाष्याच्या अध्ययनाची उत्कृष्ट सोय केलेली आहे. यांचं लिखाण विपुल आहे व रहस्यपरीक्षणांत ' जशास तसें ' या न्यायानें जरी ते विकारवश झालेले दिसतात तरी एकंदरींत प्रतिपाद्य विषयाकडे लक्ष ठेवून ते वैयक्तिक टीका व उपहास करीत नाहींत. त्याचे भाचे व शिष्य उपनिषत्तीर्थ द. वा. जोग याचा ' अध्यासा'वरचा निबंध ( १९३७ ) चागलाच वाचनीय आहे. गोविंदसुत हे शास्त्री किंवा पदवीधर नसूनहि वेदान्तावर लिहिणारे मोठे अधिकारी होते. त्यांनीं आत्मानुसंधान व परमार्थविचारमाला हे वेदान्तपर ग्रंथ व आध्यात्मिक सुधारणा व आधिभौतिक धारणा असा दुहेरी ग्रंथ लिहिला आहे. तो वाचण्यास मोठा चटकदार आहे. त्याचा भर दासबोधावर विशेष असतो व हरदासी गोष्टी व दृष्टान्त यानीं ते विनोद उत्पन्न करतात. रा. फडके हे बी. ए., एल्एल्. बी. असून त्याचें प्राचीन व अर्वाचीन तत्त्वज्ञानाचें वाचन खूप विस्तृत आहे. त्याच्या ग्रंथापैकीं चार प्रमुख आहेत. ते ( १ ) श्रीजीवन्मुक्तचरित्र व शिकवण, ( २ ) श्रीजीव-न्मुक्त व आधुनिक तत्त्वज्ञ, ( ३ ) मायावाद आणि अजातवाद आणि ( ४ ) मनोबोध आणि नवा मनु. या सर्व ग्रंथांतून शांकरवेदान्त व उपासना

याचें सुबोध, मार्मिक व शास्त्रोक्त विवेचन आहे. पण गोविंदसुत व फडके याच्यात एक मोठा दोष आहे. ज्ञानियाच्या पाठीस लागणारा अहंकार दोघातहि भरपूर आहे. फडक्याचें लिखाण मधुर पण फार लाघवी आहे. तर गोविंदसुतांचें खवचट व रूक्ष आहे. फडक्याच्या लेखनास आधुनिकांच्या अतिरिक्त उपहासउपरोधाची झालर आहे, तर गोविंदसुताच्या लेखनास त्याचें अस्तरच आहे. दोघाच्याहि हें लक्षात येईना कीं, प्रसंगीं उपहास इष्ट व क्षम्य असला तरी त्याच्या विपुलतेनें का स्वतःचें सिद्धान्त प्रतिपक्षाच्या गळीं उतरतात? जेथें दृष्टि व गृहीत कृत्येच भिन्न तेथें बोटें मोडून काय उपयोग? स्वतःचें सिद्धान्ताचें विवेचन जितकें शास्त्रशुद्ध व तर्कतीव्र होईल तितकाच त्याचा उपयोग होईल. कडक टीकेच्या 'आच्छादनार्थे' किंचित् द्रव्यानें' अधिक फलप्राप्ति होणार नाहीं. शांतिब्रह्माचें प्रतिपादन करणाऱ्या वेदान्त्यानीं तरी हें ध्यानीं धरावयास पाहिजे.

**श्रीज्ञानेश्वरदर्शन** हा ह्या कालखंडातील तत्त्वज्ञानाशीं संबंध असलेला एक प्रचड ग्रथ होय. नगर येथील वाङ्मयोपासक मंडळाने हा ग्रथ सन १९३४ सालीं नेवासें येथें मोठ्या समारंभानें प्रसिद्ध केला. या ग्रंथाचे दोन मोठाले भाग आहेत. दोन्ही भागमिळून पृष्ठसंख्या तेराशेंच्या जवळजवळ आहे. ह्या ग्रंथात ज्ञानेश्वर व ज्ञानेश्वरी याच्याशीं संबंध असलेल्या नानाविध विषयावर लिहिलेले नव्या व जुन्या अशा अधिकारी लेखकांचे पाऊणशेंपर्यंत लेख आहेत. या लेखाचें साहित्यखंड, अध्यात्मखंड आणि शास्त्रीयखड असे तीन विभाग केलेले आहेत. आपल्याला यांतील अध्यात्मखंडाशीं कर्तव्य आहे. यांत शास्त्री, पंडित, बोवा, वेदान्ती, पदवीधर, जुने, नवे, अशा पंचवीस लेखकांचे लेख आहेत. म. म. अभ्यंकरशास्त्र्याचे पहिल्या छोट्याशा लेखात ज्ञानेश्वरदर्शन हें वेदान्त सांख्य, न्याय याप्रमाणें स्वतंत्र दर्शन होऊं शकत नाहीं; ज्ञानेश्वर हे पूर्ण अद्वैतीच होते हें सांगितलें आहे. वारकरी सांप्रदायातले प्रा. शंकर वामन दांडेकर यांनींहि ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान अद्वैती असल्याचेंच प्रतिपादन केलें आहे. निसळशास्त्री यांच्या लेखात षड्दर्शनातील निरनिराळे वाद सांगून हे निरानिराळे वाद ज्ञानेश्वरींत कसकसे आले आहेत हें विशद केलें

आहे. तसेंच श्रीशंकराचार्यांचा मायावाद व श्रीज्ञानेश्वरांचा चिद्विलासवाद हे तत्त्वतः एकच आहेत हे निसळशास्त्री व भास्कर सावळाराम नाईक यांनीं प्रतिपादिलें आहे. तसेंच दिवेकरशास्त्र्यानींहि आपल्या लेखात ज्ञानेश्वराचा स्फूर्तिवाद किंवा चिद्विलासवाद हा मायावादाला विरोधी नसून तो उपासनेला उपयुक्त आहे; व राष्ट्रीयदृष्ट्या निष्कामकर्मयोगासहि पोषक असल्याचें प्रतिपादिलें आहे. डॉ. लद्दू यानीं ज्ञानेश्वर ‘ भाष्यकारातें वाट पुसतु ’ या ओवींत आपण शंकराचार्यांचेच मागून जात आहों असे सागतात असें म्हटलें आहे. तथापि, आचार्यांच्या तत्त्वज्ञानास डॉक्टरानीं दोष देऊन भक्तीचा पुरस्कार हेंच ज्ञानेश्वरीचें परमरहस्य म्हणून सागितले आहे. प्रो. न. ग. जोशी यानीं आचार्य, ज्ञानेश्वर व रहस्यकार यांचें मतैक्य दाखविलें आहे. प्रो. विनोद यानीं पाश्चात्य तत्त्वज्ञानाचें ऐतिहासिक समालोचना करून नंतर त्या तत्त्वज्ञानाची पौर्वात्य तत्त्वज्ञानाशीं तुलना करून पाश्चात्य तत्त्वज्ञ अजून बौद्धिक विचारश्रेणीच्या पलीकडे, अनुभवाच्या निर्विचार–विशारद भूमीपर्यंत पोंचले नाहींत हें दाखविले आहे. ज्ञानेश्वर अनुभवाचें ध्येय गांठून बसले आहेत, तर पाश्चात्य तत्त्वज्ञास जिज्ञासेचा तट ओलांडून मुमुक्षेच्या द्वारांतून अनुभवामृताची भूमि अजून गाठावयाची आहे हे सिद्ध केले आहे. प्रो. विनोदांचा लेख ह्या खंडातील लेखाचा मुकुटमणि होय. इतर अधिकारी लेखकांचे लेखहि आपआपल्यापरी चागलेच आहेत. या ग्रंथामुळें ज्ञानेश्वरीच्या अभ्यासकांस भरपूर खाद्य पुरविलें आहे व ज्ञानेश्वरीचें रहस्य उलगडण्याची दाङगी तयारी करून ठेविली आहे. अपेक्षावाद ( १९३४ ) ले.–प्रो. द. गो. मटंगे रॉबर्टसन कॉलेज, जबलपूर यानीं जर्मनीतील प्रसिद्ध ज्यू शास्त्रज्ञ आइन्स्टीन याच्या सापेक्षता सिद्धान्ताचें थोडक्यांत विवरण एका छोट्या पुस्तकांत केलें आहे. त्याचें नांव अपेक्षावाद. आइन्स्टीनचा सिद्धान्त न्यूटनच्या गुरुत्वाकर्षणाच्या सिद्धान्तास मागें टाकणारा आहे; एवढें त्याचें महत्त्व आहे. या सिद्धान्तात गणिताचा खेळ बराच आहे; त्यामुळें तो सामान्य जनाच्या आटोक्यांत सहजासहजीं येणार नाहीं. तथापि, शास्त्रज्ञ व तत्त्वज्ञ यांमध्यें या सिद्धान्तामुळें पुष्कळ वाद माजतील व जगताच्या दृश्य स्वरूपाचें सिद्धान्त बदलतील. रा. मटंगे यांनीं हा वाद भौतिक आहे, आध्यात्मिक नाहीं असें

म्हटलें आहे. तथापि, तत्त्वज्ञानाशीं त्याचा संबंध जगत्प्रक्रियेच्या द्वारें येणारच. म्हणून त्यांच्या छोट्याशा पुस्तकाला महत्त्व आहे.

रा. रा. नरसिंह चिंतामण ऊर्फ तात्यासाहेब केळकर यांनीं १९३४ मध्यें 'भारतीय तत्त्वज्ञान' हा ग्रंथ लिहिला. दोन वर्षांच्या रजेंत मनो-विनोदासाठीं तत्त्वज्ञानाचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्याचा हा ग्रंथ असें त्यांनीं स्वतःच म्हटले आहे. अर्थात् तज्ज्ञ विद्वानाचें स्वैरालापहि शास्त्र म्हणून प्रमाण म्हणण्यास पात्र होतात. तसा प्रकार या ग्रंथाचा नाहीं. नवीन अभ्यासकाला हा ग्रंथ मार्गदर्शक झाला तर अभ्यासकाच्या ज्ञानांत चुकांची भर पडेल. उदा० तात्यासाहेबांनीं उपोद्घाताच्या ३५ व्या पानावर विव-र्ताचा 'अतात्त्विक कारणाचा अन्यथा भाव हेच कार्य' असें म्हटले आहे तें चूक आहे, 'कारणाचा अतात्त्विक अन्यथा भाव' असें पाहिजे. अतात्त्विक हें कारणाचें विशेषण नव्हे, तर अन्यथाभावाचें ( झळ० न्यायकोश पा. ७७७ ). सृष्टीच्या उत्पत्तीचे वाद, ज्ञानप्रक्रियेचे वाद व अज्ञान प्रक्रियेचे वाद यांचें वर्गीकरण न करताच त्याची गल्लत करून दिली आहे. दर्शनाच्या सूत्राचीं त्यानीं दिलेलीं नुसतीं भाषांतरे नवीन अभ्यासकास फारशीं उपयोगीं पडणार नाहींत. तात्यासाहेबाचा हा ग्रंथ म्हणजे हुशार विद्यार्थ्याचा क्वचित् चुका असलेला व अज्ञानानें परीक्षकाच्या मुखावर स्मित उमटविणारा उत्तरांचा कागद असावा तसा आहे. त्यानींच छापविला म्हणून त्याचें कौतुक. आत्मविश्वासाच्या व सूक्ष्मतेच्या अभावीं त्याची योग्यता तितपतच.

श्रीज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान हा एक उत्कृष्ट व चिकित्साप्रधान ग्रंथ डॉ. शं. दा. पेंडसे यानीं सन १९४१ सालीं लिहून नागपूर युनिव्हर्सिटीची पीएच्. डी. ही पदवी मिळविली. ज्ञानेश्वरींत ज्ञानेश्वराचे तत्त्वज्ञान गीतेवर टीका लिहिता लिहिता आलेलें आहे व ज्ञानेश्वरदर्शन ग्रंथाच्या अध्यात्मखंडांत अनेक लेखकाच्या लेखातून तें मुख्यतः लोकबोध्य ( popular ) पद्धतीनें विवेचि-लेलें आहे. शिवाय ज्ञानेश्वराचा स्वतंत्र ग्रंथ जो अनुभवामृत किंवा अमृता-नुभव याचा परामर्ष तीन-चार लेखकानींच घेतला आहे. ही उणीव रा. पेंडसे यांच्या ग्रंथानें दूर केली आहे. सन १९२१-२३ या तीन वर्षांत आळंदीचे श्री. पांडुरंग शर्मा यांनीं 'चित्रमय जगतां'त ११-१२ लेख लिहून

ज्ञानेश्वरानीं 'भाष्यकारांतें वाट पुसतु' या ओवींत रामानुजाचार्यांचा निर्देश केला असून त्याचें तत्त्वज्ञान विशिष्टाद्वैताशीं जुळतें आहे असे प्रतिपादिलें आहे यामुळें प्रचलित समजुतीस धक्का बसला. तेव्हां रा. पेंडसे यास ज्ञानेश्वरांच्या तत्त्वज्ञानाचा तुलनात्मक अभ्यास करण्याची स्फूर्ति झाली व कित्येक वर्षांच्या अभ्यासाचे फळ म्हणून त्यानीं प्रस्तुत ग्रंथ लिहिला. प्रो. पेंडसे याचें 'अद्वैतसिद्धि' ग्रंथापर्यंत वेदान्ताचें वाचन झाले असल्यामुळें वेदान्तावरील भाष्यग्रंथाचें तुलनात्मक विवेचन करणें त्यास सोपे झालें आहे. ज्ञानेश्वरीच्या राजवाडे प्रतीवरून त्यानीं आपलें विवेचन केले आहे. या प्रबंधातील 'भाष्यकारांतें वाट पुसतु' हें चौथें प्रकरण मुख्य होय. ज्ञानेश्वरानीं शंकराचार्यांचा अजातवाद व मायावाद स्वीकारला आहे. गीतेच्या श्लोकाचे त्यानीं ठिकठिकाणीं अद्वैतपर अर्थ केले आहेत. कित्येक पारिभाषिक शब्दाचे मार्मिक स्वतंत्र अर्थ केले आहेत. तसेंच रामानुजाचे अर्थ त्यांनीं स्वीकारले नाहींत. एकंदरींत ज्ञानेश्वराचे शंकराचार्यांशीं साम्य व रामानुजांशीं वैषम्य आहे. तेव्हा ज्ञानेश्वराना अभिप्रेत असलेले भाष्यकार शंकराचार्यच होत, राजानुज नव्हेत हे रा. पेंडसे यानीं चिकित्सापूर्वक सिद्ध केलें आहे. चवथ्या व पाचव्या प्रकरणात अनुक्रमाने ज्ञानेश्वरींतील अध्यात्म व मोक्षाचीं साधने, विशेषतः भक्ति व हठयोग यांचें विवेचन आहे. सहाव्या खंडात अमृतानुभवाचें विवेचन आहे. त्यांत निर्विशेष परमात्मा, माया, शिवशक्तींचें सापेक्षत्व, जीवशिवाचें ऐक्य, अज्ञानखडन व अखेरीस सिद्धावस्थेतील अद्वैतभक्ति याचें विवेचन केले आहे. सातव्या प्रकरणात ज्ञानेश्वराचें अज्ञानखंडन व रामानुजाचें अज्ञानखंडन यांत कशी भिन्नता आहे हें दाखविलें आहे. शंकराचार्यांच्या अज्ञानसिद्धींत ज्या सात अनुपपत्ति रामानुजानीं दाखविल्या आहेत त्याशीं ज्ञानेश्वराच्या विवेचनाचें कसें साम्य नाहीं, व अमृतानुभव रामानुजाचार्यांच्या खडनासाठींच कसा लिहिला आहे हें दाखविलें आहे. योगवासिष्ठाचा अमृतानुभवावर परिणाम, पाचरात्रांच्या राधाकृष्णभक्तीच्या निर्देशाचा अभाव, नाथसंप्रदायाचा परिणाम, चांगदेवपासष्टींतील विषय यांचीं विवेचनें निरनिराळ्या प्रकरणात केलीं आहेत. गौडपाद व शंकराचार्य यांच्याच मतांची छाप ज्ञानेश्वरावर असून इतर आचार्यांच्या मतांशीं त्याचें साम्य नाहीं हें सिद्ध केलें आहे. तात्पर्य, प्रो. पेंडसे

यांचा हा ग्रथ हा ज्ञानेश्वरांच्या तत्त्वज्ञानाविषयीं चिकित्सक व कणखर बुद्धीच्या अभ्यासकास चांगलाच मार्गदर्शक आहे. ह. भ. प. रा. पांगारकर व प्रा. रा. द. रानडे यानीं या ग्रंथाची मोकळेपणानें शिफारस केली आहे. अशा प्रकारें स्वतंत्र बुद्धीनें तात्त्विक अभ्यास करून प्रो. पेडसे यांनीं मराठी तत्त्वज्ञानवाङ्मयात आपल्या ग्रंथाने महत्त्वाची भर टाकिली आहे.

ईश्वरवाद व जडवाद अर्थात् अनीश्वरवाद—रा. य. गो. जोशी यानीं प्रकाशित केलेल्या वादविवेचन मालेंतील दहावें व अकरावें हीं पुष्पें म्हणजे वरील दोन ग्रंथ होत, आणि त्याचे लेखक अनुक्रमें प्रा. शंकर वामन अथवा सोनोपंत दाडेकर व तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी हे होत. रा. दाडेकर हे प्रथम पाश्चात्य तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक व नतर संस्कृत वेदान्त वाचलेले असून, आस्तिक श्रद्धाळू, आजन्म ब्रह्मचारी व महाराष्ट्र सताच्या भागवत संप्रदायातील वारकरी पंथाचे अनुयायी आहेत. तर तर्कतीर्थ जोशी हे प्रथम जुन्या पद्धतीप्रमाणें न्यायशास्त्र पढलेले, नंतर इतर दर्शनें, वेद व धर्मशास्त्र याचे अध्ययन केलेले असून नतर त्यांनीं पाश्चात्य तत्त्वज्ञान इंग्रजी भाषेंतून हेगेलसारख्या कपाळ उठविणाऱ्या तत्त्वज्ञाच्या ग्रथासुद्धा अभ्यासिलें आहे. राजकारण, समाजशास्त्र व लेनिन आणि मार्क्स यांचें समाजसत्तावादाचें वाङ्मय याचे ते अभ्यासक असून मानवेंद्र रॉयचे चहाते आहेत. ते निरीश्वरवादी झालेले आहेत. ह्या दोन्ही छोट्याशा ग्रंथाचा आता परामर्श घेऊं. ईश्वराच्या कल्पना ह्या अनंताची कल्पना, भीति, स्वप्नानुभव, वाडवडिलाच्या भुताची कल्पना, ईडिपसगड, इत्यादिकातून निघाल्या हें दाडेकरानीं दाखविलें आहे. तसेंच अनेक देवातून एक देव, क्रूर देवातून दयाळू देव निघाला व अलीकडे एक देवाची कल्पना मानणारेच जास्त होऊ लागले आहेत. यापलीकडेहि शंकराचार्यांचे अद्वैतात सगुण ईश्वराची कल्पना निर्गुण ब्रह्मात लय पावते. ईश्वर आहे असें पटल्यावर त्याचें स्वरूप, त्याचा जगाशीं, जीवाशीं व मनुष्याचीं नातीं व सुखदुःखें याच्याशीं कशा प्रकारचा संबध आहे, याचें विवेचन येतें. ईश्वराचे अस्तित्वाचे कांहीं पुरावे वर कॅट व शंकराचार्य या छेदकाच्या साराशात आलेच आहेत. तेव्हा आता जडवादाचा थोडक्यात परामर्श घेऊं. जडवादांत चैतन्य जडातून उत्पन्न होतें असें प्रतिपादतात. तर्कतीर्थ जोशानीं प्रथम प्रमितिशास्त्र किंवा ज्ञानमीमांसेचे

'Epistimology' सिद्धान्त विवरिले आहेत. जड जगाला ज्ञात्याखेरीज स्वतंत्र अस्तित्व आहे. तो आभास नव्हे, तें मिथ्या नव्हे. संपूर्ण सत्य किंवा ब्रह्म ही कल्पना आहे. ते मनुष्यास ज्ञात होणे शक्य नाहीं. तें मुदलीं नाहींच. पदार्थांच्या स्वभावाने जगाची सिद्धि होते. ईश्वराची जरूर नाहीं व तो सिद्ध होत नाहीं. ईश्वरसिद्धीचे आठ पुरावे व त्याचें निराकरण थोडक्यांत असें : ( १ ) जगांत योजना आहे ती ईश्वरकृत आहे. उत्तर—जगाच्या स्वभावांतच योजना आहे. ( २ ) जगाला प्रेरक हवा, तो ईश्वर. उत्तर—जगाची गति स्वयंप्रेरित आहे. पहिला प्रेरक तो ईश्वर ही कालमर्यादा चुकीची आहे. कारण जगाच्या गतीची परंपरा अनादि आहे. ( येथें जडवाद वेदान्त्यांच्या अनादित्वाशीं भिडला ! ) ( ३ ) जग हे काहीं तरी उद्देशानें केलेलें आहे. उत्तर—आप्तकाम ईश्वराला उद्देश असेल तर तो निरीश्वर ठरतो. ( ४ ) जगताचा ज्ञाता तोच ईश्वर. उत्तर—वस्तु ज्ञात्याशिवाय असू शकते. ( ५ ) जगातील सुंदर व मंगल याचा जनक ईश्वर. उत्तर—जग असुंदर व अमंगलहि आहे. मग ईश्वराबरोबर सैतानहि सिद्ध होतो. ( ६ ) न्यायनीतीचे नियम ठरविणारा व त्याचीं फळे देणारा ईश्वर होय. उत्तर—नीति ही मानवाच्या व्यवहारातून सिद्ध होते. स्थळकाळाप्रमाणें ती बदलते म्हणून ईश्वरकृत नव्हे. ( ७ ) मनुष्यजातीचा धार्मिक अनुभव हा अलौकिक अनुभव रानटी व सुधारलेल्या सर्व समाजात येतो. उत्तर—हा अनुभव प्रत्यक्ष ज्ञानाचा असता तर तो सर्वांनीं प्रमाण मानला असता. ( ८ ) दिव्य दृष्टि पुरुषाचा साक्षात्कार. उत्तर—भिन्न भिन्न धर्मातील साधूंचा साक्षात्कार भिन्न स्वरूपाचा असतो. अलीकडील कित्येक विज्ञानी ( Scientist ) ईश्वर मानण्याकडे झुकलेले आहेत खरे; पण तो त्याच्या मनावर लहानपणीं झालेल्या संस्काराचा परिणाम होय. हल्लींचा जडवाद नीतिदृष्ट्या चार्वाकाच्या अनीतिमय जडवादासारखा नाहीं. जडवाद्यामध्यें उच्च स्वार्थत्यागी, संयमी, समाजहितदक्ष असेहि लोक पुष्कळ आहेत. असो. रा. दाडेकरांनीं दिलेले साक्षात्कारवाद्यांचे अनुभव व अखेरीस पंचवीस एक थोर विद्वान् व अर्वाचीन पुरुषांचीं मतें हीं अस्तिक्याचीं पोषक आहेत. ईश्वरवाद व निरीश्वरवाद हे दोन्हीहि केवळ तर्कानें सिद्ध होत नाहींत. दोन्हींचें मूळ दोन भिन्न प्रकारच्या श्रद्धा होत. रा. दाडेकरांनीं भोळ्या लोकांचा पाच प्रकारचा देव वर्णिला आहे :

(१) नवसास पावणारा, (२) प्रयत्नावाचून मदत करणारा, (३) धर्म, अधर्म याकडे कानाडोळा करणारा, ( ४ ) वकिलाच्या मध्यस्थाच्या द्वारें पावणारा, व ( ५ ) कामिक भक्तीप्रमाणें बदलणारा. या पाचांच्या तडाक्यातून जर सासारिक जन सुटतील तर धर्मामुळें जनतेचें खरोखरच कल्याण होईल. असो. हे दोन्ही पंथ लेखकानीं लिहून ईश्वराविषयीं सुबोध मार्गदर्शन केलें आहे.

रा. श्री. म. माटे यानीं आपण सपादिलेल्या विज्ञानबोधाच्या प्रस्तावनेंत ( सन १९३४ ) बृहन्महाराष्ट्रांतील शिक्षितानीं आधिभौतिकाचा अभ्यास जोरानें करावयास हवा, हें मत प्रतिपादिलें आहे. त्यासाठी ' घरचे वारेंच बदलावयास पाहिजे. ' करितां त्यानीं जगाचें क्षणभंगुरत्व, जडाचा तिटकारा षड्रिपूंचे शत्रुत्व, ब्रह्म, माया, साक्षात्कार वगैरे रूढ वेदान्ताच्या कल्पनांचें तार्किकदृष्ट्या, पण उद्धटपणानें नव्हे, कसून परीक्षण केलें आहे. साक्षात्कारानें जर जगाचें कोडे उलगडलें तर आधिभौतिक शास्त्रांतील गूढाचीं सासारिकास पाहिजे असलेलीं उत्तरें साक्षात्कारवाद्यानीं का देऊं नयेत, अशी त्याची पृच्छा आहे. ब्रह्मवेत्त्याचे अनुभव एकमेकांशीं का जुळत नाहींत ? माट्याची ही टीका सर्वच वाचण्यासारखी आहे व केवळ ती हंसण्यावारी नेण्यानें तिच्यातून सुटका होणार नाहीं. असो. त्यांच्या टीकेच्या ह्या रोखावरून जनतेवरून तत्त्वज्ञानाचा वारा कसा वहात आहे हे समजून येईल. आधिभौतिक रहस्याचा उपयोग दीनदुबळ्याचा व मातबराचाहि संसार नेटका करवून मगच परमार्थाचा विचार पहावा ही आधुनिकाची अपेक्षा आहे. ' मार्गाधारें वर्तावें । विश्व हें मोहरें लावावें । अलौकिक नोहावें । जगाप्रति ॥ ' ( ज्ञा. गी. अ. ३–२५ ) हा ज्ञानेश्वराचा ज्ञान्यासंबंधाचा अभिप्राय, संन्यास–वैराग्य याचा अनधिकारी जनतेस उपदेश करणारांनीं लक्षात घ्यावयास पाहिजे. उपनिषद्भाष्याच्या आरंभीं शंकराचार्य ' परिसमाप्तं कर्मकाण्डम् ' असा शेरा मारतात. त्याचा अर्थच असा कीं, वर्ण व आश्रमाचीं कर्तव्यें योग्यपणें आचरून साधनचतुष्टयांतील शेवटची जी मुमुक्षा ती उत्पन्न होण्यापूर्वीं माया-ब्रह्माची चर्चा शिकण्याचा व शिकविण्याचाहि अधिकार नाहीं. आमच्या कथाकीर्तनातून, प्रवचनातून, व्याख्यानांतून, स्मृतिग्रंथांतील आचारविचाराचा व व्यवहारनीतीचा उपदेश मुख्यत्वें झाला पाहिजे. त्यांत उपासनेचाहि अंतर्भाव आहे. ती अंगीं बाणल्यावर माया-

ब्रह्माच्या गोष्टी. हें तत्त्वज्ञानाच्या रोजच्या व्यवहारातील पर्यवसानाबद्दल झालें. मराठींत ग्रंथ करण्यासंबंधानें बोलावयाचे म्हटलें तर दिवसेंदिवस रामभाऊ रानड्यांच्या (A Constructive Survey of the Upanishats) व "Mysticism in Maharashtra" यासारखें ग्रंथ नवीन विद्वानांनीं लिहिले पाहिजेत. सांप्रदायिक ग्रथाचीं भाषातरें, विवरणें झालीं आहेत व होत राहिलीं पाहिजेतच. तसेंच पाश्चात्य तत्त्वज्ञानावर स्वतंत्रपणे व तुलनात्मक असे ग्रंथ नवीन विद्वानानीं लिहिले पाहिजेत. तसेंच स्वतःचें वैयक्तिक तत्त्वज्ञान विकसित झालें असल्यास त्यावर स्वतःची संघटित रचना व्हावी. पण या सर्वांच्या मुळाशीं विश्वविद्यालयात तत्त्वज्ञान देशभाषातून शिकविण्याचा आरंभ व्हावयास पाहिजे. तसेंच आमचे तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक सव्यसाची असले पाहिजेत. म्हणजे त्यानीं संस्कृत तत्त्वज्ञान मूळ संस्कृतांतून वाचले पाहिजे. हे वाटतें तितके अशक्य नाहीं. तथापि हे सर्व जोंपर्यंत शिक्षणाची दिशा आपल्या हातीं नाहीं तोंपर्यंत स्वप्नसृष्टींतच राहणार.

या खंडात कित्येक आधींच्या ग्रंथांच्या सुधारलेल्या आवृत्ति प्रसिद्ध झाल्या आहेत. त्यात कै. सीतारामपंत फडके (प्रा. ना. सी. फडक्याचे वडील) याचा 'वेदान्तनिदर्शन' ग्रथ हा एक वेदान्तावरचा सुबोध सरळ असा प्रवेशग्रंथ आहे. माधव गोविंद भिडे याचे मननामोदाचे दोन करंडक व रा. महादेव हरि मोडक याचे 'खडे तात्त्विक बोल' याचे तीन भाग हे वेदान्ताचे मधुबिंदूच होत. सांप्रदायिकापैकीं वऱ्हाडातील श्री. गुलाबराव-महाराज यांची ग्रंथसंपत्ति विपुल असून त्याची विद्वत्ता व आत्मानुभव प्रशंसनीय आहेत. हे जन्मांध असून त्याचें मत 'मधुराद्वैत' होय. ते स्वतःस राधा समजून श्रीकृष्णाची पतिरूपानें भक्ति करतात. साकुर्डीचे उपासनीमहाराज याच्या मुखातून उतरलेली 'साईवाक्सुधा' चार भागात प्रसिद्ध आहे. ॐकारेश्वरचे भगवान् मायानंद चैतन्य यानीं 'औपधर्म व दिव्यदृष्टि' या नावानें उपनिषदें व भगवद्गीता यातील तत्त्वज्ञान प्रकट केलें आहे. हेहि मायावाद व वैराग्य यांचे विरोधी आहेत. आपण स्वतः ईश्वरावतार आहों अशा भाषेत हे बोलतात. यांचें विवेचन प्रवृत्तीसच पोषक आहे. श्रीशंकरानंद भारतीस्वामी (पूर्वाश्रमींचे म. म. पाठकशास्त्री) यांचें 'वेदान्तपरिचय' व पडित शि. वि. शिंत्रे यांचें 'ऐक्यामृत' हीं दोन्ही नूतन

पुस्तकें वेदान्ताच्या प्राथमिक अभ्यासाला फारच उपकारक आहेत. असो. हा निबंध लिहिण्याचें काम आमच्याकडे बरेच उशिरा आलें. किंबहुना आम्हींच आगंतुकी लाविली. तसेंच मर्यादाहि थोडी; त्यामुळें समालोचनात कित्येक ग्रंथ वगळले गेले. तरी आम्ही सामान्य दिशा आखून निवड केली. तेव्हा यथामति, यथाशक्ति केलेली ही अल्पस्वल्प सेवा वाचकांनीं गोड करून घ्यावी हीच विनंति.

• • •

: ८ :

# सामाजिक आणि धार्मिक वाङ्मय

पं. रघुनाथशास्त्री कोकजे

हिंदुसमाज सामाजिक आणि धार्मिक प्रश्नांचा विचार वेगवेगळा करूं शकत नाहीं. कारण हिंदूंचें धर्मशास्त्र व्यापक आहे. सकाळीं उठल्यावर तोंड धुण्याच्या वेळीं कोणते काष्ठ वापरावे येथपासून, शत्रूचा प्रदेश जिंकल्यावर तेथील लोकास कसें वागवावे येथपर्यंतचे सर्व प्रश्न हिंदूंच्या धर्मशास्त्रात सोडविलेले दिसून येतात. ज्यास हिंदूंच्या धर्माचें हे व्यापक स्वरूप माहीत नसतें तेच सामाजिक प्रश्न धार्मिक प्रश्नाहून वेगळे काढून त्याचा पृथक् विचार करूं पाहतात. ' अस्पृश्योद्धार, विधवाविवाह या प्रश्नाकडे मी सामाजिक दृष्टीनें पाहतो. ' असें प्रतिपादणारे हिंदुसमाजाची, हिंदुधर्माची आणि हिंदु संस्कृतीची या विषयाकडे पाहण्याची मनोभूमिका नीट ध्यानांत घेत नाहींत, असेंच म्हटलें पाहिजे. पुढाऱ्यांनीं जरी वरीलसारख्या प्रश्नांकडे धार्मिक दृष्टीनें न पाहिलें तरी ज्या जनतेंत त्यांस आपल्या मताचा प्रसार करावयाचा असतो ती मात्र धार्मिक प्रश्न वेगळे आणि सामाजिक प्रश्न वेगळे असें मानीत नसल्यामुळें तिच्यावर असल्या एकांगी विचारसरणीचा परिणाम होत नाहीं हें उघड आहे. यासाठीं सामाजिक वाङ्मयाचा विचार करताना या निबंधात त्याबरोबरच धार्मिक वाङ्मयाचाहि विचार केला आहे.

## विचारवंतांचे तीन वर्ग

हिंदुसमाज विशिष्ट चालीरीतींनीं आणि विचारसरणींनीं स्थिर होऊन कित्येक सहस्रकें लोटलीं आहेत. अशा वेळीं कितीहि प्रतिकूल वादळें

उठलीं तरी जुनीं घरें सोडून नव्या प्रासादाचा आश्रय करावा असें रूढिप्रिय सर्वसामान्य जनतेच्या मनात सहसा येऊ शकत नाहीं. सर्वसामान्य जनतेच्या या मनोवृत्तीस शास्त्रीय अधिष्ठानाचे पाठबळ देऊन त्यांच्या रूढिप्रियतेस आवाहन करणारा एक लेखकवर्ग महाराष्ट्रात आहे. 'जुनें मोडूं नये आणि नवें करूं नये' हेंच त्याचें ब्रीदवाक्य. 'विवेकयुक्त सुधारणा' हेंच ध्येय मानून त्याप्रमाणें विवेक-जागृतीवर भर देणारा दुसराहि एक लेखकवर्ग महाराष्ट्रात आहे. चिकित्सेच्या झंझावातापुढें न टिकणारे दुर्बळ भाग पाडून टाकावे आणि त्यांच्या जागीं विवेकाधिष्ठित आचार-विचाराच्या तुळयाखांबाची उभारणी करून आपलें समाजमंदिर सुधारावें असें त्यास वाटते. तिसरा वर्ग आमूलाग्र परिवर्तनवाद्याचा. नव्या यंत्रयुगा-पुढे जुन्या समाजव्यवस्थेचा तरणोपाय नाहीं हें जाणून 'नवी विटी नवें राज्य' या न्यायाने आपली समाजव्यवस्था समूळ बदलली पाहिजे असे त्यास वाटतें. महाराष्ट्रीय सुशिक्षितवर्गात या तिन्ही मतप्रणालींचे विद्वान् असल्यामुळें मराठींतील सामाजिक किंवा धार्मिक वाङ्मयाचे या दृष्टीने सामान्यतः तीन वर्ग करता येतील.

## रूढिसमर्थक वाङ्मय

यापैकीं पहिल्या वर्गांतील विद्वानाचे अधिकृत वाङ्मय मराठींत मुळींच नाहीं म्हटले तरी चालेल. 'आमच्या आर्य ऋषींनीं वैदिक सिद्धान्ताच्या पायावर आमच्या समाजाची रचना केलेली असून कितीहि अडचणी आल्या तरी त्यात हात घालून तिची उलथापालथ करण्याचा कोणत्याहि मानवास अधिकार नाहीं.' असा त्याचा प्रमुख सिद्धान्त आहे. कुमारिलभट्ट, शंकराचार्य इत्यादिकांनीं संस्कृत ग्रंथात या सिद्धान्ताची प्रस्थापना केलेली आहे असें या पंथाचे प्रवर्तक सागत असतात. परंतु त्या मताचें सोपपत्तिक प्रतिपादन करणारा एकहि ग्रंथ त्या विद्वानानीं मराठींत लिहिलेला नाहीं. याप्रमाणे अधिकृत ग्रंथ नसला तरी त्या मताचा आभास उत्पन्न करणारे ग्रंथ मात्र मराठींत झालेले आहेत. पनवेल येथील श्री. स. कृ. फडके याची नवयुगधर्ममाला यापैकींच होय. या लेखकाचें लिखाण वरवर पहाणारास सनातनी धाटाचें दिसतें. परंतु वस्तुस्थिति तशी नाहीं. आपल्या दुःस्थितीचीं

दारिद्य आणि पारतंत्र्य हींच दोन कारणें आहेत असें सांगून तीं दूर करण्यासाठीं ( १ ) वर्णाश्रमधर्माची शुद्ध संघटना आणि ( २ ) तद्द्वारा ईश्वरोपासना हे दोन उपाय अवलंबावे ( नवयुगधर्म प्रथम खंड पृ. ८७१ ), असे या ग्रंथकारानें उपदेशिले आहे. परंतु ते स्वकपोलकल्पित आहे. सनातनधर्म असें सांगत नाहीं. स्वकीय राज्यस्थापना असल्यावाचून वर्णाश्रमधर्म पाळणें अशक्य आहे. ग्रंथकारास प्राचीन धर्मशास्त्रज्ञानीं संमत केलेला दृष्टादृष्टकारणविवेक अवगत नसल्यामुळें त्यानें ऐहिक उत्कर्षासाठीं देखील ईश्वरोपासनेचा तोडगा सुचविला आहे. ' हिंदूंचें समाजरचनाशास्त्र ' ( गो. म. जोशी ) या ग्रंथानें हाच प्रमाद केलेला आहे. नव्या भौतिक किंवा जीवशास्त्राच्या सिद्धान्ताचा आधार दाखवून प्राचीन रूढीचे समर्थन होतें असें त्यात दाखविण्याचा प्रयत्न केलेला आहे, परतु मन्वादिकास हीं आधुनिक शास्त्रे अवगत नव्हतीं हें स्पष्ट असल्यामुळें नव्या उपपत्तीच्या वडाची साल जुन्या रूढीच्या पिपळास चिकटविण्याचा त्याचा प्रयत्न अयशस्वी झाला आहे. शिवाय ज्या प्रकाराने त्यानी प्रस्तुत विषय हाताळला आहे त्याप्रकारें ग्रंथकर्त्यांचे प्रमेय सिद्ध मानले तरी ते आधुनिक प्रमाणाच्या आश्रयानेंच होत असल्यामुळे समाजव्यवस्था अतींद्रिय किंवा पुरुषबुद्धीस अगम्य मानणाऱ्या सनातनी विद्वानानी त्याबद्दल हर्ष व्यक्त करणे अप्रस्तुत होय. याच संप्रदायातील गाजलेले तिसरे लेखक ' अप्रबुद्ध ' होत. वैदिक संस्कृतीची पुनर्घटना ', ' ऋग्वेदाचा संदेश ', ' वेदाचें अपौरुषेयत्व ', ' ऐक्याचे खरे शत्रु ', इत्यादि लहान-मोठे ग्रंथ त्यानीं लिहिले आहेत. याचा मुख्य भर मंत्रसामर्थ्यावर ! वैदिक मंत्रांत गूढ शक्ति असून योग्य प्रकारे तिचें संवर्धन केल्यास अलौकिक सामर्थ्य प्राप्त होईल आणि त्या सामर्थ्याच्या बळावर प्रचलित सामाजिक, धार्मिक प्रश्नाची सोडवणूक करता येऊन हिंदुसमाज उन्नत होईल, असा या लेखकाचा आशावाद आहे. या लेखकानें चिकित्सेचा आव जागोजागीं आणला आहे. पण कसोटीची वेळ येताच ' प्रत्यक्ष अनुभव देतों असें म्हणणारीं जीं प्रयोगशास्त्रें आहेत त्यांचा स्वतः प्रयोग करून पाहणें ' ( वेदांचें पौरुषेयत्व पृ. ६ ) असा हवाला देऊन स्वतः नामानिराळें होण्याचा प्रयत्न केला आहे. आणि आश्चर्य हें कीं, बुद्धिवादानें वेदांचें अपौरुषेयत्व सिद्ध करणाऱ्या कुमारिलादिकांस ( साशंक असलेल्याचें)

'समाधान केवळ ग्रंथानें अथवा युक्तीनें होणें केव्हांहि शक्य नाहीं' असें म्हणून वाटाण्याचा अक्षता लावण्याचा प्रयत्न केला आहे. सनातनी प्रथेशीं अगदीं विसंगत अशा पद्धतीनें प्रतिपादन करणारे हे तिन्ही लेखक सनातन्यांत कसे खपतात याचें कित्येकास आश्चर्य वाटेल. पण स्वतःची अंध शब्दप्रामाण्याची भूमिका जनतेच्या गळीं उतरविता येणें शक्य नसल्यामुळें 'बुडत्यास काडीचा आधार' या न्यायाने असल्या अर्धवट सनातन्यांचा आश्रय घेण्यावाचून सनातनी पक्षास गत्यंतर राहिलेलें नाहीं असे दिसतें.

## चिकित्साप्रधान वाङ्मय

गेल्या तीस वर्षांत वर दाखविलेल्यापैकीं दुसऱ्या वर्गातील विद्वानांनीं निर्मिलेल्या वाङ्मयाकडे दृष्टिक्षेप केल्यास त्याचें वैपुल्य चटकन् डोळ्यात भरते. आधुनिक शास्त्राच्या आधारें प्राचीन रूढीचें समर्थन करण्याचा जो डाव श्री. गो. म. जोशी यांनीं माडला होता तो उधळून लावण्याचा यशस्वी प्रयत्न 'विज्ञानप्रणीत समाजरचना' (पु. ग. सहस्रबुद्धे) या पुस्तकांत केला आहे. गो. म. जोशी यांच्या अवाढव्य विद्वत्तेचा दंभस्फोट त्याच्याच आवडत्या पुस्तकाचें आधार देऊन आणि त्याच्या लाडक्या 'गणितागत पद्धतीसच अवलंबन करून या पुस्तकांत केलेला आहे. 'वादळी वारे' (द. के. केळकर) या पुस्तकातील विचार पुरोगामी असून नव्या-परिस्थितीस अनुसरून नवी विचारसरणी अवलंबणे किती गरजेचें आहे याची त्यावरून चागलीच कल्पना येते. श्री. केळकर यांचें 'संस्कृति-संगम' हें पुस्तक चांगलेच गाजलें. अनेक आघात-प्रत्याघातातील टाकीचे घाव सहन करूनच आजची भारतीय संस्कृति घडविली गेली हें त्यांत चांगल्या प्रकारें दाखविलें आहे. मात्र भारताच्या एका कोपऱ्यातील एखाद्या राज-वंशाचे भेसूर चित्रण करून त्याच्या आधाराने भारतीय सर्वसामान्य जनतेच्या अंतःकरणाचा ठाव घेण्याची त्याची पद्धत तर्कदुष्टच म्हणावी लागेल. बुद्धानें यौवराज्याचा, अशोकानें साम्राज्याचा आणि हर्षवर्धनाने दर पांच वर्षांनीं आपली सांठविलेली सर्व संपत्ति कुंभमेळ्याच्या प्रसगानें दानरूपानें त्याग करून टाकण्याचा जो उपक्रम केला त्यास जगाच्या इतिहासात तोड मिळणार नाहीं. या महनीय त्यागाचें उदाहरण सतत पाहणारी जनता त्यागमय

जीवनास आदरणीय म्हणून मान देऊं लागणें स्वाभाविक होतें. हा एक दोष सोडून दिल्यास ग्रंथकर्त्याचें विवेचन मान्य होण्यासारखेंच आहे.

## समाजशास्त्रीय दृष्टिकोनांतील वाङ्मय

हिंदुसमाजाकडे आधुनिक समाजशास्त्राच्या दृष्टिकोनांतून पाहून त्या दृष्टीनें आपले विचार माडण्याचा मान श्री. ना. गो. चापेकर यांच्या वाङ्मयानें मिळविला आहे असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. त्यांचे 'निवडक लेख' आणि विशेषतः 'वैदिक निबंध' समाजशास्त्रीय पण पुरोगामी विचारानें ओतप्रोत भरलेले आहेत. 'परशुराम–चरित्र व पंचमानव हिंदुसमाज' हे प्रा. श्री. म. माटे यांचें पुस्तक आजच्या हिंदुसमाजाचा बनाव निरनिराळ्या पाच जमातींपासून कसा झाला हें मोठ्या कुशलतेनें दाखवीत आहे. या पुस्तकात पौराणिक संकेत, हिंदु सणाचे सामाजिक स्वरूप इत्यादि विषयाचें मोठें उद्बोधक विवचन केलें आहे. हिन्याला योग्य कोंदण नसल्यामुळें त्याची उपेक्षा होते, तसें या ग्रंथाच्या बोजड नामकरणामुळें झाले आहे असें वाटतें. दुसऱ्या विद्वानाचे विचार आस्थेनें न वाचण्याच्या सर्वप्रसिद्ध विद्वत्स्वभावामुळेंहि हे पुस्तक उपेक्षिलें गेलें असेल. कै. डॉ. श्री. व्य. केतकर याचा 'भारतीय समाजशास्त्र' हा ग्रंथ मौलिक होय. या ग्रंथात लेखकाने ब्राह्मणी समाजपद्धतीचें समाजशास्त्रदृष्टीनें समीक्षण करून त्यातील गुणदोषाचें आविष्करण चागल्या पद्धतीनें केलें आहे. हिंदुसमाजाच्या सर्व दोषाचे खापर विशिष्ट वर्गाच्या डोक्यावर फोडून धन्यता मानणाऱ्यास या ग्रंथाच्या वाचनाने चागलाच धक्का दिला आहे. 'सामाजिक सुधारणा ही इंग्रजाशीं तादृश्य स्थापन करण्यासाठीं नोकरी पेशातील लोकानीं सुरू केलेली चळवळ होती' (पृ. ५८). 'भारतीय समाजसुधारणेच्या सर्व कल्पना इंग्रजाच्या प्रयत्नाचे परिणाम आहेत. ती स्वतंत्र विचारपद्धति कधींच नव्हती.' (पृ. ६१). 'ज्ञातिविशिष्ट भावना तटे वाढविणारी नाहीं' (पृ. २०८). इत्यादि या ग्रंथातील मतें अद्याप सुधारकांच्या पचनीं पडलेलीं नाहींत, हें अनेक लेखकाच्या वर्गकलह–प्रक्षोभक लिखाणावरून प्रत्ययास येण्यासारखें आहे. 'समाजशास्त्र व्याख्यानमाला' या प्रा. भाटे यांच्या अनुवादित पुस्तकाच्या चार ते सहापर्यंतच्या

व्याख्यानांत हा दोष चागलाच प्रत्ययास येतो. तुलनात्मक समाजदर्शनाच्या दृष्टीनें ' जगांतील समाजक्रांति व हिंदुस्थान ' ( खैर ) आणि ' पाश्चात्य स्त्रीसमाजदर्शन ' ( थत्ते ) हे ग्रंथ मननीय आहेत.

## परिवर्तनवादी वाङ्मय

हिंदुसमाजाचे आचार आणि विचार, समाजस्वास्थ्य आणि पूर्वपरंपरा या दोन्ही दृष्टींनीं परीक्षून ऐतिहासिक आणि तात्त्विक दृष्टीनें हिंदूंच्या धर्मशास्त्रावर प्रकाश पाडणारें महत्त्वाचें वाङ्मय गेल्या ३० वर्षात निर्माण झालेलें आहे. आमचा धर्म अपरिवर्तनीय म्हणजे सनातन असून त्यात कधींहि बदल करता येणार नाहीं, या समजुतीच्या मूळावरच या वाङ्मयानें घाव घातला आहे. विद्वद्रत्न दप्तरी यांच्या ' धर्मरहस्याने ' मनु–सप्तर्षि हे वेळोवेळीं धर्मप्रवर्तन करीत असत. हा क्रांतिकारक सिद्धान्त इ. स. १९२६ मध्ये प्रथम लोकापुढे माडला. याच ग्रंथात धर्म बुद्धिग्राह्य असून धर्मग्रंथ भिन्नभिन्न काळीं बनविले गेले असेंहि दाखविलें आहे. त्यानतर ' धर्मस्वरूपनिर्णय ' ( कोकजे, इ. स. १९३३ ) या ग्रंथानें धर्मात शब्दप्रामाण्याचें महत्त्व नसून बुद्धिप्रामाण्याचे महत्त्व आहे हें दाखवून दिलें. सनातनी पक्षाचें मत दाखविणारा एकहि अधिकृत ग्रंथ रूढिवादी पडितानीं मराठींत लिहिलेला नाहीं असे ज्या पक्षाविषयीं मागें विधान केलें आहे त्या पक्षाची बाजू सप्रमाण याच ग्रंथांत प्रथम दिलेली आढळेल. रूढिवादी ज्या प्रमाणपरंपरेचा आश्रय करून प्रतिगामी होतात त्या समन्वयपद्धतीचें ठिकठिकाणीं विवेचन करून तिचें सप्रमाण खंडनहि याच ग्रंथांत केलेले आहे. धर्माचें फल ऐहिक आणि बुद्धिग्राह्य असून सामाजिक आणि वैयक्तिक उत्कर्ष साधण्यासाठींच धर्मसंस्था अस्तित्वात आली, हे या ग्रंथात ऊहापोहपूर्वक प्रतिपादिलें आहे. या समन्वय पद्धतीस पूर्वमीमासेंत आधार नसून आपल्या धर्माचारात वेळोवेळीं अनेक परिवर्तनें झालेलीं आहेत हें प्रतिपादणारा ' धर्मशास्त्रविचार ' ( म. म. काणे ) हा ग्रंथहि येथें उल्लेखिला पाहिजे. हिंदु संस्कृतीचें विशाल तत्त्वज्ञान आणि अभ्युदय निःश्रेयसाची सागड घालणारी विचारपद्धति याचें ' हिंदुत्ववाद ' या पुस्तकांत श्री. ज. स. करंदीकर यांनीं चागलेंच विवेचन केलें आहे. अनेक उदात्त गुण असूनहि स्वतःच्या अंगीं जडलेल्या दूरीकरणप्रवृत्तीमुळेंच

हिंदूंचा कसा ऱ्हास झाला हे दर्शवून हा प्रमुख दोष कसा सुधारावा हें 'हिंदूंच्या अवनतीची मीमांसा' (कोकजे) या ग्रंथांत प्रतिपादिलें आहे. हिंदुसमाजातील कित्येक कठिण प्रश्नांचा प्राचीन धर्मशास्त्रानुसारेंच कसा योग्य उलगडा करतां येतो हें 'धर्मविवादस्वरूप' (दप्तरी) या ग्रंथावरून चांगलें समजून येईल. नव्या युगांत हिंदूंनीं कोणती विचारसरणी अवलंबावी हें दिवेकरशास्त्रींचा 'नवा हिंदुधर्म' दाखवू शकेल. याशिवाय धर्मशास्त्रमंथन (दिवेकर), हिंदुसमाज समर्थ कसा होईल (दिवेकर), नव्या स्मृतीची आवश्यकता (का. न. केळकर), आमचा सनातन धर्म (मोहनी), हिंदु-धर्माचें दिव्य (ठाकरे), हिंदुत्व (सावरकर), सर्वश्रेष्ठ हिंदुधर्म (शिखरे), हिंदुधर्म आणि बुद्धिवाद (पराजपे), तात्त्विक मीमांसापद्धति (दप्तरी) इत्यादि अनेक लहान-मोठीं पुस्तकें हिंदुधर्म बुद्धिग्राह्य आणि परिवर्तनशील आहे असें दाखविणारीं झालेलीं आहेत.

## आचारविषयक वाङ्मय

वरील तात्त्विक वाङ्मयाबरोबरच प्रत्यक्ष व्यावहारिक सुधारणेचें स्वरूप विषद करणारें वाङ्मयहि विचारांत घेण्यासारखें आहे. उपवास, संस्कार, दान-धर्म, सामुदायिक प्रार्थना, वैयक्तिक आणि कौटुंबिक आचार यांची नव्या युगास अनुसरून कशी सुधारणा करावी हें 'नवा आचारधर्म' (कोकजे) या ग्रंथांत शास्त्रीय पद्धतीनें दाखविलें आहे. 'आर्यांच्या सणांचा प्राचीन आणि अर्वाचीन इतिहास' (ऋग्वेदी) हा ग्रंथ इतिहास आणि सुधारणा या दोन्ही दृष्टींनीं केवळ अपूर्वच होय. 'आर्यांचे संस्कार' (श्रौता-चार्य बापटशास्त्री) या ग्रंथांत गर्भाधानापासून उपनयनापर्यंतच्या प्रत्येक संस्काराचें सूत्रोक्त स्वरूप देऊन शेवटीं ऐतिहासिक आणि तात्त्विक दृष्टीनें त्यांचें समालोचनहि केलेलें आहे. धर्मनिर्णयमंडळाचे उपनयन–विवाह–श्राद्ध अंत्येष्टि–हिंदूकरण-प्रयोग तर आतां सर्वतोमुखीं झालेलेच आहेत. प्रत्येक प्रयोगास जोडलेल्या प्रस्तावनेंत आणि मराठी अनुवादांत त्या त्या संस्काराची आवश्यकता आणि स्वरूप चिकित्सक दृष्टीला पटेल अशा प्रकारें वर्णिलें आहे. चित्रावशास्त्री, राजे, मोघे इत्यादिकांनींहि संस्कारप्रयोग लिहून प्रसिद्ध केलेले आहेतच !

ब्राह्मण–ब्राह्मणेतर वाद

वरील सुधारणावाद्याचे ग्रंथ अगदीं एका मताचेच आहेत असें नाहीं. विशेषतः हिंदुधर्माचे किंवा हिंदुसमाजाचे सध्याचें एकागी उच्च-नीचत्वप्रधान स्वरूप ज्यास विशेष तीव्रतेनें जाणवतें अशानीं ब्राह्मणाविरुद्ध बंड पुकारून एक चळवळ उभारली. उलटपक्षी या बंडाचा बींमोड करण्यासाठीं कित्येकानी आपली आयुधे सरसावली. या सामाजिक आदोलनाचे पडसाद वाङ्मयात उठणें स्वाभाविक होतें. त्याप्रमाणें ‘ सत्यशोधक निबंध माला ’ ( लोखंडे ), सत्यशोधक पथाचे स्वरूप ( मुंडले ), ब्राह्मणाची फजिती, सत्य-शोधकाचा वेद, ब्राह्मणेतर वादाचे स्वरूप ( भावे ), सत्यशोधक हीरक-महोत्सव, जोतीबा फुल्याचें अंतरंग ( नलावडे ), जोतीबुवाचीं हिंदुधर्म विध्वंसक मतें ( नलावडे ) इत्यादि अनेक पुस्तकें या वादाचे साद आणि पडसाद उमटवितात. परतु ‘ या चळवळीच्या ऐतिहासिक आणि तात्त्विक दृष्ट्या विचार करून थोडक्यात या चळवळीचा चागला परिचय करून देईल असा ग्रंथ अद्याप निर्माण झालेला नाहीं. ’ ( राणे, सत्यशोधक हीरक महोत्सव १९३० इसवीं ) हे मराठी वाङ्मयाच्या दृष्टीने वैगुण्यच म्हटलें पाहिजे. त्यातल्या त्यात श्री. देशमुख यानी दोन खंडामध्यें प्रसिद्ध केलेला ‘ क्षत्रियांचा इतिहास ’ हा बृहद्ग्रथ अत्यंत मननीय होय. क्षत्रिय शब्दाची व्याप्ति, मराठा, सोमवंशी, क्षत्रिय, चाद्रसेनीय कायस्थ, पाठारे, लोहार, सुतार, गोसावी, भावसार, नाथ, कुळंबी इत्यादि अनेक जातींस व्यापणारी गृहीत धरून त्या त्या जातीची उत्पत्ति, गोत्र, प्रवर इत्यादिकाचा विस्तृत विचार या ग्रंथात केलेला आहे. ग्रंथातील प्रतिपादन कसें आहे याची कल्पना येण्यासाठीं एक उतारा येथें द्यावासा वाटतो—‘ पाच हजार वर्षांपूर्वींपासून नवव्या शतकापर्यंत धर्मसंस्थापन, विवर्धन हीं कामें क्षत्रियानींच केलेलीं असल्यामुळें त्यांचे महत्त्व सर्वश्रेष्ठ राहणें साहजिकच आहे. यापुढे मात्र मुसल-मानाच्या स्वाऱ्या हिंदुस्थानावर होऊं लागल्यामुळे क्षत्रियाना समशेर खुली करावी लागल्यामुळें धर्मसूत्रे त्यांच्या हातून सुटणें क्रमप्राप्तच होतें. ब्राह्म-णानीं धर्मसूत्रे आपल्या हाती येतांच सारा धागडधिंगा माजवून दिला, ... ब्राह्मणाच्या स्वार्थी वृत्तीनें जर थोडी उचल खाल्ली नसती तर धर्माच्या अशा चिंधड्या उडाल्या नसत्या, पण त्यांच्याकडून स्वार्थी वृत्तीचें दमन

झालें नाहीं. आणि क्षत्रियांनीं ‘ मोठ्या कष्टानें ’ संस्थापन, संवर्धन व प्रतिपालन केलेला आर्यधर्म विकृत होऊन गेला ’ (पृ. १०७). या उताऱ्यांतील आवेश बाजूस ठेवला तरी ऐतिहासिक घटनांचें अयथार्थ आविष्करण उघड उघड प्रामादिक आहे. नवव्या शतकापूर्वींच महंमद कासीमास तोंड देणारा सिंधमधील दाहीर राजा, तत्पूर्वींचीं कण्व आणि शुंग घराणीं ब्राह्मण असून त्यांनींहि आपली समशेर खुली केलीच होती. विजयनगरचें बुक्क घराणें समशेर आणि विद्या यास सारखेंच जपत होतें हें प्रसिद्धच आहे. ऐतिहासिक विपर्यासाचा हा दोष सोडून दिल्यास निरनिराळ्या क्षत्रिय जातींची एकत्र माहिती या दृष्टीनें पाहिल्यास हा ग्रंथ अपूर्वच आहे यात शंका नाहीं.

## स्पृश्यास्पृश्य वाद

वरील वादाइतका स्पृश्यापृश्य वाद जुना नसला तरी तो विशेष वेगानें वाढत आहे. ब्राह्मणेतरांची मोहीम भटजींविरुद्ध होती तर या वादात भटजीबरोबरच शेठजीहि एका पक्षांत समाविष्ट केले गेलेले आहेत. अस्पृश्यवर्गानें या वादावर फारसे वाङ्मय निर्माण केलेले नाहीं. तथापि डॉ. आंबेडकर याच्या मूळ इंग्रजी ग्रंथाचें श्री. गायकवाडकृत ‘ जातिभेदाचें उच्चाटन ’ हें मराठी अनुवादात्मक पुस्तक जनतेपुढे आलेलें आहे. जातिभेदाचें समूळ उच्चाटन केल्याखेरीज हिंदुसमाजांतील अस्पृश्यता नष्ट होणार नाही हें मत त्यात मोठ्या आवेशानें माडलें आहे. सौ. शकुंतलाबाई वायदंडे याचे ‘हिंदी राज्यघटनेचा वारसा ऊर्फ अपृश्यांचे राजकीय हक्क ’ हें पुस्तक या वादाची भूमिका समजण्याच्या दृष्टीनें विशेष उपयुक्त आहे. मात्र लेखिकेचें ऐतिहासिक विवेचन आणि उपाययोजना हीं अशास्त्रीय वाटतात. हिंदुस्थानावर स्वारी करणाऱ्या आर्यांनीं ज्यास सेवावृत्ति बहाल केली तें शूद्र झाले; पण ज्याच्या जमिनी हिरावून घेतल्या ते मूळचे एतद्देशीय अस्पृश्य गणले गेले अशी अस्पृश्यतेची उपपत्ति लेखिकेनें दिली आहे; पण ती समाधानकारक नाहीं. बौद्धधर्मीयांचा पाडाव करण्यासाठीं ज्या अनेक क्लृप्त्या वैदिक धर्मीयांनीं योजल्या त्यापोटींच अस्पृश्यतेच्या रूढीचा जन्म झाला अशी जी डॉ. आंबेडकरांनीं उपपत्ति लावलेली आहे ती देखील अनैतिहासिकच नव्हे तर अव्यवहार्य वाटते. ‘ भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न ’ ( वि. रा. शिंदे ) या

ग्रंथांत जगांतील अस्पृश्य समाजांचा आढावा घेऊन या प्रश्नावर गंभीर चर्चा केलेली आहे. या दृष्टीनें हें पुस्तक निःसंशय महत्त्वाचें असलें तरी ' अस्पृश्यतेचा उगम जादूटोणा इत्यादि अपधर्मात आहे ' ( पृ. १२ ) अशी जी या प्रश्नाची कारणमीमासा केलेली आहे ती समाधानकारक वाटत नाहीं. शूद्र, अन्त्यज आणि वन्य यांच्याशीं उच्च वर्णीयाचें जें तीन प्रकारचें वर्तन होत असतें त्याची उपपत्ति ' अस्पृष्टाचा प्रश्न ' ( प्रा. माटे ) या ग्रथात विस्तारानें दिलेली असून अद्याप त्याची उपपत्ति कोणीहि सप्रमाण खोडून काढलेली नाहीं असें प्रस्तुत लेखकास वाटतें. म. म. पाठकशास्त्री याचें ' अस्पृश्यतेचा शास्त्रार्थ ' हें महत्त्वाचें पुस्तक या प्रश्नावरील धर्मशास्त्राचें वास्तविक मत समजून घेण्याच्या दृष्टीने अत्यंत उपयुक्त होय. ' अस्पृश्यता आणि देवालयप्रवेश ' ( पुंरदरे ) या पुस्तकातहि या विषयावर चागला ऊहापोह केलेला आहे. वरील चारी लेखकानीं अस्पृश्यता नष्ट होण्यासाठीं समजान्तराची किंवा धर्मान्तराची गरज नसून याच समाजात राहून त्याची अस्पृश्यता नष्ट होऊं शकेल असें प्रतिपादिलें आहे. स्पृश्याच्या धर्मविषयक मताची सुधारणा मतपरिवर्तनाच्या मार्गानें केल्यास तसेच अस्पृश्यवर्गाची आर्थिक दुरवस्था नष्ट करून त्याची राहणी सुधारल्यास हा प्रश्न उलगडेल असे या लेखकाचें म्हणणें आहे. पण ही विचारसरणी कित्येकास पसंत पडत नाहीं. अशा शाततामय आणि सामोपचाराच्या मार्गानें हा प्रश्न सुटणें शक्य नाहीं असा त्याचा सिद्धान्त आहे. मुसलमानाप्रमाणे अस्पृश्यानीं सवता सुभा उभारल्याखेरीज हा प्रश्न सुटणार नाहीं असें त्यांस वाटतें.

डॉ. आबेडकर या मताचे प्रवर्तक असल्याचें प्रसिद्धच आहे. उपरोक्त सौ. वायदंडे याच्या ग्रंथांतहि याच मतास उजाळा देण्याचा प्रयत्न केलेला आहे. पण कारणमीमांसेप्रमाणेंच ही उपाययोजनाहि अपुऱ्या विचारानें नि विकारवशतेनें केलेली दिसते. ' हिंदु म्हणजे जातींचाच केवळ समुदाय नसून स्वतःच्या अस्तित्वासाठीं— स्वतःच्या स्वार्थी आकाक्षेसाठीं भाडणाऱ्या गटाचा समुदाय पण आहे. ' ( जातिभेदाचें उच्चाटन पृ. ३१ ) हें डॉ. आबेडकराचें विधान अस्पृश्य समाजासहि लागू आहे हें ते विसरतात असें

दिसतें. महार, चांभार, मांग, धेड, भंगी, ढोर इत्यादि जाति अस्पृश्य समाजाच्या पोटीं असून त्या देखील फिरून अनेक पोटजातींनीं आणि उच्च-नीचत्वानें ओतप्रोत भरलेल्या आहेतच ! त्यास वेदादि शास्त्रें केव्हांच उपलब्ध नव्हतीं. अर्थात् ' जे वेद व जीं शास्त्रे बुद्धीला वाव देत नाहींत, त्या वेदानाच सुरुंग लावला पाहिजे. श्रुति व स्मृतिकृत धर्माच्या चिंधड्या उडविल्या पाहिजेत, त्याशिवाय गत्यतर नाहीं. ' ( जातिभेद उ. पृ. ७४ ) याप्रमाणें झालें असें गृहीत धरलें तरी तेवढ्यानें अस्पृश्य समाजातील जातिभेद नि उच्च-नीचत्व कसे नष्ट व्हावें हा प्रश्न राहतोच ! असो. ब्राह्मण—ब्राह्मणेतर वाद आणि स्पृश्यास्पृश्य वाद यावरील वाङ्मयापर्यंत आपण आलों. आता या लेखाच्या आरंभीं दिलेल्या विचारवताच्या तिसऱ्या वर्गाकडे वळूं.

## समाजवादी वाङ्मय

जगातील समाज आणि त्याचा ऐतिहासिक विकासक्रम याचें पर्यालोचन करून निरनिराळ्या कालखंडातील सपत्युत्पादन साधनें आणि मानवसमुहा-कडून त्याचा वापर याच्या संघर्षातून समाजाचा विकासक्रम ठरवितां येतो असे मानणारा एक वर्ग पाश्चात्य देशात उद्भवलेला असून त्यांच्याच विचार-सरणीचा मागोवा घेत हिंदी सामाजिक प्रश्नावर उपाययोजना सुचविणारें बरेंच वाङ्मय मराठींत उपलब्ध आहे. या वादाचे आद्यप्रवर्तक म्हणून ज्या-प्रमाणें मार्क्स आणि एंजल्स याचीं नावें प्रसिद्ध आहेत त्याचप्रमाणें या वादास मराठीचे देशीकार लेणें चढविणारे म्हणून पा. वा. गाडगीळ, गोरे, जावडेकर, सुंठणकर, लालजी पेंडसे इत्यादिकाचीं नावें सर्वमान्य होतील यात सशय नाहीं. या वादाच्या सर्व बाजू पहाण्याचें हे स्थळ नव्हे. हिंदी सामाजिक प्रश्न सोडविण्याच्या निमित्तानें या पक्षानें जी विचारसरणी मराठीत माडली आहे तेवढ्याचाच विचार येथें कर्तव्य आहे. पा. वा. गाडगीळ याचीं ' समाजवादाचा ओनामा ' आणि ' मार्क्सचा भौतिकवाद' हीं पुस्तकें या दृष्टीनें उपयुक्त होत. " सृष्टींतील अमूर्त इच्छाशक्तींतून विरोध—विकासानें भौतिक जग उत्पन्न झालें असें हेगेल म्हणतो. उलट भौतिक गुणधर्मांनीं मानवी मन, संस्कृति, तत्त्वज्ञान वगैरे सर्व होतात असें मार्क्स सागतो. याचाच अर्थ मार्क्सनें विरोधविकासवाद ' पाय खालीं डोकें

वर ' असा उभा केला असा आहे. ( मार्क्सचा भौतिक वाद पृ. ९० ) या एकाच वाक्यात लेखकानें मोठ्या कुशलतेने या वादाचें महत्त्व आणि उपयुक्तत्व दाखविले आहे. मनुष्याच्या कर्तृत्वावर भर देऊन सामाजिक प्रश्न सोडविण्याचा सर्वसुलभ मार्ग दाखविणें हें या पथाचें वैशिष्ट्य अवगत नसल्यामुळे अनेक प्रकारचे भ्रम या पथाविषयीं पसरले आहेत. शिवाय आर्थिक उत्पादनप्रकार हें एकमेव मानवी जीवननियंत्रणाचे साधन नसून तें केवळ प्रमुख किंवा फार झाले तर महत्त्वाचे साधन आहे असेच म्हणता येईल. कारण आर्थिक उत्पादनप्रकाराने ज्याप्रमाणें मानवी जीवनाचा साचा घडविला जातो, त्याचप्रमाणें धार्मिक कल्पना, रूढि, परंपरा किंवा संस्कृति याचाहि प्रत्याघात आर्थिक उत्पादन-प्रकारास सहन करावा लागत असतो. मार्क्सवादाची ही मर्यादा कित्येक समाजवाद्यांनींच ध्यानात न घेतल्यामुळें त्याचे हिंदुसमाजाच्या घटनेविषयींचे विचार पुष्कळ वेळा एकांगी होतात. याचें उदाहरण म्हणून ' मार्क्सवाद ' ( सुंठणकर ) या पुस्तकातील पुढील अवतरण देता येईल—" बुद्धानें ' जीवो जीवस्य जीवन ' हा न्याय अवलोकन करून जगातल्या नाडणुकीविरुद्ध बंड उभारलें. या बंडाचें स्वरूप दुहेरी होतें. ब्राह्मण-सत्तेविरुद्ध राजन् वर्गाचा उठाव आणि शहराविरुद्ध खेडीं, म्हणजे सावकारवर्गाविरुद्ध नाडल्या गेलेल्या कर्जबाजारी गरीब शेतकरीवर्गाचा उठाव ' ( पृ. ८२ ). प्रत्येक क्रांति अर्थव्यवस्था-मूलकच असली पाहिजे या अत्याग्रही वृत्तीमुळेंच हे विधान करण्याचा लेखकास मोह झालेला दिसतो. बौद्ध धर्मापूर्वी आणि नंतर सरंजामपद्धतीच चालू होती. आणि या आर्थिक व्यवस्थेंत बदल करण्याचा बुद्धाचा मुळींच हेतु नव्हता. बुद्धानें सन्यासधर्मास प्रतिष्ठा मिळवून दिली आणि सर्वांस निर्वाणाचें द्वार मोकळें करून दिलें, हेच त्याचा प्रसार होण्याचे वास्तविक कारण आहे. प्रा. प. ल. वैद्य याच्या 'बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार' या ग्रंथात बौद्ध धर्म सर्वसंमत होण्याचीं कारणें ( पृ. १७ ) दिलेलीं असून त्यात आर्थिक पिळणुकीचा किंवा त्यापासून मुक्ततेचा समावेश केलेला नाहीं. ' धर्म की क्रांति ' या पेंडसे याच्या पुस्तकातहि हाच प्रमाद घडलेला आहे. ब्राह्मण—ब्राह्मणेतर वादात तसेंच स्पृश्यास्पृश्य वादात विशिष्ट वर्गाच्या दैन्याची उपपत्ति लावण्याकरिता ऐतिहासिक सत्याचा कसा विपर्यास केला

जातो हें मागें दर्शविलेंच आहे. वर्गकलह आणि आर्थिक उत्पादनप्रकार याचा संघर्ष हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासाच्या आधारें सिद्ध करूं इच्छिणारे तोच प्रमाद कसा करतात याचें हे उदाहरण मननीय आहे. जावडेकर–गोरे–गाडगीळ याचें वाङ्मय मात्र या दोषापासून बहुशः मुक्त आहे. पैकीं गाडगीळाच्या वाङ्मयाचा उल्लेख वर झालेलाच आहे. गोरे यांच्या ‘ साम्राज्य-शाही ’ या पुस्तकात साम्राज्यशाही आणि भाडवलशाही याच्या अपवित्र युतीचे समाजावर कसे अनिष्ट परिणाम होतात हें चांगल्या प्रकारें दाखविलें आहे. त्यानीं इग्रज येण्यापूर्वींच्या हिंदु समाजपद्धतीचा उल्लेखहि न करण्याची सावधगिरी ठेवलेली दिसते. यामुळें त्यांचें विवेचन सुसूत्रच दिसून येतें. आचार्य जावडेकर यानीं ‘ लोकशाही ’ या पुस्तकात पढिक विद्वाना-प्रमाणें ठराविक विचाराची उसनवारी केलेली नसून ‘ लोकशाही-विरुद्ध कम्युनिझम् ’ हे द्वैत कसे मिटविता येईल याचा गाधीप्रवर्तित सत्याग्रह-शास्त्राशीं समीकरण करून विचार केला आहे. अनियमित कामगारशाही-( Dictatorship of the Proletariate )-चे दोष दाखवून त्यानीं आत्मबलाधिष्ठित लोकशाहीचे स्तुतिस्तोत्र गायिले आहे. समाजवादी वाङ्मयाच्या प्राङ्गणात या बुद्रुक आत्मबलवादास बळेंच आणल्याबद्दल कित्येक समाजवादी लेखक जावडेकरावर रुष्ट आहेत. पण या सगोत्र कलहाशीं आम्हास काहीं कर्तव्य नाहीं. ज्या वेळीं यंत्रयुग नव्हतें आणि ज्या वेळचा इतिहास किंवा समाजस्थिति अनेक प्रयत्न करूनहि इतिहासज्ञास अद्याप अंधुकच प्रतीत होत आहे अशा काळात जाऊन छातीठोकपणे पिळणूक, जुलूम, वर्गकलहादिकाचा जावईशोध लावणें किती धाष्टर्याचे आहे याचा लेखकांनीं विचार करावा एवढेंच सुचवावयाचे आहे. ही सावधगिरी जे बाळगीत नाहीत ते इतिहासाचाच नव्हे तर मार्क्सवादाचाहि विपर्यास करून जनतेंत त्या वादाबद्दल विपरीत ग्रह मात्र निर्माण करतात. समाजवादी लेखकानी हें सकट लक्षात घेऊन गाडगीळ–जावडेकर–गोरे याच्या साक्षेपी लेखनाचेंच अनुकरण करावें हे योग्य होय. आपापल्या मतप्रसारार्थ मागचा-पुढचा विचार न करता हिंदुसमाजपद्धतीवर मुक्तहस्तानें कोरडे ओढणाऱ्या लेखकास ताळ्यावर आणणारे वाङ्मय देखील सुदैवाने अलीकडे निर्माण झालेले आहे. त्याचा परामर्ष घेतल्यावाचून हें विवेचन संपविणें योग्य

होणार नाहीं. कारण हिंदुसमाजपद्धतीवर निरर्गल कोरडे ओढणारें लेखन सध्या फारच बोकाळलें आहे.

## मूलभूत समस्या आणि तिचें उत्तर

हिंदुसमाजव्यवस्था जर एवढी अन्यायमूलक आणि जुलमी आहे तर अद्याप ती नष्ट का झाली नाहीं ? तसेंच हिंदूंच्या सर्व प्रकारच्या अवनतीचें खापर ब्राह्मणजातीवर फोडून मोकळें होणारानींहि कित्येक सहस्रके ब्राह्मणेतरानीं आणि अस्पृश्यानीं मूठभर ब्राह्मणाचें वर्चस्व निमूटपणे कसें सहन केले या प्रश्नाचे समाधानकारक उत्तर दिलें पाहिजे. या दोन्ही प्रश्नास 'भारतीय समाजशास्त्र' ( केतकर ) या ग्रथात ब्राह्मणाची व्यापक दृष्टि आणि समाजविस्तारक विद्या ( पृ. १२२–३२ ) असे उत्तर दिलेलें आहे. अर्थात् जुलुमामुळें नव्हे तर सास्कृतिक श्रेष्ठत्वामुळें जातीजातींत अंतर पडत जाऊन त्याचे उच्च नीचत्वात स्वाभाविक पर्यवसान झालें असे त्यात सिद्ध केले आहे. 'अस्पृष्टाचा प्रश्न' ( माटे ) या ग्रथात ( पृ. १५५ ) 'ब्राह्मणानें जात आणली असे एक कुभाड मोठेच चलन पावलें आहे. एका नागात शेंकडों जाती. या नागाना जातिकल्पना शिकवावयास कोणचा ब्राह्मण गेला होता ? गोडाना ती कोणी शिकविली ? तेथपर्यंत ब्राह्मण पोंचला नाहीं व त्याना हिंदुसमाजात त्याने अतर्भूत करून घेतलें नाहीं ही तर आधुनिक तक्रार आहे !... खरी गोष्ट अशी आहे कीं, जमातींचें रूप हें त्या त्या लोकाच्या सुधारणायुगाच्या आरभी सर्वत्रच होतें. ही जमातीची जाणीव, निर्वाहाचें एकेक साधन पकडून ठेवण्याची तत्परता व भौगोलिक गटाची स्वसरक्षणाची तरतूद यानीं शूद्र, अतिशूद्र व रानट लोकात उत्पन्न झाली व दृढ झाली. ती त्यांना कोणी जाऊन सागावी लागली हें बोलणें उगाच आहे.' असें या प्रश्नाचें उत्तर दिलें आहे. 'हिंदूच्या अवनतीची मीमासा' ( कोकजे ) या ग्रंथात जातिभेद आणि जन्मजात उच्च-नीचत्व हीं अतिरिक्त पावित्र्यकल्पना आणि संकुचित ध्येय यामुळें आलीं ( पृ. १२२-१४२ ) असें प्रतिपादिलें आहे. यावरून सुधारणावाद्यातहि अनेक परी असून निर्विकार मनानें खोल विचार करून काढलेले निष्कर्ष प्रकट करणारें वाङ्मय यानीं लिहिलें आहे हें दिसून येईल. वरील उत्तरें पूर्ण समा-

घातकारक असतील असें नाहीं. पण त्यावरून सुधारणावाद्यांचें आत्मनिरीक्षण आणि तत्त्वनिष्ठा प्रत्ययास आल्यावाचून राहणार नाहींत. मात्र या सुधारणावादांतील दोषदर्शनाचा सुशिक्षितात व्हावा तसा प्रसार झालेला नसल्यामुळें पट्टीचे सुधारक वर्गकलह चेतविणारेच विचार अद्याप घोळघोळून मांडीत असतात. पण त्याच्या मागें शास्त्रीय अधिष्ठान नाहीं. याची जाणीव आताशा विचारवंतात प्रसृत होऊं लागलेली आहे. आमची सुधारणा विशेष खोल विचार न करताच चालू असल्याचें डॉ. केतकर यांचें मत वर उद्धृत केलेंच आहे. त्याचाच वेगळ्या पण स्पष्ट भाषेंत पाठपुरावा करणारें डॉ. वालावलकर यांचें पुढील वक्तव्य कित्येकास मननीय वाटेल :

" The idealogy of our Social Reformers has proved to be vague, shows lack of a spiritual content, though it is full of enthusiasm and even good will on the part of those that thought it out and fostered it. Without fully grasping the implications of European values which had evolved out of spiritual struggles for centuries of human effort, our Social Reformers abandoned the institutions of their forefathers, in whatever decadent conditions they found them, without sufficiently understanding or delving into the spiritual principles underlying the foundations of their own social heritage. All this has resulted in creating fresh social problems which Hindu India has now to solve; for the ' reform movement ' has failed to tackle the evils it sought to remedy; and, it has rather created complexities and angularities in social life and outlook which have really become very acute during our own days."

—Walavalkar, Hindu Social Institutions, p. 334.

या इंग्रजी उताऱ्याचा येथे बुद्धयाच समावेश केलेला आहे. त्यावरून विचारवंताच्या मनांतील खळबळ चांगलीच व्यक्त होईल. पण असले लेखन मराठीत न उतरल्यामुळे मराठी वाङ्मयाची कशी हानि झालेली आहे हेहि ध्यानात येईल. डॉ. वालावलकर, घुर्ये यांच्यासारख्यांचे विचार मराठी वाचकास वाचावयास मिळूं नयेत हे त्यांचे दुर्भाग्य होय. उलटपक्षी इंग्रजी वाचकवर्गच डोळ्यापुढें ठेवून ग्रंथरचना करणारास मराठी वाङ्मयातील वाहते वारे पाहण्याचें कारण पडत नाहीं यामुळें मराठी-इंग्रजी लेखकास एकमेकाचें सहकार्य मिळेनासें होते. भारतीयातील समाजसुधारणेचे वरील इंग्रजी उताऱ्यात रंगविलेलें भेसूर चित्र टाळावयाचे असल तर मराठी-इंग्रजी लेखकानी एकमेकास वैचारिक अस्पृश्य न मानता सहकार्याने पुढें येऊन समाजसुधारणेच्या प्रांतातील अनैतिहासिक आणि अयुक्त दुर्मतांना संघटितपणें निःपात केला पाहिजे आणि सुधारणावादाचे निर्भीडपणे परीक्षण करून त्यात उत्पन्न होणाऱ्या दोषास तत्त्वनिष्ठने वाचा फोडली पाहिजे. तसे न होईल तर जातीजातींतील कडवटपणा वाढत जाऊन जातीय किंवा सामाजिक वाङ्मयाचें प्रकाशन कायद्याने बंद करण्याची घोर आपत्ति आदळेल. असो. येथपर्यंत आरंभीं दर्शविलेल्या तिन्ही वर्गातील विद्वानाचें वाङ्मय पाहून झाले. गेल्या ३–४ वर्षांत हिंदु कायद्यावरहि–मध्यवर्ती विधिमंडळापुढे कित्येक बिले आल्यामुळे–बरेच वाङ्मय प्रसिद्ध झाले आहे. त्यापैकीं ‘ हिंदु स्त्री-धनाचा कायदा ’ ( रानडे ), ‘ स्त्रियांचे हक्क व सुधारणा ’ ( वा. वि. जोशी ), ‘ हिंदु कायद्यात स्त्रियांचें स्थान ’ ( गजेन्द्रगडकर ) इत्यादि पुस्तकें वाचनीय आहेत. याप्रमाणे समाजापुढील ज्वलंत प्रश्नांवरील वाङ्मय पाहून झाल्यावर आता दुसऱ्या वाङ्मयप्रकाराकडे वळूं.

## समाजस्वरूपदर्शक वाङ्मय

निरनिराळ्या सामाजिक गटांची ऐतिहासिक आणि विद्यमान माहिती देणारें वाङ्मय सामाजिक अभ्यासाच्या दृष्टीनें महत्त्वाचे असते. ‘ युद्धस्य कथा रम्या ’ या न्यायास अनुसरून या प्रकारातील वाङ्मय नसल्यामुळे सर्वसामान्य जनसमूहाकडून आळणी म्हणून ते उपेक्षिलें जाणें स्वाभाविक असतें. तथापि त्याचें महत्त्व कमी नाहीं. या दृष्टीनें विचार केल्यास हिंदुसमाजातील

विविध ज्ञातींची माहिती देणारें वाङ्मय उल्लेखनीय होय. सहवासी ब्राह्मण, उत्तर कोंकणातील देशस्थ–यजुर्वेदी गोवर्धन ब्राह्मण, कुडाळ देशकर ब्राह्मण, गौडसारस्वत ब्राह्मण, पाचाल ब्राह्मण, विश्व ब्राह्मण, शहाण्णव कुळी क्षत्रिय वंश, चांद्रसेनीय कायस्थ, पाठारे प्रभु, भावसार, ब्रह्म–वैश्य ज्ञाति, वीरशैव, गोसावी, कुणबी, भंडारी, न्हावी, वजारी, कासार, इत्यादि अनेक जातींची माहिती प्रसिद्ध झालेली आहे. महाराष्ट्रातील विशेष परिचित ब्राह्मण जातींपैकीं कऱ्हाडे जातीचा ग्रंथ अद्याप निघालेला नाहीं. देवरुख्याविषयीं ‘ चितळे-भट्ट प्रकरण ’ ( विंपुटकर ) या पुस्तकांत माहिती देण्याचा प्रयत्न केला असला तरी त्यांत त्याच्या चालीरीतींची माहिती नाहीं. ‘ माध्यंदिन शाखा प्रकरण ’(जोशी) या पुस्तकाचीहि तीच गत आहे. ‘चित्पावन’ या ना. गो. चापेकरकृत ग्रंथांत मात्र बरीच माहिती परिश्रमपूर्वक ग्रथित केलेली आहे. परंतु देवदिवाळीचे महत्त्व चित्पावनाखेरीज कोणासहि नाहीं ( पृ. १९० ). यासारखें एखादें विधान त्याच्याहि लेखणींतून उतरलेंच आहे. देवदिवाळी हा रत्नागिरीकडील प्रदेशांत ग्रामधर्म म्हणून सर्वच हिंदु पाळीत असतात. चित्रावशास्त्रीकृत ‘ देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण-परिचयांत ’ देशस्थांच्या कुलधर्म-कुलाचाराची माहिती अधिक प्रामुख्यानें यावयास पाहिजे होती. याशिवाय ‘ ब्राह्मणांतील पोटजातींचें एकीकरण ’ यासारखेहि ग्रंथ झालेले आहेतच. मराठींत जवळजवळ तीस कुलवृत्तान्त प्रसिद्ध झालेले असले तरी त्यांत चित्पावनेतरांचे कुलवृत्तान्त अवघे सात-आठच आहेत. कुलेतिहासाविषयीं चित्पावनेतर ब्राह्मण–मराठे तसेंच इतर हिंदु जाती इतक्या उदासीन कां असाव्या हे कळत नाहीं. समाजाभ्यासाच्या दृष्टीनें या वाङ्मयाचें महत्त्व विशेष आहे. एखाद्या गावाचा समाजशास्त्रदृष्ट्या कसा अभ्यास करावा हें चापेकरकृत ‘ बदलापूर ’ दाखवून देऊं शकेल. ‘ लौकिक दंतकथा ’ आणि ‘ मुंबई इलाख्यातील जाती ’ ( गो. मं. कालेलकर ) हे ग्रंथहि उपयुक्त आहेत. मात्र हे इंग्रजीवरून अनुवादलेले आहेत. एतद्देशीय विद्वानांनीं स्वतः निरीक्षण करून असें वाङ्मय निर्मिलें पाहिजे. ‘ स्त्री-जीवन ’ (साने), ‘ वऱ्हाडी लोकगीतें ’ ( गोरे ) हीं पुस्तकें सोडून दिलीं तर ग्रामीण–साहित्य मराठी छापखान्याच्या कक्षेत आलेलेंच नाहीं असें म्हटलें तरी चालेल. सर्व जातींत शिक्षणप्रसार होत असल्यामुळें या प्रकारचें वाङ्मय आधिक प्रमाणांत उजेडांत

येणें शक्य आहे. मात्र हें वाङ्मय संपादीत असता संपादकानें त्यांत मुळींच हस्तक्षेप न करतां तें जसेंच्या तसेंच वाचकांसमोर माडणें इष्ट होय. मूळ काय आणि संपादकीय मखलाशी कोणती याचा स्पष्ट उलगडा वाचकास होईल, याविषयीं अशा वाङ्मयाच्या संपादकांनीं विशेष जपलें पाहिजे.

## धर्मस्वरूपदर्शक वाङ्मय

विशेष चर्चेंत न पडता धर्मावर माहितीपूर्ण विवेचन देणारेंहि वाङ्मय झालेलें आहे. ऋग्वेदी याची ‘ हिंदुधर्मदीपिका ’ या दृष्टीने उल्लेखनीय होय. याशिवाय ‘ जगातील धर्मपंथ ’ ( सहस्रबुद्धे ), ‘ बौद्धधर्म ’ ( पाटणकर ), ‘ जगांतील विद्यमान धर्म ’ ( अनुवादित, आठवले ) इत्यादि एकेका धर्मपंथाची किंवा अनेक धर्मांची माहिती देणारे ग्रथ मराठींत प्रसिद्ध झालेले आहेतच ! ‘ जैनधर्माची ओळख ’ ( मगदूम ) या पुस्तकात प्रथम क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र एवढेच वर्ण होते, पुढें भरत चक्रवर्तीनें ब्राह्मणवर्णाची स्थापना केली; या ब्राह्मणवर्णापासूनच पुढे अधर्म उत्पन्न होऊन विषमता वाढली, असे ( पृ. ४३ ) एक ऐतिहासिक ( ? ) विधान आहे. या सर्व वाङ्मयात सुधारणेचे विचार फार करून नसतातच.

## अहिंदूंचें वाङ्मय

अहिंदूपैकीं मुसलमानाचें वाङ्मय मराठींत नाहींच म्हटलें तरी चालेल. ख्रिस्ती धार्मिक वाङ्मय मात्र बरेंच आहे. पण बहुशः ते अनुवादात्मकच आहे. ख्रिस्ती समाजाचा विचार करणारें निर्भीड वाङ्मय फारच अल्प आहे. या दृष्टीनें विचार करतां लक्ष्मीबाई टिळक यांचीं ‘ स्मृतिचित्रें ’ विशेष उल्लेखनीय होत. व्यापक दृष्टीनें लिहिल्या गेलेल्या ख्रिस्ती वाङ्मयाचाहि हिंदूंत प्रसार होऊं शकतो हें स्मृतिचित्रानीं चांगलेच प्रत्ययास आणून दिले आहे. स्मृतिचित्राकडे नुसतें ललितवाङ्मयाच्या दृष्टीनें पाहून चालणार नाहीं. साहित्यलक्ष्मीचे कित्येक समाजनिरीक्षणात्मकहि विचार त्यात ग्रथित झालेले आहेत. या दृष्टीने लक्ष्मीबाईचे “ कर्मठ ” हा शब्द हिंदु माणसाला नेहमीं लागूं करण्यात येतो. पण माझ्या दोन्ही समाजाच्या अनुभवावरून मला असें खात्रीनें म्हणता येईल, कीं शेंकडोंवारी हिशोब बसविला तर हिंदूंपेक्षां

कर्मठाची संख्या आमच्यातच (ख्रिस्ती समाजात) अधिक भरेल. व कित्येक वेळा ह्या कर्मठपणाची अशी परमावधि होते कीं, त्याला कर्मठपणापेक्षा आचरटपणा हे नाव अधिक शोभेल.

कुंकूं लावले म्हणून धर्मबाह्य वर्तन झालें, कासोट्याचें लुगडें नेसलें म्हणून ख्रिस्ती धर्माला काळिमा लावला, महात्मा गांधींकरिता प्रार्थना केली म्हणून धर्म बुडाला, इतकें कशाला, हिंदु खानावळींत जेवूं लागला म्हणून हिंदु झाला असे म्हणणारे हरीचे लाल चुकलें! हरीचे लाल—म्हटलें तरी पातक घडावयाचें—आमच्यात आहेत." (स्मृतिचित्रें भा. ४ पृ. १२२) यासारखे उद्गार हिंदु आणि ख्रिस्ती विचारवंतास सारखेच उद्बोधक वाटणार नाहींत काय? म्हणून हिंदूतील वैदिकधर्मीय किंवा सनातनधर्मीय सामजाप्रमाणेंच अवैदिक हिंदु पंथ, मुसलमान, पारशी, यहुदी आणि ख्रिस्ती याच्या समाजस्थितीचें दर्शक आणि चिकित्सक वाङ्मय त्या त्या पंथातील विद्वान् निर्माण करतील तर मराठी वाङ्मयात अनेक सुंदर दालनाची भर पडेल. असो.

## विशेष अभिनंदनीय गोष्ट

गेल्या पिढींत राजकारण आणि समाजकारण हातात हात घालून चालत होतें. यामुळें समाजकारणावरील वाङ्मयास तेजी येणे स्वाभाविक होतें. गेल्या तीस वर्षांत राजकारणानें समाजकारणाशीं गडी फू केली आहे. नवे नवे सामाजिक प्रश्न उपस्थित होत असले तरी राजकारणी पुढारी त्यांकडे द्यावें तसे लक्ष देत नाहींत. परतंत्र राष्ट्रांत राजकारण हेंच प्रभावी असल्यामुळें असें होणें स्वाभाविक असते. कॉंग्रेसनें अस्पृश्योद्धाराची चळवळ केली असती तरी तिच्या बुडाशीं राजकीय हेतु मुदलीच नव्हते, असें म्हणणें वस्तुस्थितीस सोडून होईल. हिंदुमहासभेची गाडी स्वातंत्र्यवीरानीं राजकारणाच्या रुळावर नेल्यामुळें तिचा देखील सामाजिक चळवळीशीं साधा तुटलेलाच आहे. अस्पृश्योद्धार आणि काहीं अंशीं शुद्धीकरण हे दोन विषय सोडून दिले तर इतर सर्व सामाजिक विषय पुढाऱ्यानीं आणि सर्वसामान्य जनतेनें दुर्लक्षिलेलेच आहेत असें म्हणणें वावगें होणार नाहीं. अशाप्रकारें

सर्वस्वी उपेक्षिल्या गेलेल्या सामाजिक आणि धार्मिक विषयांवर ज्यांनीं निष्काम बुद्धीनें आणि स्वयंस्फूर्तीने ग्रंथनिर्मिति केली त्यांचें विशेष अभिनंदन केलें पाहिजे. त्याप्रमाणें अभिनंदन करून आणि लेखाची मर्यादा ओलांडण्याच्या भयामुळें किंवा लेखकाच्या अज्ञानामुळें ज्यांचीं नांवें या लेखांत येऊं शकलीं नसतील त्यांची क्षमा मागून हें ओझरते समालोचन संपवितों.

● ● ●